## केरळकोकिळ एडिटरकृत–पुस्तकें, विक्रीस तयार.

### श्रीमद्विवेकानंदस्वामींचे—मराठींत.

| स्वामींच्या तसबिरीसह— | किं० | ट० |
|---|---|---|
| **राजयोग.** ... ... ... ... ... ... ... ... | ·॥· | ८– |
| **कर्मयोग.** ... ... ... ... ... ... ... ... | ·॥· | ८– |
| **भक्तियोग.** ... ... ... ... ... ... ... ... | ·॥· | ८– |
| श्रीस्वामी विवेकानंदाचे गुरु भगवान् रामकृष्ण परमहंस त्यांचें उपदेशामृत— **सुलभ वेदांत**—मराठी चुटके-गोष्टीरूपानें ३६० आहेत. परमहंसांचें चित्र व चरित्रासह. ... ... ... ... ... | ·।।।· | ८– |
| **सार्थ व सटीप ज्ञानेश्वरी.** सुधारलेली आवृत्ति ३ री. ... | ३। | ·॥" |
| **सार्थ व सटीप दासबोध.** ग्लेझ कागद सोनेरी बा.... ... | ५ | ·॥· |
| **सार्थ व सटीप दासबोध.** साधे कागद कापडी बा. ... | ३। | ·॥· |
| **सचित्र लोकोत्तर चमत्कार.**–त्यांत निरनिराळे २५ चमत्कार आहेत व चित्रें १० आहेत. ... ... ... ... ... ... ... | ·॥= | ८ |
| **चीनचा इतिहास**—अजस्र तट, व्यापार, राजकुलाची रहाणी, चेनी लोकाच्यां रीतिभाति इ. ... ... ... ... ... ... ... | ·।= | ८॥ |
| **पंचतंत्रामृत**—विष्णुशर्माकृत पंचतंत्राच्या आधारें. सचित्र गोष्टी आहेत. ... ... ... ... ... ... ... ... | ८= | ८॥ |
| **माझें कळसूत्री घर**—( नरदेहाची सचित्र रचना. ) शरीराच्या २४ आकृति वर्णनासह. डॉ. देशमुख व डॉ. गोडबोले त्यांचे अभिप्राय. | ·।= | ८॥ |
| **सद्गुरुभक्तिशतक आर्या**—ज्ञानेश्वरी अध्याय १३ पैकीं सद्गुरुभक्तिसंबंधीं आर्या १०२ आहेत. ... ... ... ... ... | ८– | ८॥ |

## रंगवल्लिका.

### रांगोळी व लेणीं काढण्याचें पुस्तक.

| | | |
|---|---|---|
| मुलींस व स्त्रियांस काढण्यास सोप्या व सुशोभित अशा आकृति २ आहेत ... ... ... ... ... ... ... ... | ·।· | ८– |

**जनार्दन महादेव गुर्जर**, दुकान रामवाडी, **मुंबई.**

# आद्य जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्य

ह्यांचें

# विस्तृत चरित्र.

'महाराष्ट्रभाषाचित्रमयूर'

**रा० रा० कृ. ना. आठल्ये**

एडिटर 'केरळकोकिळ'

ह्यांनीं तयार केलें तें



**त्र्यंबक जनार्दन गुर्जर**

ह्यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

**मुंबईंत,**

'निर्णयसागर' छापखान्यांत बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर
यांनीं मालकाकरितां छापिलें.

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥

भगवद्गीता.

**किंमत १२ आणे.**

शके १८३२ सन १९१० इसवी.

# प्रस्तावना.



## श्लोक.

पयोब्धिविवरीसुनिःसृतसुधाझरीमाधुरी-
धुरीणभणिताधरीकृतफणाधराधीशितुः ॥
शिवंकरसुशंकराभिधजगद्गुरोः प्रायशो
यशो हृदयशोधकं कलयितुं समीहामहे ॥ १ ॥

शंकरविजय.

ही प्रस्तावना लिहिण्यास कलम हातीं धरतांच एका गोष्टीचा अंतःकरणास कढ आल्यावांचून रहात नाहीं. ती गोष्ट ह्मणजे आमचे **मित्र ज. म. ऊर्फ भाऊसाहेब गुर्जर** ह्यांचा अखंड वियोग ही होय. भाऊसाहेब आमचे अत्यंत स्नेही असून ते मोठे रसिक मार्मिक व गुणज्ञ असे होते. आणि त्यांतून 'संतचरित्रांची' तर त्यांस मनस्वी आवड असे. आमच्या हातून सर्व संतचरित्रांची मालिकाच तयार करून घ्यावी असा त्यांचा दृढतर हेतु होता, व त्यासाठीं स्वतःचा नवा प्रेस आणावयाचा निश्चय करून त्यांनीं पनवेलीजवळ पार्पुडास एक स्वतंत्र मोठी इमारत बांधण्याचें कामही सुरू केलें होतें. पण तें सर्व आतां जागच्याजागीं राहिलें! ईश्वरी इच्छेस उपाय नाहीं. तथापि त्यांचे चिरंजीव **त्र्यंबकराव, रंगराव** आणि मित्र रा. रा. **भास्कर नारायण ऊर्फ बाबासाहेब गोडबोले,** बुकसेलर पुणें, व रा. रा. **वामन नारायण मुनि**-लगेजक्लार्क व्हिक्टोरिया टर्मिनस, मुंबई—ह्यांनीं योगायोग आणून तो त्यांचा उद्देश सिद्धीस नेला व तें चरित्र माझ्या हातानें पुरें करविलें. ह्या सुयोगाबद्दल परमेश्वराचे आभार मानून प्रारंभींचे दोन शब्द लिहितों.

कै० भाऊसाहेब गुर्जर ह्यांनीं सन १८८९ सालीं "श्रीमच्छंकराचार्यांचें लहानसें चरित्र" वे. रा. रा. श्रीकृष्णशास्त्री आठल्ये ह्यांजकडून लिहवून प्रसिद्ध केलें होतें. त्याच्या प्रति संपल्यामुळें ही दुसरी निराळ्या धर्तीची विस्तृत आवृत्ति तयार करून देण्यास त्यांनीं मला सुचविलें होतें. मूळच्या चरित्रांतील माहिती, रा. आठल्ये

ह्यांनीं चांगल्या परिश्रमानें मिळविली होती. कै० मंडलिक ह्याच्या लायब्ररींतून शंकरदिग्विजय, एक दोन दुसरीं चरित्रें, आचार्यांच्या ग्रंथांची यादी, वगैरे बरीच माहिती त्यांस उपलब्ध झाली होती. ती सर्व घेऊन तींत नवीन भर वगैरे घालून मीं विस्तृत चरित्राची दुसरी आवृत्ति तयार करावी असाच कै० गुर्जर ह्यांचा हेतु होता. त्याप्रमाणें सदरहू पुस्तक तयार केलें आहे. गुर्जर हयात असतांनाच ह्याची हस्तलिखित प्रत तयार झाली होती, व तिचें वाचन पांच चार दिवसांत करावयाचें त्यांनीं ठरविलें होतें. पण चार दिवसांचें आंतच त्यांना एकाएकीं काळानें इहलोकांतून ओढून नेलें, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट होय! त्यास कांहीं उपाय नाहीं. ह्याकरिता **'ठेविलें अनंते तैसेंचि रहावें। चित्तीं असों द्यावें समाधान'** ह्या तुकोबांच्या उक्तीवर लक्ष ठेऊन सदरहू पुस्तकाच्या प्रस्तावनेला सुरवात करतों.

रा. आठल्ये ह्यांची माहिती पुष्कळ घेतां आली, तेव्हां त्यांचेही आह्मी फार आभारी आहों. आह्मीं जी जी माहिती त्यांत सामील केली आहे, त्यांत दोन गोष्टी विशेष आहेत. एक आचार्य विद्यमान असतांच, किंवा त्यांच्या पश्चात् निदान लौकरच तरी, मंडणमिश्र ऊर्फ सुरेश्वराचार्य श्रीशृंगेरी मठाचे पहिले आचार्य, ह्यांनीं एका उत्तम कारागिराकडून एक तांब्याची मूर्ति करविलेली आहे; व ती काशींतील मठाच्या मूर्तीशीं मिळती आहे. तिचा फोटो घेऊन ती प्रतिमा आह्मीं ह्या पुस्तकांत दिली आहे. हा एक मोठा लाभ होय.* आणि त्याहून दुसरा लाभ ह्मटला ह्मणजे आचार्यांची उपलब्ध झालेली

---

* आचार्य हे शरिरानें भव्य, तेजःपुंज आणि फार रूपवान् होते. त्यांच्या शरिरावर महापुरुषाचीं सामुद्रिक चिन्हें लोकांना बाळपणांतच पुष्कळ दृष्टीस पडलीं. त्यांचें मुख पूर्ण चंद्रासारखें होतें. कपाळावर अर्धचंद्राकृति, वक्षःस्थळ विशाळ, आजानुबाहु, पावलें लहान, नखें आरक्तवर्ण, हस्त व पाद यांच्या मध्यभागीं शंखचक्रादि चिन्हें, मस्तकावर वामभागीं त्रिशूळ व दक्षिणभागीं अर्धचंद्र इत्यादि चिन्हें करून शिवमूर्तीसारखे शोभत असत. असें वर्णन आहे. तें वर्णन आह्मीं दिलेल्या प्रतिमेशीं पुष्कळ अंशीं जुळतें असें आह्मांस वाटतें.

जन्मपत्रिका हा होय. ही पत्रिका आचार्यांचें जन्मस्थान जो कालडी गांव तेथील पत्रिकेशीं मिळते; शिवाय फलज्योतिष्यांनीं जीं लक्षणें [ ती पत्रिका कोणाची हें न सांगतां ] वर्तविलीं, तींही आचार्यांशीं जुळतात, व वे. श्रीकृष्णशास्त्र्यांनींही अनेक जैन ग्रंथांतील लेखांचा विचार करून अखेर 'आचार्यांस जन्मून अदमासें २००० वर्षें झालीं असावींत,' हा जो अखेरचा निर्णय ठरविला आहे त्या कालालाही ही पत्रिका मिळती येते. तेव्हां हा आद्य-श्रीमच्छंकराचार्यांच्या कालाचा निर्णय निश्चित झाला असें मानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. तथापि, रा. राजवाड्यांसारख्या इतिहाससंशोधकांचीही कीस पाडण्याची हौस कमी होऊं नये ह्मणून तो पूर्वचरित्रांतील जैनग्रंथांचा सारांशही सोबत जोडला आहे. शिवाय, आद्यशंकराचार्यांची जन्मभूमी जो केरळदेश ऊर्फ मलबार तेथें आमचें पंधरा वीस वर्षें वास्तव्य असल्यानें त्यांचा कालडी गांव, त्यांची जन्मभूमी, त्यांनीं बांधलेलें देवालय, पूर्णानदी, घाट, व मातोश्रीचें स्मशान वगैरे प्रत्यक्ष पाहून कृतार्थ होण्याचा प्रसंग आला होता. सबब तिकडील सर्व माहिती, शिवाय, श्रीशृंगेरी मठांतील प्रत्यक्ष पाहिलेली माहिती, श्रीशिवगंगा-मठाधिपतींची माहिती, प्रसाद, वगैरे ज्या ज्या गोष्टी आचार्यांच्या संबधानें प्रत्यक्ष पहावयास मिळाल्या, त्या सर्व ह्या चरित्रामध्यें संकलित केल्या आहेत.

चरित्रांतील मजकूर एकसारखा सरळच लिहित गेलें तर लांबचलांब कंटाळ-वाणें चऱ्हाटसें वाटून प्रसंगोपात्त एखादा विवक्षित भाग चट्कन सांपडत नाहीं. तसें न व्हावें ह्मणून प्रत्येक बाबीचीं कलमवारीनें लहान लहान प्रकरणें करून त्यांस अनुक्रमांक दिले आहेत, व त्या प्रत्येक प्रकरणाची आरंभीं अनुक्रमणिका दिली आहे. आचार्यांचें मुख्य मत ह्मणजे अद्वैत सिद्धांत हें होय. त्याचा सारांश थोडक्यांत निराळाच दिला आहे, व आचार्यांचें काव्यरचनाचातुर्य, प्रसाद, व वैराग्याचा ठसा ह्यांचें दिग्दर्शन करण्याकरितां त्यांचीं एकदोन स्तोत्रें देऊन त्यांच्या उपलब्ध असलेल्या ग्रंथांची यादी दिली आहे. ह्याशिवाय, इतर ग्रंथांतीलही चरित्राचा सारांश देऊन दोन चरित्रांची समाप्ती केली आहे.

पण एक गोष्ट सांगावयाची राहिली. ती गोष्ट ही कीं, हल्लीं चरित्रें लिहिण्याचे दोन भाग झालेले आहेत. एक सोंवळीं चरित्रें, व एक ओवळीं चरित्रें. पुरातन चरित्रांना मुख्य आधार ह्मणजे पुरातनकालचेच ग्रंथ होत, व त्यांतील वर्णन पाहिलें तर, पूर्वजन्माची कथा, देहांतर करणें, मृतमनुष्य उठविणें, गतकालीन ऋषींचीं व देवांचीं प्रत्यक्ष दर्शनें घडणें, इत्यादि प्रस्तुत कालांत असंभाव्य वाटणाऱ्या गोष्टी ह्या असावयाच्याच. आणि चालू मन्वंतरांत तर काय सत्याचा आणि न्यायाचा बाजार भरलेला आहे. तेव्हां हल्लींच्या धारवाडी कांट्यांत ह्या अद्भुत प्रभावाच्या व तपःसामर्थ्याच्या गोष्टी खऱ्या कशा ठराव्यात? तेव्हां अर्थात् त्या खोट्या! बातल! तेव्हां अशा गोष्टी मानवी चरित्रांत आणल्यानें लेखकाला निखालस कलंक लागतो. त्याची गणना भोळसटांत होते. ह्यास्तव साधुसंतांचीं चरित्रें लिहिण्याचें एखाद्याच्या नशिबीं आलेंच तर दाणे, डेख, काढून जशा शेंगा वगैरे निवडून चोख करावयाच्या त्याप्रमाणें त्यांतील अद्भुत चमत्कार वगैरे सर्व नीट गाळून कोरें करकरीत किंवा अमानुष चमत्कारांचे डाग न पडलेलें सोवळें चरित्र लिहिण्याचा प्रघात पडला आहे. तेव्हां अर्थात्च असे अमानुष चमत्कार ज्यांत नमुद केलेले असतील तीं चरित्रें 'ओवळीं'! पण प्राचीनकालीं घडलेले चमत्कार घडलेच नसतील ह्याला प्रमाण काय? ज्यांनीं हीं चरित्रें लिहिलीं आहेत, ते कांहीं सामान्य मनुष्य नव्हते. ते त्या कालचे चांगले विद्वान् होते; ग्रंथकार होते. त्यांस एकदम खोटें कसें ह्मणावें? ते सारेच चमत्कार गाळले तर चरित्रामध्यें स्वारस्य तें काय राहिलें? बरें; गाळावयाच्या गोष्टी ह्मणजे तरी कोणत्या कोणत्या? आचार्यांच्या चरित्रांतीलच उदाहरण घेतलें तर, देवांच्या भेटी गाळावयाच्या, का नक्रानें पाय धरलेला खोटा ह्मणावयाचा, का परकाया-प्रवेश हें थोतांड समजावयाचें, का पांचवर्षांत वेदाध्ययन संपलें व आठव्या वर्षी संन्यासग्रहण घेतलें हें खोटें समजावयाचें? ह्या साऱ्याच गोष्टी हल्लींच्या काळांत असंभाव्य आहेत. त्या साऱ्याच गोष्टी वगळावयाच्या ह्मणजे बाकी काय शून्यच; ह्मणजे चरित्रच लिहावयाला नको. ह्या गोष्टींचा अधिक ऊहापोह आह्मी श्रीसमर्थ रामदासांच्या चरित्राच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत बराच विस्तारानें केला

आहे. ह्याकरितां त्याचा आतां अधिक विस्तार येथें नको. मुख्य गोष्ट ही की, आह्मीं लिहिलेलें हें आचार्यांचें चरित्र निखालस 'ओवळें'–आहे. अर्थात् प्राचीन ग्रंथांतून त्यांच्या तपःप्रभावसामर्थ्याच्या ज्या अद्भुत गोष्टी नमूद केलेल्या आहेत, त्या तशाच्या तशाच आह्मीं ह्यांत दाखल केलेल्या आहेत. प्रोफेसर ह्मणविणाऱ्या राजवाड्यांप्रमाणें प्राचीनकालच्या थोर, विद्वान् व वैराग्यसंपन्न महात्म्यांना भोळे, खोटसाळ ह्मणण्याचें धारिष्ट आमच्यानें झालें नाहीं, व व्हावयाचेंही नाहीं. ह्याप्रमाणें ही यथानुशक्ति झाली तशी सेवा करून श्रीमज्जगद्गुरु आद्य शंकराचार्य, व त्यांचेच अनुयायी प्रस्तुत मठाधिपति ह्यांच्या चरणीं अर्पण केली आहे, ती त्यांस व इतर गुरुभक्तांसही प्रिय होवो, अशी श्रीशंकरांची प्रार्थना करून शतप्रणामपूर्वक निरोप घेतों.

मुंबई, माधवाश्रम;
ता. ११ फेब्रुआरी सन १९१० इ.

एडिटर 'केरळ कोकिळ.'

# प्रस्तुत ग्रंथकारावर श्रीमज्जगद्गुरूंचा प्रसाद.



श्रीमच्छंकराचार्यांनीं स्थापन केलेला आद्य मठ श्रीशृंगेरी येथील मठाधिपतींनी रा० आठल्ये यांचा काव्यगुण पाहून महावस्त्र, नीलमणियुक्त स्फटिकमाला प्रसाद दिला आहे. '**गीतापद्यमुक्ताहार**' ह्या ग्रंथाची प्रथमावृत्ति प्रसिद्ध झाली, तेव्हांच ती वेंगुर्लें मुक्कामीं श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य स्वामी **मठ संकेश्वर** ह्यांनीं अवलोकन करून रा० आठल्ये ह्यांच्या कवित्वगौरवार्थ **एक प्रतिष्ठापत्र** दिलें आहे. तसाच योग 'गीतापद्यमुक्ताहाराच्या' दुसऱ्या आवृत्तीच्या वेळींही आला. ह्मणजे ही आवृत्ति तयार झाली त्याच दिवशीं पनवेल येथें श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य मठ शृंगेरी शिवगंगा–ह्यांची स्वारी येऊन त्यांनीं सदरहू पुस्तकांतील ३।४।१२।६।१८ इत्यादि अध्याय लक्ष्यपूर्वक श्रवण करून प्रसन्न होत्साते व्याख्यानास जमलेल्या घनदाट समुदायांत ग्रंथकर्त्याच्या काव्यगुणाची व चित्रकलेची प्रशंसा करून सदरहू पुस्तककर्ते राजेश्री आठल्ये ह्यांस "**महाराष्ट्रभाषाचित्रमयूर**" ही पदवी अर्पण केल्याबद्दल प्रतिष्ठापत्र अर्पण केलें. त्याची नक्कल:–

| | |
|---|---|
| नंबर १२४ | संस्थानचा मुक्काम पनवेल जि. |
| मिति मार्गशीर्ष कृष्ण १ | कुलाबा ता. १ डिसेंबर सन |
| शके १८२८ | १९०६ इ० |

**श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्यवर्य** पदवाक्यप्रमाणपारावारपारीणयमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टांगयोगानुष्ठाननिष्ठागरिष्ठ तपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्नगुरुपरंपराप्राप्तषट्दर्शनसंस्थापनाचार्य व्याख्यानसिंहासनाधीश्वर सकलवेदार्थप्रकाशक सांख्यत्रयीप्रतिपालक सकलनिगमागमसारहृद्यवैदिकमार्गप्रवर्तक सर्वतंत्रस्वतंत्रादिराजधानीश्रीमद्विद्यानगरमहाराजधानीकर्नाटकसिंहासनप्रतिष्ठापनाचार्य श्रीमद्राजाधिराजगुरुभूमंडलाचार्यतुंगभद्रातीरवासऋष्यशृंगपुरव-

राधीश्वर श्रीशृंगेरीश्रीमद्विद्याशंकरपादपद्माराधकश्रीशृंगेरीश्रीशिवगंगाश्रीगंगाधरभारतीस्वामिनां करकमलसंजातश्रीशृंगेरीश्रीशिवगंगा श्रीसुब्रह्मण्याभिनवसच्चिदानन्दभारतीस्वामिभिः ॥

**अस्मदत्यन्तप्रियमुखशिष्य रा० रा० कृष्णराव नारायण आठल्ये, 'केरळकोकिळ' पत्रिकासंपादक**—विषये श्रीनारायणस्मरणपूर्वकं विरचिताशिषः समुल्लसन्तुततरां आसेतुहिमाचलप्रसिद्धा प्रभवतु्श्रीमच्छंकरभगवत्पादपूज्यपीठविषयिणी भक्तिरनवधिकश्रेयोनिदानमिति सार्वजनीनमेतत्साम्प्रतम् ॥

**"श्रीसन्निधौभवत्समर्पितान्, ज्ञानेश्वरी, गीतापद्यमुक्ताहार, राजयोग, कर्मयोग, भक्तियोग, दासबोध, श्रीरामदासस्वामीचरित्र, इत्यादीन् ग्रंथानवलोक्य भवदीयेन भक्तिभावेन भृशं प्रसीदत्यस्मदीयमन्तःकरणं भवदीयां महाराष्ट्रकवित्वपरिपाटीं प्रवचनमाधुर्यं चित्रकलाकोविदत्वं ज्ञानेश्वरीगीतापद्यभाषांतरयाथार्थ्यं चावलोक्य परमानंदतुंदलितांतरंगैरस्माभिर्भवते "महाराष्ट्रभाषाचित्रमयूर" इत्यभिधानं दत्तं** परमानेन नाम्ना समलंकृतः श्रीशारदाचंद्रमौल्योरनुग्रहेण नवरतमभीष्टकल्याणपारंपर्यमधिगच्छेत्याशास्महे.

[सही] [शिक्का.]

श्रीमज्जगद्गुरूंचा प्रसाद ह्मणून त्यांचे आज्ञेप्रमाणेंच सदरहू पुस्तककर्त्याच्या नांवामागें आह्मी अगत्यपूर्वक '**महाराष्ट्रभाषाचित्रमयूर**' ही पदवी लावतों. परंतु कित्येक लोक ती आली कोठून? कोणीं दिली? ह्मणून टीका करतात, एवढेंच नव्हे, तर 'पदरचीच लावली आहे' असेंही कित्येकांनीं स्पष्ट ह्मटलें आहे. त्यांचा समज दूर व्हावा ह्मणून आह्मीं ही आज्ञापत्राची नक्कल मुद्दाम ह्या पुस्तकास जोडली आहे.

त्र्यं. ज. गु.
प्रकाशक.

# अनुक्रमणिका.

विषयाचें नांव. पृष्ठ.



## परिशिष्ट.

# श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्यवर्य-
# आद्य जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्य
## ह्यांचें
# विस्तृत चरित्र.

---

**पराऽगताज्ञानमनाः प्रभूय लभेत चिद्रूपसुधां मनुष्यः ।**
**यदीयमाकर्ण्यचरित्रमत्र वंदेऽहमीशं गुरुशंकरं तं ॥ १ ॥***

१ **प्रस्ताव**—कोणताही जीव घेतला, आणि त्याच्या अद्भुत चेतनाशक्तीचा विचार केला तर तोही एक ईश्वरी अंशच असल्याबद्दल आपली खात्री होते. मग जो जीव आपल्यासारख्या असंख्य जीवांचें संकटापासून संरक्षण करितो, त्यांचा उद्धार करितो, त्यांना अखंड सन्मार्ग लावून देतो, ज्याचा प्रभाव पाहून सर्व लोक चरणीं लीन होतात, त्या पुरुषाला लोकांनीं ईश्वरावतार समजणें अगदीं साहजिकच आहे. अशा प्रकारचे ईश्वरी अवतार अनेक देशांत अनेक होऊन गेलेले इतिहासप्रसिद्ध आहेत. त्यांत आमच्या देशांत तर पुष्कळच. राज्यसंस्थापक व धर्मसंस्थापक हे तर त्यांतले प्रमुख होत. पण ह्या दोहोंतही एक प्रकारें महदंतर आहे. ह्मणजे राज्यसंस्थापक हा शूरवीर असतो. त्याचा हेतु कितीही चांगला असला तरी तो आपली छाप जी लोकांवर बसवितो, ती आपल्या बाहुबलानें व तरवारीच्या धारेनें बसवितो. खून व रक्तपात हे त्याच्या पांचवीस पुजलेले असतात. त्यानें पुढें कितीही सत्कृत्यें केलीं तरीं जीवहत्येचें स्मरण बुजविण्याला कांहीं मार्ग नसतो. पण धर्मसंस्थापकाची गोष्ट तशी नाहीं. त्याचे गुण राजाच्या गुणांशीं अगदीं विरुद्ध असतात. राजाचें अंतिम स्वार्थ असतो आणि धर्मगुरूचें अंतिम परमार्थ असतो. एकाचा

---

* **अर्थः**—ज्याचें केवळ चरित्र श्रवण केल्यानेंच मनुष्याच्या मनांतील अज्ञान नाहींसें होऊन त्याला चित्स्वरूपामृताचा लाभ होतो, त्या श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्यांना नमस्कार असो.

मार्ग प्रवृत्ति व दुसऱ्याचा निवृत्ति. तो कोणाला **शब्दानेंसुद्धां दुखवीत** नाहीं, मग हत्येचें नांव कशाला ? सत्य, दया आणि क्षमा, हेंच त्याचें ब्रीद असतें. तो आपला जो पगडा बसवितो, तो मधुर वाणीनें, सत्याचरणानें व सप्रमाण सिद्धांतानें बसवितो. राजाच्या पायांशीं लोक नम्र होतात ते पूज्य भावनेपेक्षां धाकदपटशानें होतात आणि धर्मसंस्थापकाच्या पायांशीं जे लोक नम्र होतात, ते निखालस पूज्य भावनेनें केवळ आपले श्रीगुरु—मायबाप, या भावनेनें होतात. ह्मणूनच राजांपेक्षां धर्मगुरूंची योग्यता फारच मोठी आहे. ह्याचें प्रमाण पाहण्यासही लांब जाणें नको. धर्मगुरु कोणत्याच राजाच्या चरणीं लागत नाहींत, पण सारे राजे धर्मगुरूंच्या चरणीं लागतात. आपल्या भरतखंडांत असे जे कोणी धर्मसंस्थापक होऊन गेले, त्यांतील शिरोभागीं अद्वैतमताचा सिद्धांत स्थापन करणारे **श्रीमच्छंकराचार्य**, ह्यांची गणना करितात.

२ **प्रतिमा**—अशा पुण्यपुरुष व महात्म्याचें नुसतें नांव ऐकिलें तरीसुद्धां ती तेजस्वी व अद्वितीय शक्तीची मूर्ति कशी बरें असेल ? अशी सहजीं कल्पना मनांत उभी राहते. आणि त्यांत ज्या महापुरुषाला हजारों वर्षें होऊन गेलीं, त्याच्या दर्शनाविषयीं फारच उत्कंठा लागून राहते. फार कशाला ? नाना फडणीस, सवाई माधवराव ह्यांचीं हुबेहूब चित्रें पाहून मनाला केवढा आनंद होतो ! पण हे लोक फारच अलीकडचे असल्यामुळें व त्यांच्या वेळेस इंग्लिश लोकांसारख्या चतुर व कलाकुशल लोकांचा येथें प्रवेश झाला असल्यानें त्या तसबिरी आज आह्मांस उपलब्ध झाल्या. तसा प्रकार कांहीं आचार्यांच्या वेळेस नव्हता. आचार्यांना जन्मून आज १९५० ह्मणजे जवळ जवळ २००० वर्षें झालीं आहेत. तेव्हां त्यांची हुबेहूब प्रतिमा दर्शनास मिळावी कशी ? परंतु प्रयत्नाअंतीं परमेश्वर, ही ह्मण खरी आहे. आचार्यांच्या वेळेस जरी फोटोग्राफीसारखी पायाशुद्ध चित्रलेखनकला नव्हती, तरी मूर्तिकार फार चांगले होते. ह्यास्तव आचार्यांचे पहिले कट्टे प्रतिस्पर्धी जे मंडणमिश्र पंडित व पुढें त्यांस संन्यास देऊन सुरेश्वराचार्य नांव घेऊन बनलेले जे पट्टशिष्य, त्यांनीं आपल्या प्रेमळ गुरुभक्तीस्तव आचार्यांची तांब्याची प्रतिमा एका कारागिराकडून तयार करवून ती आपल्या शृंगेरी

मठांत दर्शनाकरितां ठेविली आहे, व तिचाच अस्सलबरहुकूम फोटो आह्मीं ह्या चरित्रासोबत दिला आहे. ह्यांत हल्लींच्या कालमानाप्रमाणें अगदीं रेखल्यासारखें सादृश्य जरी नसलें तरी पुष्कळ अंशानें त्यांच्या स्वरूपाशीं साम्य असलेंच* पाहिजे. त्यांतील पोषाख, आंगलट वगैरे पाहिलें तर तो कारागीरही कांहीं कमी योग्यतेचा होता, असें वाटत नाहीं, व त्याच्या कुशलतेचीही तारीफ केल्यावांचून राहवत नाहीं. ह्याकरितां प्रस्तुत त्यांच्या असलेल्याच परमपूज्य प्रतिमेचें भक्तिभावानें दर्शन घेऊन व तीस वंदन करून त्यांच्या चरित्रकथनास आरंभ करूं.

३ **पुराणपुरुषांचीं चरित्रें**—अर्वाचीन कालांतील पुरुषांचीं चरित्रें आणि पुराणपुरुषांचीं चरित्रें ह्यांत एक फार मोठा भेद असून त्याबद्दल कितीएक लोकांचा गैरसमज झालेला आहे. किंवा अलीकडील कांहीं फाजील चिकित्सक लोकांनीं सत्यशोधनाचा आव आणून दुधांत मिठाचा खडा टाकल्याप्रमाणें भक्तिभावाचें बरेंच मातेरें करून सोडलें आहे. ह्याचा परिणाम धर्माच्या दृष्टीनें अत्यंत अनिष्ट झाला आहे, व होत आहे. आणि तोच समज पुढेंही चालू राहिल्यास आपल्यांतील भक्तिरस अजिबात नष्ट होऊन सारींच अंतःकरणें साहराबाळवंटाप्रमाणें कोरडीं ठणठणीत बनून जातील. आणि आपल्या स्वाभिमानाचें व स्वध-

* ह्या आचार्यांचा अस्सल फोटो व मूळजन्मपत्रिका आमचे परमप्रिय कविमित्र रा. रा. **गजानन गोपाळ जोशी**, स्कूलमास्तर, विंचूर, ह्यांजकडून मिळाली आहे. ह्या फोटोंत आद्य श्रीमच्छंकराचार्य अशीं कानडीभाषेंत अक्षरें लिहिलेलीं आहेत. ह्या प्रतिमेबद्दल व जन्मपत्रिकेच्या सत्यतेबद्दल अनेक प्रमाणें सांपडलीं आहेत. तीं ओघाओघानें पुढें येतीलच. सदरहू तसदी घेतल्याबद्दल रा. जोशी मास्तर ह्यांचे आह्मी फार फार आभारी आहोंत. पण सर्व महाराष्ट्रीयही त्यांचें अभिनंदन करितील, अशी खात्री आहे.

काशी येथें क्षेमेश्वर घांटावर श्रीमच्छंकराचार्य, ह्यांचा एक मठ आहे. त्यांत आचार्यांची सुमारें दीड दोन हात उंचीची सफेत संगमरवरी मूर्ति असून तिचा चेहऱ्याचा भागही आह्मीं ज्या मूर्तीचा फोटो घेतला आहे, तिच्याशीं अगदीं मिळता आहे, असें तेथें प्रत्यक्ष जाऊन पाहून आलेल्या आमच्या एका मित्रांनीं आह्मांस खात्रीपूर्वक सांगितलें आहे.

र्माचें पीक सारेंच वाळून कोळ होईल, ही मोठी भीति आहे. ह्याकरितां पुराण-पुरुषांचीं चरित्रें वाचतांना तीं भक्तिभावानेंच वाचलीं पाहिजेत. वडील सांगतील तीच आज्ञा पाळणें हें मुलाचें कर्तव्य. ती आज्ञा अशी कां केली ? अमुक एक केलें ह्मणून काय होतें ? असले कुतर्क किंवा फाजिल चिकित्सा करित बसणें, हा पुत्रधर्म नव्हे. वडिलांस उलटून बोलण्याचा अधिकार जसा मुलांनां नाहीं, त्याच-प्रमाणें पुरातन कालच्या अवतारी पुरुषांच्या प्राचीन कालच्या कथेमध्येंही शंका प्रतिशंका काढित बसणें किंवा भलभलतेच प्रश्न करून त्यांचा उपहास करणें हाही आपला अधिकार नाहीं. त्यांत जें वर्णन केलेलें असेल तें शांतपणें ऐकून घेऊन त्याचा नीट विचार करावा, व त्यांतून जें काय आपल्याला सार घेण्या-सारखें असेल तेवढें घ्यावें ह्मणजे झालें. एखादी अघटित गोष्ट वर्णन केलेली असली, तर ती निखालस खोटी-केवळ बनावटच सांगितली आहे, असा एक-दम मनाचा कधींही ग्रह होऊं देऊं नये. तर ती आपल्या तर्काच्या बाहेरची आहे असें समजून तिच्याबद्दल झाल्यास विचार करावा. नाहींतर ज्या व्यक्तीच्या संबं-धानें ती गोष्ट सांगितली असेल, ती व्यक्तिही तशीच कर्तुं, अकर्तुं, अन्यथाकर्तुं अशी समर्थ असल्यामुळें तशी गोष्ट होणेंही शक्य आहे असेंच मानावें. कुतर्क घेऊन चरित्रनायकाविषयीं व चरित्रलेखकाविषयींही आपलें मन कलुषित करून घेणें बरें नाहीं. कारण, एक तर अशा गोष्टी फार प्राचीन कालीं घडलेल्या असल्यामुळें, त्या वेळेची स्थिति व हल्लींची स्थिति ह्यांत महदंतर असतें. तेव्हां सांप्रतच्या स्थितीवरून त्या कालच्या स्थितीस नांवें ठेवणें हें अविचाराचें काम होय. कित्येक वेळां तें सारें सत्यरूपच असतें. पण त्याचें स्वरूप आपल्या मनांत नीटसें उतरलें नाहीं, तर आपण त्याचा अर्थ भलताच करतों. आणि त्यामुळें भ्रमांत पडतों. प्राचीन ग्रंथांत ‘ भवसागर ’ हा शब्द वारंवार वापरण्यांत येतो. ह्मणून संसार हा एक खरोखरच समुद्र आहे असा जर एखाद्यानें आपल्या मनाचा ग्रह करून घेतला, तर त्याचा साराच घोंटाळा उडेल. संसार हा कांहीं खरोखर समुद्र नव्हे. तर समुद्राचें आणि त्याचें पुष्कळ बाबतींत साम्य आहे इतकेंच. त्याचप्रमाणें कित्येक ठिकाणीं केवळ कविकल्पनाच असतात. आणि कित्येक

ठिकाणीं चरित्रनायकाच्या पुण्याईचीच खरोखर सद्दी असते. त्यामुळें त्यांच्या तपःप्रभावानेंही कित्येक गोष्टी खरोखरीच अघटित घडलेल्या असतात. ती शक्ति व तें तेज सांप्रतकाळीं नष्टप्राय झालेलें आहे. पुराणपुरुषांच्या चरित्रामध्यें अलीकडच्या सुधारक व चिकित्सक लोकांनां एकच मुद्दा वादाचा किंवा संशयाचा असतो. तो मुद्दा ह्मणजे हाच कीं, प्राचीन कालच्या पुरुषांनीं केलेले अद्भुत किंवा अमानुष चमत्कार. हे अद्भुत चमत्कार हल्लीं तरी कोठें नाहींत? मग त्यांसच खोटें धरून कां चालावें? सांप्रतकाळींही जर शिंगाचीं मनुष्यें असल्याचें सिद्ध आहे, तर शृंगऋषीचें वर्णनच मिथ्या कां? बाबू अरविंद घोसांचे बंधु जर आपलें योगासन दोन हात अंतरिक्षांत नेतात, तर शंकराचार्यही योगसिद्धीनें आकाशमार्गें मंडणमिश्राच्या वाड्यांत शिरले, याबद्दल तरी संशय कां घ्यावा? युरोपामध्यें जर आजमितीस बिनधोक विमानें उडत आहेत, तर श्रीरामचंद्राचें पुष्पक विमानच केवळ कल्पनेचें कां मानावें? अमेरिकेंतील डाक्टरानें मेलेलें मूल जिवंत केलें ही गोष्ट खरी मानावयाची, व आचार्यांनीं मात्र ब्राह्मणपुत्र उठविलेला खोटा मानावयाचा हा मूर्खपणा होय. पांच वर्षांत सर्व वेदाध्ययन; आठव्या वर्षीं संन्यास व मठस्थापना; बत्तीस वर्षांत आसेतुहिमाचल दिग्विजय करून काश्मीरांतील सरस्वतीपीठावर आरोहण करणें, ह्या गोष्टी तरी प्राकृत मनुष्याच्या हातून होणें शक्य आहेत काय? ह्यावरूनच त्यांचें बुद्धिवैभव केवळ लोकोत्तर असून त्यांचें चरित्रही तसेंच अद्भुत—सामान्य जनाहून पुष्कळ निराळें—असलें पाहिजे. ह्याकरितां त्यांच्या चरित्राच्या संबंधानें प्राचीन कालापासून ज्या ज्या गोष्टी वर्णन केलेल्या आहेत, त्या त्या सर्व खऱ्याच आहेत असें धरून भक्तिभावानें वाचण्यांतच वाचकांना सच्चरित्राच्या खऱ्या खऱ्या फलश्रुतीचा लाभ घडेल. एरवीं कधींच घडावयाचा नाहीं. फार कशाला? इसापनीतींतील साऱ्या गोष्टी कुत्र्यामांजरासारख्या पशुपक्ष्यांच्याच आहेत. पण त्यांत नीतिज्ञान किती ओतप्रोत भरलें आहे बरें? त्यांत जर एखादा मनुष्य 'मांजरें बोललीं कशीं?' 'जनावरांस त्या कालीं भाषा होती कीं काय?' इत्यादि वाचाळपणा करूं

लागला तर तो मूर्ख समजला पाहिजे. कारण, ज्याला त्यांतील खरें हृद्य ग्रहण करण्याची शक्ति असेल, त्याला असे कुतर्क काढावयाचें सुचणारच नाहीं. तो त्यांतील रहस्याच्या आनंदांत डुलतच राहील. कुत्र्यामांजरासारख्या क्षुल्लक जनावरांच्या गोष्टींनांसुद्धां जर ही गोष्ट लागू आहे, तर संतचरित्राचें श्रवण भक्तिभावानें कां बरें करूं नये ? आणि त्यांतील अलौकिक सामर्थ्याचा विचार करून त्यांतील सारभूत भाग अत्यंत उल्हासानें कां ग्रहण करूं नये ? तेंच करणें अत्यंत इष्ट होय. ह्मणूनच तुकारामांनीं ह्मटलें आहेः—

**ऐका ऐका भाविकजन । कोण कोण व्हाल ते ॥ १ ॥**
**सोडा तार्किकाचा संग । पांडुरंग स्मरा हो ॥ २ ॥**
**नका शोधूं मतांतरें । तुमगे खरें बुडाल ॥ ३ ॥**

हा तुकाराम महाराजांचा अगदीं शेवटचा उपदेश आहे व त्यांत असे भलतेच तर्कवितर्क काढित बसण्यांत अर्थ नाहीं, त्यापासून खरें तत्त्व न समजतां आपल्या अंतिम साध्याचा लाभ मात्र अंतरतो, हेंच सांगितलें आहे.*

दुसरी गोष्ट कालाच्या संबंधाची. प्राचीन कालच्या पुरुषांच्या चरित्रामध्यें कालाचा बरोबर निश्चय सांगितलेला नसतो, व कोठें कोठें कोणीं कोणीं केलेला असला तर, त्या परस्परांचा मेळ बसत नाहीं. पण त्याबद्दल विशेष चिकित्सा करित बसून वृथा कालक्षेप करण्यांतही कांहीं अर्थ नाहीं. किंवा त्या ग्रंथकारांस दोष देणेंही योग्य नाहीं. कारण, आधीं हीं चरित्रें ह्मणजे किती कालांतराचीं आहेत हा विचार मनांत आणावा. हीं चरित्रें ह्मणजे हजारों वर्षांचीं होत. त्यांमध्यें किती तरी राज्यक्रांति झाल्या; भाषा बदलून गेल्या; रितीरिवाज पालटले; त्या चरित्रांच्या हातानें लिहून लिहून हजारों प्रति होत आल्या, व तितक्या प्रतीगणिक अंक चुकणें, संशय उत्पन्न होणें, अक्षरांना कसर लागणें, '**अंकां-**

* सदरहू विषयाचा अधिक ऊहापोह आह्मीं आमच्या '**श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या समग्र चरित्रा**'च्या प्रस्तावनेंत केलेला आहे. तोही वाचकांनीं अवश्य वाचून पहावा.

**नां वामतो गतिः'** इत्यादि पद्धतीनें हस्तदोष होणें, वगैरे अनेक उलाढाली झालेल्या असतात. तेव्हां त्याबद्दल दोष देण्यांत किंवा हळहळ करित बसण्यांतही कांहीं अर्थ नाहीं. जेवढें आज मितीस उपलब्ध आहे तेवढेंच पुष्कळ असें मानून असेल तेवढेंच गोड करून घ्यावें, व तेवढ्याचेंच कौतुक करावें हेंच आपणांस आज भूषण व हितावह आहे.

शिवाय, हल्लीं चरित्रांना जसें इतिहासाचें स्वरूप आलें आहे, तसें प्राचीनकालीं नव्हतें. प्राचीन कालीं चरित्र कथन करतांना चरित्रनायकाचा वृत्तांत सांगण्याकडे विशेष ओढा असे. कालाच्या संबंधांत इतकें बारकाईनें लक्ष्य देत नसत. त्यांतही विशेषेंकरून त्या पुरुषानें सामान्य जनापेक्षां अधिक काय काय केलें ? ईश्वरी अंशाच्या प्रभावानें त्यानें अलौकिक चमत्कार कोणकोणते दाखविले? तें सांगण्याकडे विशेष प्रवृत्ति होती. ह्याकरितां वाचकांनींही त्याच उद्देशावर लक्ष्य ठेवून हीं चरित्रें वाचावींत. कालनिर्णयाच्या किंवा संगति लावण्याच्या वगैरे फारसें भानगडींतच पडूं नये. इष्ट हेतु साध्य करावयाचा तो करावा ह्मणजे झालें. **विवेकानंद**स्वामींनीं एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं 'गीतेंतील जें काय सार ग्रहण करावयाचें तें आपण मुकाट्यानें ग्रहण करावें ह्मणजे झालें. कृष्ण गोकुळांत जन्मला, कीं मथुरेंत जन्मला ? युद्धाचे वेळीं त्यानें गीता सांगितली कशी ? त्याला कविता करावयाचा अभ्यास होता ह्याला पुरावा काय ? तो संस्कृत कोठें शिकला ?' असे वायफळ प्रश्न करून काथ्याकूट करीत बसण्यांत हांशील नाहीं. अंबराईत गेल्यावर मुकाट्यानें पिकलेले उत्तम इरसाल आंबे घेऊन खाणाराच शहाणा होय. 'ही बाग केवढ्याची ? लावून किती दिवस झाले ? येथें पूर्वीं काय होतें ?' असली नसती चौकशी करून उपाशीं पोटीं परत येणाऱ्यासारखा मूर्ख कोणीच नाहीं. ह्यासाठीं ह्यांतील सार काय तें काढून त्यावरच तृप्त होणें हा मार्ग सुखकर होय, व त्यालाच खऱ्या परमानंदाचा लाभ होईल.

**४ पुरातन समजुती व शोध**—ह्यासंबंधानेंही आरंभींच दोन शब्द सांगणें अवश्य आहे. सांप्रतकालीं पाश्चिमात्य शास्त्रवेत्त्यांनीं कृमिकीटकादिकांच्या हालचालींचा सूक्ष्म दृष्टीनें विचार करून त्यांच्या संबंधानें पुष्कळ चमत्कारिक शोध

लावलेला आहे. मुंग्यांमध्यें राजा असतो; राणी असते; शूर वीर असतात; लढाया होतात; गायी बाळगतात; लूट जमवून आणतात; पूल बांधतात; शहरें वसवितात; मिशांच्या आंकड्यांनीं भाषा बोलतात. हा अर्वाचीन शास्त्रवेत्त्यांनीं जड स्वरूपांचा शोध लावला आहे. पण आमच्यांतील प्राचीन शास्त्रवेत्त्यांची मजल त्याच्याही पलीकडे गेलेली आहे. ह्मणजे त्यांनीं जडसृष्टीपेक्षांही सूक्ष्मसृष्टीचा विचार फार दूरवर केलेला आहे. हलींचें अवलोकन ह्मणजे किडा मुंगीपासून फार तर मनुष्यप्राण्यापर्यंतच आहे. पण आमच्या पूर्वजांनीं त्याच्याही पलीकडचा शोध लावलेला होता. ह्मणजे अदृश्य सृष्टीचे व्यापारही त्यांस कळत. पिशाचसृष्टी, यक्ष, गंधर्व, किंनर व देव ह्यांच्या व्यापारांची सुद्धां त्यांस माहिती होती व त्याबद्दल त्यांनीं पुष्कळ परिश्रम केलेले होते. यक्ष, किन्नर, गंधर्व देव इत्यादि योनि मनुष्यांच्याही वरच्या असून त्यांचे देह अदृश्य असतात असा त्यांचा सिद्धांत होता. आपण ज्याप्रमाणें गायी वगैरे जनावरांची काळजी वाहतों, व त्यांच्यावर आलेल्या किंवा येणाऱ्या संकटांचा विचार करतों, त्याचप्रमाणें मनुष्यमात्रांवर आलेल्या संकटांचा विचार देवकोटीमध्यें नेहमीं चाललेला असतो. वांद्र्यामध्यें हजारों गोमातांचा प्रत्यहीं वध होतो ह्मणून 'गोरक्षण' करणें इष्ट आहे. ह्मणून आह्मी त्याविषयीं प्रयत्न करित असतों. पण गाईनां ज्ञान नसल्यामुळें त्याबद्दल कल्पनाही नसते. त्याचप्रमाणें आह्मी देवांहून पुष्कळ अज्ञान असल्यामुळें आह्मांला जरी कल्पना नसते तरी, देवलोकामध्यें आमच्या संकटाबद्दल व दुःखमुक्ततेबद्दल नेहमीं देवांमध्यें प्रयत्न सुरू असतात. मृत्युलोकावर कोणीं पुंडावा माजविला, व सज्जनांना त्रास होऊं लागला, धर्मकर्में लयास गेलीं, ह्मणजे देवलोकामध्यें सामान्य देव त्याचा विचार करून ती गोष्ट शंकर, विष्णु, इत्यादि श्रेष्ठ देवांना श्रुत करतात. नंतर तेथें सर्वांसमक्ष त्याबद्दल खल होतो. आणि त्याच्या प्रतिकारार्थ कोणी कोणी कसकशीं मानवी स्वरूपें धारण करून मृत्युलोकावर यावें, व काय काय कार्य करावें ह्याबद्दल शहानिशा होऊन निश्चय ठरतो. नंतर एक किंवा अनेक देव मृत्युलोकावर मनुष्यदेह धारण करून येतात. त्यांसच अवतार किंवा अवतारी पुरुष असें ह्मणतात. देव

हे मूळचे निराकार व अदृश्यरूप आहेत. ते अवतार घेतात, तेव्हांच दृश्यरूपास येतात, व मनुष्यापेक्षांही अघटित लीला करतात. हा प्राचीन लोकांचा सिद्धांत व शोध लक्ष्यांत ठेवला म्हणजे पुराणपुरुषांच्या चरित्रांची संगति नीट लक्ष्यांत येते. ह्याकरितां ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून पुढील चरित्र वाचावें.

५ **ईश्वरी संकेत**–ह्या मृत्युलोकावर वैदिक धर्म हा अगदीं अनादिकालापासून चालत आला आहे. कदाचित् लेखनकलाही परिपूर्ण अवस्थेंत आलेली नव्हती अशा कालापासून हाच एक धर्म प्रचारांत आहे. वेद हे अनंतकालाचे असून ते अपौरुषेय आहेत, असा निदान आर्य लोकांचा तरी समज आहे. वेदांचा अति शुद्ध पाठ अनंत कालापासून ऋषि व ब्राह्मण परस्परांस पढवून मुखानेंच चालवित आले आहेत. ह्मणूनच त्यांस 'श्रुति' असें ह्मणतात. वेदांइतका श्रेष्ठ व पुरातन ग्रंथ पृथ्वीवर दुसरा कोठेंच उपलब्ध नाहीं. आर्य लोकांनीं त्यांचेंच आजपर्यंत जिवापलीकडे संरक्षण केलें आहे. व ते बुडण्याचा समय प्राप्त झाला असतां ते लोक 'आह्मांस संकटांतून मुक्त करा' अशी देवांची प्रार्थना करितात, व अशा समयास देवही आपण होऊनच त्याचा विचार करून जगतीतलावर अवतीर्ण होऊन त्यांचें संरक्षण करितात. ही वहिवाट पुरातन कालापासून चालत आलेली आहे, व त्यास श्रीमद्भगवद्गीतेंतील:—

> **यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
> **अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं ॥ १ ॥**
> **परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्।**
> **धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ २ ॥**

'जेव्हां जेव्हां धर्माचा ऱ्हास होऊन अधर्माचा फैलाव होतो, तेव्हां तेव्हां, साधूंचें संरक्षण करण्यासाठीं, दुष्टांचा संहार करण्यासाठीं, व धर्माची पुन्हा स्थापना करण्यासाठीं युगायुगामध्यें मी मनुष्याच्या देहानें पृथ्वीवर अवतार घेऊन येतों' असें प्रत्यक्ष भगवंताचें वाक्य आहे. आणि चमत्कार हा कीं, हे अवतार कोणाचे व केव्हां होणार हें भविष्यपुराणांतून पूर्वींच लिहून ठेवलेलेंही आहे. कूर्मपुराण अध्याय ३० यांतील वचन येणेंप्रमाणें होतें:—

**कलौ रुद्रो महादेवो लोकानामीश्वरः परः ।**
**करिष्यत्यवतारं स्वं शंकरो नीललोहितः ॥ १ ॥**
**श्रौतस्मार्तप्रतिष्ठार्थं भक्तानां हितकाम्यया ।**
**उपदेक्ष्यति तज्ज्ञानं शिष्याणां ब्रह्मसंमितम् ॥ २ ॥**
**सर्वं वेदांतसारं च धर्मान्वेदनिदर्शनम्...... इ०**

श्रुतिस्मृतिप्रतिपादित धर्माची प्रतिष्ठा करण्याकरितां व तेणेंकरून भक्तांचें हित साधण्याकरितां, परमेश्वर जो महादेव तो कलियुगांत स्वतः अवतार धारण करील आणि ज्यांत ब्रह्मस्वरूपाचा विचार सांगितला आहे, तें वेदांतांतील सार-भूत ज्ञान शिष्यांस पढवील.

ह्याप्रमाणें पूर्वीं ज्ञात्यांनीं व पौराणिकांनीं भविष्यही करून ठेवलेलेंच होतें. पण हें भविष्य खरें होण्याला पृथ्वीवरही तशीच स्थिति प्राप्त व्हावी लागते. ह्मणजे दुर्जन, पाखांडी वगैरे उत्पन्न होऊन धर्माची ग्लानि व्हावी लागते. ती कशी काय झाली होती, व पुढें हें भविष्य कसें काय प्रत्ययास आलें, ह्याचा आतां थोडक्यांत वृत्तांत सांगूं.

६ **वैदिक धर्माची ग्लानि**–बाललीला आणि ईश्वरी लीला, ह्या बहुतेक अंशीं सारख्याच असतात. मुलें आपणच लघोऱ्या उभ्या करितात व आपणच चेंडू मारून त्या पाडतात आणि पुन्हा उभ्या करून त्या पुनः पुनः पाडण्याचा व रचण्याचा त्यांचा क्रम सुरूच असतो. तीच गोष्ट ईश्वरी लीलेलाही लागू पडते. परमेश्वर आपणच हरणाचें रूप घेतो, आणि व्याघ्र होऊन आपणच त्याच्या पाठीस लागतो. इतकेंच नव्हे, तर मनुष्यरूप घेऊन बंदुकीनें वाघाला गोळी घालणाराही तोच. हा विचार मनांत आला ह्मणजे ईश्वरी लीला ह्मणजे एक प्रकारचा नाटकाचाच खेळ आहे असें वाटतें. नाटकांतील नट निरनिराळे रंग लावून व निरनिराळे पोषाख घालून कोणी राजा होतो; कोणी राणी होतो; कोणी हुजऱ्या होतो; व कोणी दासी होतो. पण दोन चार तास गेले न गेले तोंच ते आपापला रंग पुसून टाकतात, पोषाख उतरतात आणि सारे एक होतात.

राजा, राणी, दुजऱ्या दासी साऱ्या एक! भेद ह्मणून नाहीं. त्याचप्रमाणें ह्या परमेश्वराच्या सृष्टिरचनेचें कौतुक आहे. ईश्वरी सृष्टीची घडामोडही अशीच निरंतर चाललेली असते. तिला अनुसरूनच धर्मासंबंधीही घडामोड चालू असते. वेद हे अनादिकालापासून परमेश्वरानेंच निर्माण करून ऋषि आणि मुनि यांजकडून त्याचें संरक्षण करवून धर्मस्थापना केली आहे. पण त्यांतही ह्याच क्रम. ह्मणजे प्रथम त्या धर्माचा प्रसार करावयाचा; कांहीं कालानंतर दुसरे पाखांडी व बुद्धिभेद करणारे पंडित उत्पन्न करून तोच धर्म डळमळित करून लोकांची श्रद्धा त्याच्यावरून उडवीत सुटावयाचें. आणि जिकडे तिकडे धर्माचा लोप होऊन पाखांड मत माजून राहिलें कीं, आपण स्वतः अवतार धारण करून पुन्हा त्या धर्माची महती सिद्ध करून पुन्हा सर्वांस सन्मार्गास लावावयाचें, हा नित्याचाच सृष्टिक्रम दृष्टीस पडतो. त्याप्रमाणें अर्थातूच आचार्यांचा अवतार होण्यापूर्वीं तशीच स्थिति होऊन वैदिक धर्माची श्रद्धा मोडत चालली होती. धर्माला व समाजाला मोठें विघातक ह्मटलें ह्मणजे पाखांड किंवा नास्तिक मत हें होय. कारण, ईश्वर ह्मणून कोणी सृष्टीचा नियंताच नाहीं अशी मनाची समजूत झाली ह्मणजे मनुष्याच्या मनाला मुळींच धाक राहत नाहीं, व पातकाची प्रवृत्ति होते. कलियुग लागेपर्यंत हें पाखांडाचें किंवा नास्तिकांचें बंड फारसें कोठें असल्याचें दिसून येत नाहीं. परंतु कलियुगाचा आरंभ होतांच ज्ञात्यांनीं वर्तविलेल्या भविष्याप्रमाणें नास्तिकांची सुरवात झाली. युधिष्ठिर शकाच्या आरंभींच— कलियुगाचा आरंभ व युधिष्ठिर शकाचा आरंभ एकच आहे. पृथ्वीवर नास्तिकांची संख्या वाढूं लागली. त्यांत सहा नास्तिक प्रमुख असून '**चार्वाक**' हा त्यांपैकीं अग्रगण्य होय. ह्मणून त्याला पुराण कालापासून 'नास्तिकशिरोमणि,' अशीच संज्ञा आहे. ह्याचें जन्म युधिष्ठिर शक ६६१ वैशाख शु० १५ अवंति देशांत शंखोद्धार क्षेत्रामध्यें झालें. ह्याच्या बापाचें नांव **इंदुकांत** व आईचें नांव **रुग्विणी** असें होतें. हा आपल्या ६६ व्या वर्षीं मरण पावला. हा मोठा विद्वान् असून वाद करण्यामध्यें मोठा पटाईत होता. ह्याच्या मताच्या प्राबल्यामुळें सनातन धर्माची विलक्षण क्रांति होऊं लागली. ह्याचीं मतें निखालस नास्ति-

कपणाचीं होतीं. ह्मणजे त्यांत नीतीचा व सौजन्याचा लेशही नव्हता. त्यांतील थोडासा सारांश येथें देतों.

१ ईश्वर ह्मणून मुळींच नाहीं; परलोक नाहीं, व परलोकच्या यातनाही नाहींत.

२ धर्म हें केवळ स्वार्थी व पोटभरू भटांनीं माजविलेलें थोतांड आहे.

३ आत्मा अमर आहे ह्या ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पान, सुपारी, कात, चुना, एकत्र केल्यानें जसा तांबडा रंग उत्पन्न होतो, त्याप्रमाणें कांहीं तत्त्वांच्या संयोगानें देह उत्पन्न होऊन दारूच्या कैफाप्रमाणें आत्मा किंवा जीव उत्पन्न होतो. ह्मणून देहाबरोबर त्याचाही लय होतो.

४ श्राद्धांत पिंडदान केल्यानें जर तें पितरांस पोंचतें, तर तळमजल्यांत स्वयंपाक केल्यावर तो वरच्या मजल्यावर कां न जावा ?

५ ह्या कुलपाची किल्ली ह्मटली, तर ती त्याच कुलपाला चालली पाहिजे. तरच ती त्या कुलपाची किल्ली. ती जर हव्या त्या कुलपास लागू होईल तर ती अमक्याच कुलपाची किल्ली आहे असें ह्मणण्यांत अर्थ कोणता ? त्याचप्रमाणें अमुक एकाची स्त्री असें निश्चित करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पाहिजे त्यानें पाहिजे त्या स्त्रीचा उपभोग घ्यावा.

६ यमयातनाच जर नाहींत तर भ्यावें कशाला ? खुशाल ऋण काढून सण करावा. कारण, देह गेला कीं सर्व आटोपलें.

इत्यादि त्याचीं मतें अत्यंत भयंकर व समाजाला अत्यंत विघातक अशीं होतीं. व शिवाय तो बोलण्यांत मोठा चतुर असल्यानें त्याचीं तीं मतें तो दृष्टांतानें वगैरे फारच खुलवून देत असे. ह्यामुळें हें नास्तिक मत प्रथमतः उत्पन्न होऊन व तें बळावत जाऊन लोकांची धर्मावरील श्रद्धा उडत चालली, व त्याच मताचे आणखीही त्याचे अनुयायी उत्पन्न होऊं लागले. पण ह्याच्या पश्चात् जे नास्तिक झाले ते फार निराळ्या प्रकारचे होते. ह्मणजे ते सौम्य होते. बुद्ध व सुगत ह्मणजे जैन धर्मी लोक ह्यांची गणनाही नास्तिकांतच केलेली आहे. पण चार्वाकाच्या मतांत व बौद्धांच्या व जैनांच्या मतांत महदंतर होतें. बुद्धाचें मत फक्त परमेश्वर नाहीं येवढेंच होतें. पण आपला आत्मा हाच परमेश्वरस्वरूप आहे

त्यासच सदाचरणानें व परोपकारानें पूर्णत्व येतें असा त्याचा उपदेश होता. ह्मणून मनुष्यानें स्वच्छंद वर्तन करावें हें मात्र त्यास मान्य नव्हतें. इतकेंच नव्हे, तर सत्कर्म करणें, परोपकारार्थ देह झिजवणें हेंच आपलें कर्तव्य व जन्माची इतिकर्तव्यता असाच त्याचा सिद्धांत होता. ह्मणजे त्याचीं मतें समाजाला फारशीं किंबहुना मुळींच विघातक नसून 'अहिंसाः परमो धर्मः' हेंच त्यांचें मुख्य तत्त्व असल्यानें बहुजनसमाजास तीं अत्यंत उपयोगीं होतीं. परंतु तो परमेश्वराचें अस्तित्व मान्य करित नसे हें एक; आणि वेद हें थोतांड आहे असें तो प्रतिपादन करित असे हें दुसरें; ह्यामुळें वैदिक धर्माभिमान्यांनीं त्याचा पुष्कळ छळ केला व त्यास आपल्या देशांतून हाकून लावलें. ह्मणून त्यानें आपला धर्म चीन, जपान, सिलोन वगैरे अन्य स्थळीं जाऊन प्रचारांत आणला. ह्या मताचा मूळ प्रवर्तक गौतमबुद्ध हा होय. ह्याचें जन्म युधिष्ठिरशक १३१२ मध्यें उत्तरकोसलांतील कपिलवस्तु नगरांत झालें होतें. ह्याचा बाप राजा असून त्याचें नांव शुद्धोदन व आईचें नांव मायादेवी. हा लहानपणापासूनच विरक्त होता. ह्याला अत्यंत सुस्वरूप राजकन्या पत्नी मिळालेली असून तिच्या पोटीं त्याला पुत्ररत्न झालें असूनही तो आपल्या सर्व राज्यवैभवावर लाथ मारून विरक्त झाला होता. पुन्हा कदाचित् मोहपाशांत पडेन ह्या भीतीनें त्यानें आपल्या सुकुमार पुत्राचें शेवटचें मुखावलोकनही केलें नाहीं. इतकें त्याचें वैराग्य कडकडीत होतें. ह्यानें जो धर्मप्रसार केला, त्याला बौद्धधर्म असें ह्मणतात. बौद्धधर्माचीं तत्त्वें फार उदात्त असून तीं समाजाच्या फार हिताचीं आहेत. तथापि त्यांच्यामध्यें ईश्वर मुळींच मानित नसल्यामुळें व वेद हे प्रमाण धरित नसल्यामुळें बौद्धधर्माची गणनाही नास्तिकांतच केलेली आहे. जैन धर्मही जवळ जवळ तसाच आहे. त्यांतही 'अहिंसाः परमो धर्मः' हेंच तत्व प्रमुख आहे. परंतु त्याचाही वेदावर कटाक्ष असल्यामुळें त्याचीही गणना पाखांड्यांत किंवा नास्तिकांतच केलेली आहे. ह्याशिवाय शाक्तपंथी व देवीउपासक ह्यांचेंही बंड फार माजलें होतें. मद्यमांसावांचून त्यांचा नैवेद्यच होत नसे! हें मत समाजाला दुर्व्यसनांत गुंतविणारें होतें. आणखी गणपतिउपासक, भैरवउपासक वगैरे अनेक पंथ उत्पन्न होऊन देवतांचा साराच

घोटाळा माजून राहिला होता. आणि वैदिक धर्म शिथिल होऊन वेदोपनिषदांचीं तत्त्वें कोणासच कळेनाशीं झालीं होतीं. अशा प्रकारें वैदिक धर्माचा ऱ्हास झाल्यामुळें कोणीतरी अवतारी पुरुष उत्पन्न होऊन पुन्हा वैदिक धर्माची स्थापना करण्याची संधि अनायासेंच चालून आली, व त्याप्रमाणेंच पुढें अवतार झाले.

७ **देवांचा संकल्प**—कथाकीर्तनें व पुराणें ह्यांचें नित्य श्रवण करणारांना नारदऋषींचा स्वभाव माहितच आहे कीं, ते ब्रह्मवीणा खांद्यावर टाकून त्रिभुवनांत संचार करणारे होते. त्यांस मृत्युलोकाची फार काळजी असे. ह्या जगावर कांहीं कमजास्ती आढळल्यास ते देवलोकांत जाऊन त्याबद्दल वर्दी देत असत. हरिश्चंद्राच्या पुण्यकीर्तीची ह्यांनींच देवलोकीं तारिफ केल्यामुळें विश्वामित्रांत व वसिष्ठांत वाद उत्पन्न होऊन त्या बिचाऱ्याचा हकनाहक छळ झाला, व अखेर विश्वामित्र ऋषीचा पराजय होऊन सर्व तपश्चर्येवर उदक सोडावें लागलें! असो. ह्या त्यांच्या नेहेमींच्याच स्वभावाप्रमाणें ह्याच संधींत नारदमुनींची स्वारी मृत्युलोकीं आली. तेथील वैदिक धर्माच्या संबंधानें झालेली शोचनीय स्थिति त्यांच्या दृष्टीस पडली. तेव्हां ते ब्रह्मलोकास जाऊन त्यांनीं आपला पिता जो ब्रह्मदेव त्यास तो वृत्तांत निवेदन केला. तेव्हां ब्रह्मदेवांनीं इंद्रादि सकल देवांस एकत्र बोलावून पृथ्वीवर वेदधर्माचा कसकसा उच्छेद झाला आहे त्याचें कथन केलें. त्यामुळें साऱ्याच देवांना चिंता उत्पन्न झाली. व त्याकरितां कांहीं तरी लौकरच तजवीज करणें अवश्य आहे असें त्यांसही वाटूं लागलें. ह्यास्तव सर्व देवांनीं ही गोष्ट सर्वश्रेष्ठ श्रीशंकरींस कळविण्याचा विचार करून ते तसेच कैलासास गेले आणि ब्रह्मा आदिकरून सर्व देवांनीं शंकराची स्तुति केली. तेव्हां शंकर प्रसन्न होऊन ह्मणाले " हे ब्रह्मादिदेवहो! तुमची स्तुति श्रवण करून मी फार प्रसन्न झालों आहें. तर तुह्मी सर्व मिळून मजकडे येण्याचें कारण काय? येवढें तुह्मांवर कोणतें संकट पडलें आहे तें निवेदन करावें." त्यावर ब्रह्मदेवांनीं प्रार्थना केली कीं, 'हे प्रभो! हे देवाधिराज! मृत्युलोकावर चार्वाकादि नास्तिकांचें बंड मोडण्याकरितां श्रीविष्णूंनीं बुद्धाचा अवतार घेऊन त्यांचें खंडण केलें. परंतु तेंच मत लोकांत प्रचलित होऊन अज्ञान लोक गैरसमजुतीनें वेदांचा

अवमान करूं लागले आहेत. कर्मकांडाचा लोप होऊन गेला; वेदांना कोणी विचारीनासे झाले. परमेश्वर मुळींच नाहीं असें समजतात, यामुळें जिकडे तिकडे अज्ञान माजून यज्ञयागादिक सर्व क्रिया बंद पडल्या आहेत, व तें मत असेंच पुढें माजून राहील तर प्रजेची दुर्दशा होईल. ह्याकरितां पृथ्वीवर मनुष्यांचा तरणोपाय होईल अशी कांहीं तरी कृपादृष्टीनें तजवीज करणें अवश्य आहे.' ही प्रार्थना ऐकून शंकरांनीं क्षणभर विचार केला आणि मग आपला वडील पुत्र कार्तिकस्वामी ह्यास हाक मारून त्यास आज्ञा केली कीं "तूं सर्वांच्या आधीं मृत्युलोकावर जाऊन कुमारिलभट्ट या नामेंकरून अवतार घेऊन वैदिक धर्माची स्थापना करावी. इंद्रास आज्ञा केली कीं, तूं सुधन्वा राजा होऊन त्यास साहाय्य करावें, व विधर्मी लोकांचा मोड करावा." नंतर ते ब्रह्मदेवास ह्मणाले कीं "आपण मंडणमिश्रनामेंकरून ब्राह्मणाचा अवतार धारण करून कर्मकांडाची स्थापना करावी, व सरस्वतीनें अवतार घेऊन आपल्यास पत्नीच्या रूपानें साह्य करावें. नंतर मागाहून मी स्वतः शंकराचार्य ह्या नामेंकरून अवतार धारण करून ज्ञानकांडाचा प्रसार करीन." ह्याप्रमाणें निश्चय ठरल्यानंतर इतर देवांनींही श्रीशंकरास साहाय्य करण्याचा संकल्प केला तो असा–विष्णूंनीं पद्मपाद व्हावें; वायूनें हस्तामलक व तोटकाचार्य ह्या रूपानें अवतीर्ण व्हावें. बृहस्पतींनीं आनंदगिरीचा अवतार घेऊन शिष्यत्व पतकरावें. सूर्यांनीं सनंदनाचा अवतार घ्यावा; व वरुणांनीं चित्सुख या नामेंकरून शिष्य व्हावें. ह्याप्रमाणें सर्व देवांनीं अवतारकृत्यें वाटून घेऊन जगदुद्धाराचा संकल्प केला, व तदनुरूप पुढें एक एक अवतार उत्पन्न होऊन त्यांच्या लीला सुरू झाल्या. त्यांचें वर्णन पुढें येईल.

८ **कुमारिलभट्ट**–पूर्वीं सांगितल्याप्रमाणें चार्वाकादि नास्तिकांचें प्राबल्य होऊन त्यांच्या मतांचा प्रसार झाल्यावर श्रीविष्णूंनीं गौतमबुद्धाचा अवतार धारण केला. पण त्याच्या योगानें अधार्मिक नास्तिकांचें बंड कमी झालें, व सत्कर्माकडे व परोपकाराकडे लोकांची प्रवृत्ति झाली हें खरें. पण बुद्धाचें मत परमेश्वर नाहीं, व वेद हें प्रामाण्य नव्हे, असें असल्यामुळें वैदिक धर्मावरची श्रद्धा उडत जाऊन कर्म व ज्ञान ह्यांचा लोप होऊन तीं बहुतेक नामशेष होऊन राहिलीं होतीं.

जैन धर्म हा बुद्धाच्याच पाठोपाठ उत्पन्न होऊन त्याचाही जिकडे तिकडे फैलाव झाला होता. जैनधर्माचें मूलतत्त्व बौद्ध धर्माप्रमाणेंच 'अहिंसाः परमो धर्मः' हेंच असल्यानें जीवांचा नाश न व्हावा ह्मणून पाणी सुद्धां गाळून प्यावें, इतका जरी निरुपद्रवी स्वभाव बनविण्याकडे कल होता, तरी ते वैदिक धर्माचा छल करित. वेद्वाक्यांची व उपनिषद्भागांची विटंबना करित. यामुळें वेदज्ञानाचा अभाव होऊन भलभलतींच मतें व क्षुद्र दैवतें अधिकाधिक प्रचारांत येऊं लागलीं होतीं. जैनधर्मानें वैदिक धर्माचा फार उच्छेद केला. जैन धर्माचा सर्वांत मोठा पुरस्कर्ता राजा ह्मटला ह्मणजे अशोक हा होय. हा युधिष्ठिर शकाच्या १७४५ व्या वर्षीं जन्मास येऊन १७९१ व्या वर्षीं मृत्यु पावल्याचें लिहिलें आहे. ह्या राजाच्या कारकीर्दींतच वैदिक धर्माचा अत्यंत छळ व जैन धर्माचा अत्यंत प्रसार झाला. प्रथम तर या राजानें वैदिक लोकांस दगडाच्या घाण्यांत घालून त्यांचा सत्यानाश उडविला. पण पुढें मात्र तो निवळून अतिशय साधु स्वभावाचा झाला. इतकेंच नव्हे तर, त्यानें भरतखंडांत, सिलोनांत, चिनांत व जपानांत वगैरे धर्मप्रसारार्थ आपला मुलगा व मुलगी पाठवून जागजागीं कोरींव शिलालेख स्थापन करून जैन धर्माच्या प्रसारार्थ धुरंधर प्रयत्न केले, व त्यामुळेंच जैनांचा फलफलाट होऊन वैदिक धर्माचा बीमोड होत चालला होता. अशोकाच्या मागून देवांच्या संकेताप्रमाणें बंगाल्यांतील 'मेदिनीपूर' हल्लीं ज्याला मिदनापूर असें ह्मणतात, तेथें इंद्राच्या अंशेंकरून सुधन्वा या नामेंकरून राजा झाला. तो प्रथमतः जैनधर्मी असून विद्वानांचा चहाता होता. ह्याच्या कारकीर्दींतच युधिष्ठिर शक २११० वर्षीं तैलंगण देशांत जयमंगल गांवीं वैशाख शुद्ध १५ रविवारीं दुपारीं कुमारिलभट्ट, ज्यांना 'भट्टपाद' अशी संज्ञा प्राप्त झाली होती, त्या विद्वान् ब्राह्मणाचा जन्म झाला. ह्याच्या बापाचें नांव यज्ञेश्वर भट्ट व आईचें नांव चंद्रगुणा असें होतें. तो लहानपणापासूनच फार बुद्धिमान् असल्यानें थोडक्याच कालांत त्यानें चांगली विद्या संपादन केली. आणि मग श्रीनिकेतननामक जैन आचार्याजवळ अध्ययनास राहिला. तेथें त्यानें साऱ्या जैन ग्रंथांचें यथायोग्य पठण करून तें मत त्याजकडून नीट रीतीनें समजून घेतलें. तरी पण, पहिल्यापासूनच त्याचा

ओढा जैनधर्माकडे मुळींच नव्हता. तर तो वेदाचा कट्टा अभिमानी असून वादामध्यें तर तो केवळ अजिंक्य—साक्षात् बृहस्पतीचाच अवतार—होता ह्मटलें तरी चालेल. ह्यास्तव त्याचें अध्ययन संपतांच तो त्या कालच्या सरणीप्रमाणें वादामध्यें दिग्विजय संपादन करण्यासाठीं निघाला आणि शेंकडों जैनशास्त्र्यांस व बुद्धादिकांस जिंकून विजयपत्रें घेत घेत सुधन्वा राजाची राजधानी जी मेदिनीपूर तेथें येऊन पोंचला. सुधन्वा राजा जैनधर्मी होता, व भोजराजाप्रमाणें त्याच्या पदरीं अनेक जैनधर्मी विद्वान् होते. तथापि तो कोणत्याही जातीच्या विद्वानाचा मोठा चहाता असून गुणग्राही होता. ही त्याची कीर्ति ऐकूनच कुमारिलभट्ट तेथें गेला व आपण आल्याचें वर्तमान शिष्यांकडून राजास श्रुत केलें. राजानेंही पूर्वी त्याची कीर्ति ऐकलेलीच होती. ह्यास्तव त्यानें भट्टपादास बहुत सन्मानानें सामोरा जाऊन राजदरबारांत आणून सर्व जैनशास्त्र्यांच्या विद्वत्सभेंत सुवर्णाच्या उच्च सिंहासनावर बसविलें. नंतर राजानें सत्कारपूर्वक अर्घ्यपाद्यादि पूजन केल्यानंतर हिकडील तिकडील थोडेसे क्षेमकुशल प्रश्न विचारिले. त्याचीं कुमारिलभट्टांनीं यथायोग्य उत्तरें दिलीं. इतक्यांत पलीकडे एक वृक्ष होता, त्याच्यावर बसलेला कोकिलपक्षी मधुर स्वरानें गायन करूं लागला. त्यास अनुलक्षून भट्टपादांनीं राजास बोध केला. तो असाः—

**मलिनैश्चेन्न संगस्ते नीचैः काककुलैः पिक ।**
**श्रुतिदूषकनिर्ऱ्हादैः श्लाघनीयस्तदाभवेः ॥ १ ॥**

"हे कोकिळा! मलीन [ पातकी, पक्षीं काळे ] आणि श्रुतिदूषक [ वेदांची निंदा करणारे, पक्षीं कर्णकटुशब्द करणारे, बडबडे ] अशा कावळ्यांच्या कुळाची तुला जर संगति नसती, तर तुझें वर्णन करण्यास कोण समर्थ होतें?" हें खोंचदार भाषण ऐकुन सभेंतील मोठमोठे बौद्ध व जैन विद्वान् सर्पाच्या शेपटीवर पाय दिल्याप्रमाणें खवळून गेले. आणि भरसभेंत भट्टपादाशीं वाद करूं लागले. पण भट्टपाद हे अवतारी पुरुष होते. त्यांच्यापुढें ते बिचारे काय टिकणार? भट्टपादांनीं आपल्या वेदप्रतिपादित सिद्धांतांनीं व युक्तिवादरूप कुठारीनें त्यांच्या वाक्पाटवरूप वृक्षांचीं अगदीं पाळेंमुळें खणून काढून त्यांना अगदीं

निरुत्तर करून सोडलें. सभेंतील बौद्ध व जैन पंडितांपैकीं एकासही त्यांच्या कोटिक्रमावर यथायोग्य उत्तर देववेना. ते केवळ चित्रासारखे तटस्थ बसले. ह्याप्रमाणें वादांत जय झाल्यावर भट्टपाद सुधन्वाराजापाशीं वेदाची प्रशंसा करून ह्मणाले कीं, 'वेद हेच ईश्वरी प्रणीत असून प्रमाण आहेत. त्यांची ह्या जैनधर्मी लोकांनीं हेलना केली. अतएव हे पातकी आहेत.' तेव्हां सुधन्वा राजा ह्मणाला "हे विप्रवर्य ! आपण विद्वान् असल्यामुळें ह्या बुद्ध व जैन लोकांचा पराभव केला ही गोष्ट खरी आहे. पण वादामध्यें जिंकणें हें केवळ विद्वत्तेचें व भाषणचातुर्याचें काम आहे. तेवढ्यावरून कांहीं वेद हेच श्रेष्ठ असें ठरत नाहीं. ह्याकरितां आपण एखादा साक्षात्कार दाखवाल तर मात्र वेद हेच प्रमाण आहेत अशी माझी व ह्या सर्वांचीही खात्री होईल." तेव्हां भट्टपाद ह्मणाले "ठीक आहे. बोला. आणखी काय प्रमाण पाहिजे तें. तेंही मी देण्यास तयार आहें." तेव्हां राजानें सभेंतील सर्व विद्वानांची संमति घेऊन असें सांगितलें कीं, "आपण पर्वताच्या कड्यावरून उडी घेऊन कांहीं अपाय न होतां परत याल तर आह्मी आपले वेद व वैदिक धर्म प्रमाण असें मानूं." भट्टपादांनीं ती गोष्ट तत्काल मान्य केली, व सर्व मंडळीसह एका पर्वतावर जाऊन 'वेद हेच प्रमाण असतील तर मला येथून उडी मारल्यापासून कांहींएक अपाय होणार नाहीं' असें ह्मणून 'हरिः ॐ' असा मोठ्यानें शब्द करून त्यांनीं एकदम पर्वतावरून उडी टाकली ! तेव्हां असा चमत्कार झाला कीं, जसा एखादा कापसाचा गोळा खालीं पडावा त्याप्रमाणें भट्टपादाचार्य सहज खालीं गेले, आणि कांहींएक इजा न होतां पुन्हां पूर्ववत् स्वस्थळावर येऊन राजापाशीं उभे राहिले. तेव्हां राजा सुप्रसन्न होऊन सद्गदित अंतःकरणानें त्यांच्या चरणीं लीन झाला, आणि मी सर्वस्वी अपराधी आहें, आपण क्षमा करून मला वेदधर्मी होण्याबद्दल अनुग्रह द्यावा ह्मणून त्यानें त्यांची प्रार्थना केली. तेव्हां बुद्ध व जैन आचार्यांचीं तोंडें काळीं ठिक्कर पडलीं, व आतां पुढें काय करावें हें त्यास सुचेनासें झालें. त्यांनीं राजाची पुन्हां विनवणी केली कीं, "महाराज ! केवळ पर्वतावरून उडी टाकली येवढ्यानेंच कांहीं वेदप्रामाण्य

सिद्ध होत नाहीं. कारण, असे चमत्कार मांत्रिक विद्येनें, वनस्पतिधर्मानें, किंवा योगबलानेंही होऊं शकतात. ह्याकरितां भट्टपादाचार्य जर आणखी एखादा साक्षात्कार दाखवितील तर मात्र वेद हे प्रमाण असें आह्मी मानूं." हें ऐकून राजाला अतिशय क्रोध आला. आणि त्यानें एक घागर आणवून तींत गुप्त रीतीनें एक सर्प घातला व तिचें तोंड बंद करून त्यावर मोहोर केली. आणि ती घागर दुसरे दिवशीं सभेंत आणून ठेवून आपल्या सभेंतील सर्व बुद्ध व जैन आचार्यांस प्रश्न केला कीं 'ठीक आहे. तर सांगा आतां ह्या घागरीच्या आंत काय आहे तें. तें बरोबर सांगितलेंत तर ठीक आहे. नाहीं तर सरसकट तुह्मां सर्वांना दगडाच्या घाण्यांत घालून पिळून काढीन.' ही राजाची आज्ञा ऐकतांच सर्व जैन–आचार्यांची पांचांवर धारण बसली ! तेव्हां त्यांनीं तें उत्तर सांगण्यास एक दिवसाची मुदत मागून घेतली, व ती राजानें मान्य केली. तेव्हां रात्रौ सर्व जैनशास्त्र्यांनीं ज्योतिषी वगैरे आणवून त्या घागरींत काय असावें ह्याचा निश्चय करून ठेवला. दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें राजानें पुन्हां सर्वांस सभेंत बोलावलें, व ती घागरही आणवून त्यांस तोच प्रश्न केला. तेव्हां बुद्ध व जैन आचार्यांनीं 'तींत सर्प आहे' असें उत्तर दिलें. नंतर राजानें भट्टपादांसही प्रश्न केला कीं ' हे विद्वच्छ्रेष्ठ ! ह्यांत काय असावें तें आपणही सांगा.' त्यावर भट्टपादांनीं उत्तर दिलें कीं 'हे राजा ! ह्या घागरीमध्यें शेषशायी भगवंताची मूर्ति आहे.' हें उत्तर ऐकून राजा अत्यंत खिन्न झाला. कारण, त्यांत काय घातलेलें होतें तें त्यास माहित असल्यामुळें, ब्राह्मणाचें भाषण मिथ्या झालें असा त्याच्या मनाचा ग्रह झाला. परंतु इतक्यांत आकाशवाणी झाली कीं, 'हे राजा ! भिऊं नकोस. ब्राह्मणाचें वचन सत्य आहे. घागर उघडून पहा.' त्याप्रमाणें राजानें उघडून पाहिलें तों खरोखरच तिच्यांतून शेषशायी भगवंताची मूर्ति निघाली ! मग काय विचारावें ? सुधन्व्यानें तत्काल झाडून साऱ्या बौद्ध व जैन पंडितांस दगडी घाण्यांत घालून त्यांचा सत्यानाश केला ! ! व भट्टपादाचार्यांस आदरानें ठेवून घेऊन आपण वैदिक धर्माची दीक्षा घेतली. आणि लगेच जिकडे तिकडे हुकूम फर्मावला कीं, जितके ह्मणून जैनधर्मी

व बौद्धधर्मी लोक आढळतील तितक्या सर्वांची सरशहा कत्तल करावी. इतकेंच नव्हे, तर जो कोणी अशी कत्तल करणार नाहीं, त्याचा मी स्वतः शिरच्छेद करीन. हा हुकूम सुटल्याबरोबर सारा एकच प्रळय उडाला. हजारों भिक्षु व बायका मुलें भराभर यमसदनास गेलीं, व ह्या गोष्टीस भट्टपादांनीं यत्किंचितही प्रतिबंध केला नाहीं, येवढेंच नव्हे तर उलट साह्यच केलें. हें कृत्य वैदिक धर्माच्या व ब्राह्मणस्वभावाच्या अगदीं विरुद्ध व आंगावर रोमांच उभे राहण्यासारखें झालें. इतकेंच नव्हे, तर कुमारिल भट्टानें ज्या गुरु जैनाचार्यापाशीं अध्ययन केलें, त्या आचार्यासही तेथें आणून त्याचा घात करविला. ह्यासारखा कृतघ्नपणा दुसरा कोणताच नाहीं. तेव्हां अशा क्रूर मनुष्यास मागाहून गुरुद्रोहाबद्दल व असंख्य निरुपद्रवी प्राण्यांच्या घाताच्या अघोर पातकाबद्दल पश्चात्ताप व्हावा, त्यानें आपणास जिवंत जाळून घ्यावें, ह्यांत कांहीं विशेष नाहीं, व त्याप्रमाणेंच भट्टपादांचें झालें. तो भाग ओघानुसार पुढें येईलच.

९. **मंडणमिश्राचा अवतार**---माहिष्मतीनगरी, जिला सांप्रत चोळीमहेश्वर असें ह्मणतात, तेथें पंचगौडांपैकीं कान्यकुब्ज जातीच्या ब्राह्मणाचें एक घराणें राहत होतें. त्या घराण्यांत एक ब्राह्मणाचा पुत्र फारच बुद्धिवान् निपजला. त्याचें नांव विश्वरूप असें होतें, व तोच पुढें मंडणमिश्र ह्या नांवानें प्रसिद्धीस आला. ह्याच्या विद्वत्तेची कीर्ति, लहानपणापासून दिगंत पसरली होती. ह्याच संधीला शोणनदीच्या तीरीं एक विष्णुमित्र ह्या नामेंकरून दुसरा ब्राह्मण राहत होता. त्याला एक कन्या होती, तिचें नांव सरस्वती. ती इतकी विदुषी, शिकलेली व बुद्धिमान् होती कीं, तिनें आपलें सरस्वती हें नांव अगदीं सार्थ करून टाकलें होतें. ह्या सरस्वतीची कीर्ति विश्वरूपाच्या ह्मणजे मंडणमिश्रपंडितांच्या कानीं गेली. ह्यामुळें तीं उभयतांही परस्परांच्या भेटीविषयीं अत्यंत आतुर झालीं होतीं. आणि त्याप्रमाणें योग आल्यावर त्या परस्परांचें परस्परांवर फार प्रेम जडलें. तेव्हां विष्णुमित्रानेंही मोठ्या थाटानें लग्नसोहळा करून आपली कन्या सरस्वती ही मंडणमिश्रपंडितांस अर्पण केली. लग्नसोहळा आटोपल्यानंतर ती जेव्हां सासरीं जावयास निघाली, तेव्हां तिच्या आईनें तिला फार चांगला

उपदेश केला. ती ह्मणाली "मुली ! तूं आतां सासरीं जाणार. याकरितां यापुढें तूं पूर्वीचा हूड स्वभाव वगैरे सर्व टाकून दे. आणि आपल्या कुलाचा मोठेपणा व थोरवी ह्याचें संरक्षण कर. कारण आतां पूर्वींप्रमाणें तुझें स्वच्छंद वर्तन त्या ठिकाणीं शोभणार नाहीं. तेथें मोठ्या विनयानें, व मर्यादेनें वागलें पाहिजे. आतां पति हेंच आपलें दैवत आहे हें लक्षांत ठेव ह्मणजे झालें." तो उपदेश त्या सरस्वतीनें मान्य केला आणि मोठ्या प्रेमानें व सद्गदित अंतःकरणानें मातापितरांस वंदन करून आपल्या पतीबरोबर सासरीं गेली. आणि तेथें मोठ्या आनंदानें पतीची सेवा करून व सदासर्वकाळ विद्याभ्यासांत मग्न राहून तिनें आपल्या पतीचा संसार चालविला. इतकेंच नव्हे, तर आचार्यांच्या वादाच्या वेळीं सभापतीचें स्थान सर्वानुमतें हिलाच मिळालें होतें, हीही गोष्ट पुढें येईल.

१० **आचार्यांची जन्मभूमी**—पवित्र मनुष्य जन्मास येण्याचें स्थानही तसेंच पवित्र असतें. आचार्यांची जन्मभूमि 'केरळदेश' ही होय. ह्यालाच सांप्रत मलबार असें ह्मणतात. मलबाराइतका सुपीक, व्यापाराच्या सोयीचा, व सृष्टिसौंदर्यानें गजबजलेला भूप्रदेश, निदान हिंदुस्थानांत तरी काश्मीर किंवा हिमालय पर्वताच्या पायथ्याखेरीज इतरत्र क्वचितच आढळेल. ह्या प्रांताला दुष्काळ ह्मणून कसला तो माहितसुद्धां नाहीं, व पडण्याचाही संभव नाहीं. ह्याचें कारण तेथें पर्जन्याची विपुलता आहे, हें एक; आणि तो नसला तरी पिकास अपाय होण्याचें भय नाहीं, हें दुसरें. पश्चिम किनाऱ्यास अगदीं हाताहातावर पाणी लागतें, हें तिसरें; आणि नद्या, सरोवरें व खाड्यांचें पाणी ठिकठिकाणीं खेळलेलें असल्यामुळें, सारा प्रदेश बहुतेक जलमयच आहे, हें चौथें. इत्यादि कारणांनीं ह्या प्रांतांत नेहमींच सुबत्ता असते. पूर्व बाजूस सह्याद्रि असून त्यांत घोर जंगल असल्यानें साग, वेलदोडे, मध, तवकीर, मिरीं, काफी वगैरे जंगली पदार्थ विपुल उत्पन्न होतात, व पश्चिमेच्या बाजूला अफाट वस्तीचीं मैदानें असून त्यांत नारळींचीं झाडें इतकीं घनदाट भरलेलीं आहेत कीं, त्यांतून सूर्याचें किरण दिसण्याची मारामार ! ह्या नारळीच्या मुळाशीं बहुतेक सारें पाणीच असल्यामुळें त्यांना पर्जन्याची विशेष गरज नसते. ह्याशिवाय ठिकठिकाणीं गोड्या पाण्याचीं

विशालपद्माक्षें विराजमान असणारीं सरोवरें, सुंदर सुंदर वृक्षांच्या पंक्ति, हत्तींचे व गव्यांचे कळप, चित्रविचित्र रंगांचे रमणीय पक्षी, मोठमोठालीं देवालयें व गोपुरें, समुद्रतीराची व नदीकिनाऱ्याची शोभा, येणेंकरून केरळदेश ह्मणजे एक प्रतिस्वर्गच आहे, असा भास होतो.

हा प्रांत जसा रमणीय आहे, त्याचप्रमाणें तेथील लोकही फार सत्वस्थ वृत्तीचे आहेत, ही गोष्ट फारच ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. तेथील ब्राह्मणांस नंबुरी ब्राह्मण असें ह्मणतात. आचार्यही त्याच जातीचे होत. हे ब्राह्मण चांगले संस्कृतज्ञ असून विद्वानही असतात. त्यांच्या अंगीं छक्केपंजे नसल्यानें ते दिसण्यांत साळसूद व नेभळट असे दिसतात. तथापि तेथील राजे कोणत्याही नंबुरीची साक्ष खरी धरतात. तेथील ब्राह्मण असत्य भाषण करीत नाहींत असा त्यांचा समज असून तो खराही आहे. ह्या देशांतील लोकांस मलबारी लोक व त्यांच्या भाषेस मलबारी भाषा असें ह्मणतात. ही भाषा व लिपी कानडीच्या जवळ जवळ आहे. हे लोक लोखंडाच्या कांट्यानें ताडपत्रावर कोरून लिहितात. येथील लोकांचे रीतिरिवाज आपल्याहून फारच भिन्न असल्यामुळें आपल्याला ते कसेसेच वाटतात. मुख्यतः त्यांची परंपरा मातृवंशाकडून चालते. नंबूरी ब्राह्मणांत एका मनुष्यानें अनेक बायका करण्याची चाल आहे. पण एका घरांत एका वडील भावानें मात्र लग्न करावयाचें, व दुसऱ्या भावांनीं अविवाहित रहावयाचें. वडील भावास संतान न होईल, वंशच खुंटत असेल तर दुसऱ्या भावानें राजाची परवानगी घेऊन लग्न करावें. ह्यामुळें त्यांच्यांत चाळीस चाळीस वर्षांच्या अविवाहित मुली राहतात, व तशाच स्थितींत त्या मरण पावल्या तर त्यांच्या बरोबर कणकीचा पति करून त्यांचें दहन करतात. दुसरी जात नायर. ह्या जातींत व त्यांच्या खालच्या जातींत लग्नाची चाल मुळींच नाहीं. पाहिजे त्या स्त्रीनें पाहिजे तितक्या दिवस पाहिजे त्या पुरुषाशीं संबंध ठेवावा, व तो तोडून पाहिजे तेव्हां नवा जोडावा. अशा पुरुषास संबंधकार व अशा स्त्रीस संबंधिनी, अशी तिकडे संज्ञा आहे. एका पुरुषाचे पाठीमागें त्याचे सख्खे भाऊ वारस होतात. नंतर त्यांचा भाचा वारस होतो.

पुत्राला वारसा मिळत नाहीं. नांव लागतांना प्रथम आईचें नांव व मागाहून मुलाचें नांव लागतें. बापाचा संबंध कोठेंच असत नाहीं. तेथील राजघराण्यांतही हीच चाल आहे. नंबुरी ब्राह्मणांमध्यें मात्र पुत्र वारसदार होतो. ह्या लोकांची देवब्राह्मणांवर विशेष श्रद्धा असून अन्नसत्रें वगैरे धर्मादाय फार होतो. ह्यांच्यांतील स्त्रियासुद्धां त्रिकाल स्नान वगैरे करीत असतात. ह्यांच्यांतील कितीएक रिवाज पवित्र आहेत. पण कितीएक किळसवाणेही आहेत.

ह्या प्रदेशांत लहान लहान नद्याही बऱ्याच असून त्यांत पूर्णानदी, जिला हल्लीं आलवाईची नदी ह्मणतात, ती फार प्रसिद्ध आहे. ह्मणजे जवळ जवळ तिला भागीरथीचीच उपमा ह्मटली तरी शोभेल. ह्या नदीचा उगम सह्याद्रि पर्वतांत असून तिचें मुख कोचीनच्या खाडीला येऊन मिळालें आहे, व कोचीपासून सुमारें बारा मैलांपासून तिचा गोड्या पाण्याचा प्रवाह लागतो. येथें आलवाई ह्मणून एक लहानसें प्रसिद्ध गांव असून हल्लीं तें रेलवेचें स्टेशनही झालें आहे. येथपासून पूर्वदिशेकडे सुमारें ४०।५० कोस ती नदी उगमापर्यंत लागलेली आहे. ह्या नदीचा उगम अभ्रकाच्या पर्वतांतून असल्यामुळें तिच्या पाण्यांत अतिशय रोगनिवारक व सुखकर असे गुण आहेत. यामुळें प्रत्येक उन्हाळ्यामध्यें तिच्या तीरीं हजारों लोक स्नानासाठीं जाऊन राहतात. तो देखावा अत्यंत वर्णनीय असतो. राजे, दिवाण, कामगार गोरगरीब सर्व लोक रात्रंदिवस तेथें डुंबत असतात. दोनप्रहरीं १।२ तास व रात्रौ आठ वाजल्यापासून काय विश्रांति असेल तेवढी. कसलाही तापकरी जाऊन ह्या नदींत स्नान केला कीं, त्याचा ताप जातो असा अनुभव आहे. ह्याच नदीला प्राचीनकालीं 'पूर्णानदी' असें नांव होतें.

११ **आचार्यांचा जन्मः**–पूर्वी सांगितलेल्या रम्य अशा केरळदेशांत पवित्र अशा पूर्णानदीच्या उत्तर तीरीं कालडी ह्मणून एक लहानसें गांव आहे. ह्या राज्यांतील गांवांपैकी बरेच गांव राजाकडून ब्राह्मणाला अग्रहार दिलेले असतात. त्याप्रमाणें हाही गांव ब्राह्मणास अग्रहारच दिलेला होता. ह्या गांवीं केरळ देशच्या राजानें प्रथमतः एका ज्योतिर्लिंगाची स्थापना करून एक देवालय बांधलें. तेथील ब्राह्मण

त्या देवाची पूजा वगैरे करून षट्कर्मे आचरून सदाचारानें राहत असत. त्यांत एक विद्याधिराज ह्या नामेंकरून पंडितश्रेष्ठ राहत असून तो श्रीशंकराचा परमभक्त होता. त्याला पूर्वपुण्याईच्या योगानें एक शिवगुरु नामेंकरून पुत्र झाला. तो अत्यंत ज्ञानी असून बृहस्पतीप्रमाणें बुद्धिवान् होता. ह्मणून त्याचें नांव शिव-गुरु असें पडलें होतें. त्याचा योग्य काल येतांच विद्याधिराजांनीं त्याचा व्रतबंध करून त्यास विद्याभ्यासाकरितां गुरुगृहीं ठेवलें. तेथें व्रतस्थ राहून एक तपपर्यंत सर्व वेदाध्ययन वगैरे झाल्यानंतर गुरूंनीं त्यास आज्ञा केली कीं, "आतां तूं आपल्या मातापितरांस भेटून रीतीप्रमाणें गृहस्थाश्रमाचा स्वीकार कर." त्यावर शिवगुरूंनीं हात जोडून प्रार्थना केली कीं, "गुरुवर्य, विद्याध्ययन झाल्यानंतर लगेच गृहस्थाश्रमाचा स्वीकार केलाच पाहिजे असा कांहीं नियम सांगितलेला नाहीं. वेदाध्ययन समाप्त झाल्यानंतर पुष्कळ वैराग्यसंपन्न गृहस्थ, गृहस्थाश्रमाचा स्वीकार न करितां भिक्षुवृत्तीनें राहून संन्यासव्रतांतही काल लोटणारे होऊन गेलेले आहेत. आतां—

**"ब्रह्मचर्यं समाप्य गृही भवेद्गृहाद्वनी भूत्वा प्रव्रजेत्."**

ब्रह्मचर्य समाप्त झाल्यानंतर गृहस्थाश्रमी व्हावें. आणि नंतर वानप्रस्थाश्र-माचा स्वीकार करावा. अशींही वाक्यें आढळतात, ही गोष्ट खरी आहे. पण त्याच्या उलटः—

**"यदि चेतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेद्गृहाद्वा वनाद्वा । प्लवा ह्येते ह्यदृढा यज्ञरूपाः ।**

**न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैकेऽमृतत्त्वमानशुरिति"**

या श्रुतीचा अर्थ असा आहे कीं, "यदा कदाचित् तितकेंच वैराग्य उत्पन्न होईल तर ब्रह्मचर्याश्रमांतून किंवा वानप्रस्थाश्रमांतूनही संन्यास ग्रहण करण्यास हरकत नाहीं. कारण ज्ञानानेंच मोक्ष आहे. कर्मानें, संततीनें, धनानें, किंवा त्यागानें कांहीं मोक्ष प्राप्त होत नाहीं." ह्यावरून सामान्य लोकांनाच तो नियम लागू आहे. जो खरा दृढनिश्चयी, शुद्धसत्त्वसंपन्न व उत्कट वैराग्यशील असेल त्याला तो नियम लागू नाहीं. माझ्या मनानें तर असें घेतलें आहे कीं, आपण नैष्ठिका-

श्रम ह्मणजे आजन्म ब्रह्मचर्याश्रमांतच राहून दंडकमंडलू धारण करून आपल्यापाशीं आणखीही अध्ययनच करावें, व प्राकृत लोकांना ज्या परब्रह्माचें विस्मरण होतें, त्याचेंच चिंतन करीत रहावें. ह्यावर आपली आज्ञा काय होईल ती खरी."

हेच मूळ आचार्यांचे वडील होत. आणि त्यांच्या मनांतही वैराग्याविषयींची अशी दृढतर इच्छा! हें मनांत आणलें ह्मणजे वैराग्यपरंपरेच्या किंवा पूर्वार्जित संस्कारावांचून जन्मांतील कोणतीही अपूर्व गोष्ट घडून येत नाहीं, असें दिसून येतें. श्रीसमर्थ रामदासस्वामी, तुकाराम महाराज वगैरेंच्या वडिलांची गोष्टही अशीच होती. ज्ञानेश्वर महाराजांचे वडील विठ्ठलपंत ह्यांनीं घरामध्यें सहधर्मिणी असतांच संन्यासग्रहण केलें होतें, व पुन्हां गुर्वाज्ञेनें गृहस्थाश्रमांत आल्यानंतर ज्ञानेश्वरादिकांचा जन्म झाला! ह्यावरून वैराग्याचा अंकुर पूर्वजन्मार्जितच असल्यावांचून तो वृद्धिंगत होत नाहीं, असें दिसतें. असो. शिवगुरूंचा हा निश्चय त्यांच्या गुरूंनीं श्रवण केल्यानंतर त्यांस मोठा संतोष झाला. तथापि त्यांनीं इतकेंच सांगितलें कीं, तुमच्या सर्व गोष्टी खऱ्या आहेत व हेतुही स्तुत्य आहे. तथापि जोंपर्यंत तुमचे वडील आहेत तोंपर्यंत त्यांच्या आज्ञेत वागणेंच तुह्मांस श्रेयस्कर होय. ह्यास्तव त्यांचे आज्ञेनुरूपच वागावें. त्यांतच मोक्ष आहे. त्यांच्या आज्ञेचा भंग करून त्यांस दुखविणें, हा पुत्रधर्म नव्हे. ह्याकरितां तुमचे वडील आल्यानंतर तुह्मी त्यांच्या बरोबर स्वगृहीं जाऊन त्यांच्याच आज्ञेनें काय करणें तें करा." ही आज्ञा ऐकून शिवगुरु स्वस्थ राहिले.

ह्या गोष्टीला थोडे दिवस लोटले नाहींत तोंच शिवगुरूंचे वडील विद्याधिराज हे, त्यांना स्वगृहीं नेण्याकरितां गुरुगृहीं येऊन पोंचले. व त्यांनीं मोठ्या उपकारबुद्धीनें गुरुदक्षिणा वगैरे देऊन त्यांचा निरोप मागून शिवगुरूस घेऊन आपल्या घरीं आले. एके दिवशीं आपल्या पुत्राचा विद्याभ्यास कसा काय झाला आहे व त्याची बुद्धि कशी काय आहे, हें पाहण्याकरितां विद्याधिराजांनीं त्यांस कांहीं वेदांतांतील प्रश्न केले. नंतर मीमांसा, काणाद, गौतम, सांख्य आदिकरून षट्दर्शनांतीलही प्रश्न केले. त्यांचीं उत्तरें शिवगुरूंनीं अति उत्तम व समाधानकारक

अशीं दिलीं. ह्मणजे त्यांतील पूर्वपक्षाचें खंडन करून आपला पक्ष अगदीं यथाप्रमाण सिद्ध करून दाखविला. तो त्यांचा कोटिक्रम पाहून विद्याधिराजांस परम संतोष झाला. कारण–

**जरि बोबडें पित्याचें मोहावें मन तथापि तोकानें ।**

मुलांची वाणी बोबडी असली तरीसुद्धां पित्याच्या मनाला मोह पडतो. मग शिवगुरूंची ती अधिकारयुक्त, सर्वशास्त्रसंमत अशी प्रसादयुक्त वाणी ऐकून त्यांच्या पित्याला केवढें बरें कौतुक वाटलें असेल ! माझ्यासारखा भाग्यवान् व धन्य जगांत कोणीच नाहीं, असें त्यांस होऊन गेलें असलें तर त्यांत नवल तें काय ? आपला पुत्र इतका विद्वान्, गुणी व विनयसंपन्न निपजला हें पाहून त्यांनीं जनरीतीप्रमाणें त्याच्या विवाहाचा विचार चालविला. त्याच प्रांतांत राहणारा मद्यपंडित ह्या नामेंकरून एक सुशील ब्राह्मण होता. त्याची कन्या योग्य आहे असें पाहून तिकडील रिवाजाप्रमाणें त्यांनीं त्याजपाशीं तिची आपल्या पुत्रासाठीं याचना केली. व सुमुहूर्त पाहून त्यांनीं मोठ्या थाटानें शिवगुरूंचा लग्नसोहळा उरकून घेतला. पित्याचा हा कल पाहून शिवगुरूंची प्रवृत्ति जरी विरक्तीकडे होती, तरी त्यांनीं आपला हेतु एका बाजूस ठेवून पित्याच्या आज्ञेस मान दिला. श्रीसमर्थ रामदास स्वामींप्रमाणें कोणताही प्रकार केला नाहीं. शिवगुरूंच्या ह्या पत्नीचें नांव श्रीअंबिका असून तीही मोठी साध्वी, पतिसेवापरायण व सुशील अशी होती. ह्यामुळें त्या उभयतांमध्यें अत्यंत प्रेम जडलें. पुढें कांहीं काल लोटल्यानंतर सृष्टिक्रमाप्रमाणें शिवगुरूंचीं मातापितरें इहलोक सोडून परलोकीं गेलीं, व सर्व प्रपंचाचा भार शिवगुरूंवर पडला, व तेही परमेश्वरावर निष्ठा ठेवून संसारचक्र चालवूं लागले. त्यांना खरोखर अग्रहार मिळालेला होता. तेव्हां खाण्यापिण्याची कांहीं ददात नव्हती. आलेल्या अतिथिअभ्यागताचा सत्कार करून ते सुखानें कालक्रमणा करीत होते. तरी त्यांच्या मनाला उदासीनता प्राप्त होण्याला एक कारण होतेंच. तें कोणतें ? तर संततीचा अभाव हें होय. ह्या उभयतां पतिपत्नींस प्रथम प्रथम वाटे कीं, ह्या वर्षीं नाहीं तर पुढच्या वर्षीं संतति होईल. पुढच्या वर्षीं नाहीं तर त्याच्या पुढच्या वर्षीं तरी होईल. असें करितां करितां अर्धें

आयुष्य निघून गेलें तरी संतति झाली नाहीं. तेव्हां मात्र शिवगुरूंचें मन फारच खिन्न झालें. आणि ते एके दिवशीं आपल्या भार्येस ह्मणाले कीं, "आपल्या पोटीं संतति नाहीं. गृहाचें भूषण काय? तर बालक. ह्मणूनच 'गृहरत्नं बालकः' असें ह्मटलेलें आहे. तें नसल्यामुळें आपलें घर केवळ स्मशानाप्रमाणें भासतें. कारण, त्यामुळें उभय लोकही आपल्याला शून्य झाले आहेत. 'नापुत्रस्य लोकोऽस्ति'—ह्मणजे अपुत्रिकाला परलोकप्राप्ती नाहीं, अशी श्रुतिच आहे आणि ह्या लोकींही वंशवृद्धि नसल्यानें पुढील वंशही खुंटला. ह्याकरितां पुत्रप्राप्तिस्तव कांहीं यत्न तरी करून पहावा. 'यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः' ह्या न्यायानें यत्न करूनही फलप्राप्ति न होईल तर मग आपल्याकडे दोष तरी राहणार नाहीं', त्यावर त्यांच्या साध्वी स्त्रियेनें विनयानें उत्तर केलें कीं, 'आपण उभयतांही श्रीशंकराची सेवा करूं या. ह्मणजे त्याच्या प्रसादानें आपणांस निश्चयेंकरून संतति प्राप्त होईल. कारण, तो इच्छित फल देण्याविषयीं समर्थ आहे.' ती गोष्ट शिवगुरूंनाही मानवली, व त्या उभयतांनींही श्रीशंकराची कडकडीत व्रतानें आराधना करण्यास प्रारंभ केला. कांहीं दिवस एकभुक्त रहावें; कांहीं दिवस उपोषणेंच करावींत; कित्येक दिवस निखालस जलपानच करून असावें; कित्येक दिवस निरशनावर काढावेत. ह्याप्रमाणें वृषक्षेत्राच्या ठिकाणीं राहून त्यांनीं तपश्चर्या केली. तें त्यांचें एकनिष्ठ तप पाहून श्रीशंकरांनीं ब्राह्मणाचें स्वरूप धारण करून स्वप्नामध्यें येऊन शिवगुरूंस विचारिलें कीं, 'मी तुमच्या उभयतांच्या तपानें प्रसन्न झालों आहें, ह्याकरितां तुह्मांला कोणता वर इच्छित असेल तो मागावा.' तेव्हां शिवगुरु ह्मणाले 'आह्मांला संतति नाहीं. तेवढी कृपा करून द्यावी.' त्यावर शंकरांनीं विचारिलें कीं, 'तुह्माला मंदबुद्धीचे दीर्घायु असे अनेक पुत्र पाहिजेत, किंवा सर्वज्ञ परंतु अल्पायु असा एकच पुत्र पाहिजे? यावर शिवगुरूंनीं किंचित् विचार करून सांगितलें कीं, 'अल्पायु असला तरी चिंता नाहीं. परंतु सर्वज्ञ असाच पुत्र पाहिजे.' हें श्रवण करून श्रीशंकर बोलले 'तथास्तु. तुह्मांला सर्वज्ञ असाच पुत्र होईल. आतां तुह्मीं तपश्चर्येची सांगता करून आपल्या गृहीं जावें.' नंतर शिवगुरु जागृत होऊन त्यांनीं

झालेला दृष्टांत आपल्या पत्नीस कळविला. तेव्हां तिलाही परमानंद झाला, व त्यावर विश्वास ठेवून त्या उभयतांनीं तपश्चर्येची सांगता केली. आणि तीं उभयतांही आपल्या घरीं गेलीं. आणि त्या तपश्चर्येच्या सांगतेकरितां त्यांनीं ब्राह्मणांस अनेक सुवर्णदानें व गोप्रदानें देऊन संतुष्ट केलें. केरळदेश हा प्रथमपासूनच संपन्न असून दानधर्माविषयींही प्रसिद्धच आहे. त्रावणकोरचे महाराज वारंवार तुलादान—सुवर्णकमलदान, सुवर्णदानें वगैरे देत असल्याचें त्रावणकोरच्या इतिहासावरूनही आपल्याला कळून येतें. ह्मणजे अशा प्रकारें दानधर्म करणें, हें त्या प्रांतीं कांहीं मोठेंसें नवल नाहीं. असो. त्यानंतर श्रीशंकराच्या प्रसादानें शिवगुरूंची पत्नी जी श्रीअंबिकादेवी तिच्या पोटीं शिवतेजानें युक्त असा गर्भ राहून तो दिवसेंदिवस शुक्लचंद्रासारखा वृद्धि पावूं लागला. नंतर नऊ मास नऊ दिवस पूर्ण होतांच शिवगुरुपत्नी श्रीअंबिका देवी ह्या शुभग्रहयुक्त शुभलग्नावर श्रीअंबिका ज्याप्रमाणें कार्तिकेयाला प्रसवली, त्याप्रमाणें आद्य जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्यांस प्रसवल्या. ह्या दिवसाची आचार्यांची * जन्मपत्रिका उपलब्ध झालेली खालीं दिली आहेः—

* ही उपलब्ध झालेली आचार्यांची पत्रिका आह्मीं केरळकोकिळ वर्ष २१ अंक ८ मध्यें प्रसिद्ध करून तिच्या खाली येणेंप्रमाणें मजकूर लिहिला होता. तोः-

" ही वर दिलेली एका महात्म्याची जन्मपत्रिका आह्मांस उपलब्ध झाली आहे. ही कोणाची आहे, हें आजच आह्मी स्पष्ट सांगत नाहीं. परंतु तिच्याबद्दल ज्या ज्योतिर्विदांकडून खुलासा येईल, तो सर्व किंवा त्यांतील ग्राह्यांश आह्मी मोठ्या आदरानें प्रसिद्ध करून सर्वांचे आभार मानूं, व त्याच वेळीं ही पत्रिका कोणाची तें स्पष्ट कळवूं. त्याकरितांः—

१ ही पत्रिका बरोबर आहे किंवा कसें ?

२ नमूद केलेल्या वर्षी ईश्वरनामसंवत्सर होता कीं काय ?

३ आत्मायोग ह्मटला आहे, पण योगामध्यें आत्मा कोठें आढळत नाहीं, त्याचा खुलासा काय ?

४ कुंडलींत दाखविलेले ग्रह त्या कालाला अनुसरून आहेत किंवा कसें ?

५ ह्या दिवशीं जन्मास आलेल्या पुरुषाचें आयुष्य किती असावें ?

श्री.

कल्यादि गताब्द ३०५८ ईश्वरनामसंवत्सरे वैशाख शुक्ल १५ रविवासरे १२–३४, आर्द्रा नक्षत्रे ५२–२१, आत्मा (?) योग ३–४५. बालव करणे १२–३४, अह:प्रमाणं ३०–२८ (?), भुक्ति १–२७, एतस्मिन् शुभदिने सूर्योदयादिजन्मकाल घटिकादिभिः ११–१५, मिथुनलग्ने भुक्ते ४–१२ शेष १–३ मिथुन लग्ने चंद्र होरायां बुध द्रेष्काणे वृषभ शुक्र नवांशे शनिद्वादशांशे बुधत्रिंशांशे आद्यजगद्गुरु जन्मः—

६ ह्याशिवाय त्या पुरुषाबद्दल इतर देववेल तेवढी माहिती.

इतका खुलासा तच्छास्त्रज्ञांकडून होईल, अशी आशा आहे ”

ह्यावर शास्त्रज्ञांकडून माहिती आली ती त्याच वर्षाच्या १२ व्या अंकांत प्रसिद्ध केली आहे तीः–

## जन्मपत्रिकेसंबंधानें आलेली माहिती.

आह्मीं आमच्या गेल्या आठव्या अंकांत ‘ **ज्योतिषशास्त्रज्ञांस अगत्याची विनंती** ’ ह्मणून एक सदर घालून एक जन्मपत्रिका दिली होती, व तिच्याबद्दल माहिती विचारली होती. ही जन्मपत्रिका आद्य **श्रीमच्छंकराचार्य,** ह्यांची आह्मांस अस्सल बरहुकूम मिळालेली आहे. तिचा पडताळा पहाण्यासाठीं ती मुद्दाम प्रसिद्ध केली होती. परंतु लिहिण्यास अत्यंत आनंद होतो कीं, ही पत्रिका, खालीं दिलेल्या विद्वद्वर्यांकडून जी माहिती आली आहे, तिच्यावरून व आद्यमठ **श्रीशृंगेरी** येथील कागदपत्रांवरूनही अगदीं खरी ठरून आचार्यांच्या कालाचा ठाम निर्णय झाला. त्याबद्दल साद्यंत माहिती सदरहु प्रसिद्ध होणाऱ्या चरित्रांत येईलच. आज ज्या ज्योतिर्विदांनीं कृपा करून उत्तरें पाठविलीं, त्यांची ती माहिती थोडक्यांत सर्वांस कळण्यासाठीं देतों.

१ वे० शा० रा० रा० **सूर्य नारायण शास्त्री**–[ मच्छलीपट्टणचे ज्योतिषी ] ह्मणतात, आरूढ लग्न धरलें तर आचार्यांचे असलेले सर्व गुण या पत्रिकेशीं जुळतात.

२ वे० शा० रा० रा० **महादेव केशवशास्त्री वाईकर–पनवेल**–यांचें ह्मणणें–ह्या पत्रिकेवरून हा मनुष्य बालसंन्यासी असावा. अल्पायुषी असावा. फारतर तीस किंवा ३५ वर्षें आयुष्य असावें. शिवाय तो धर्मसंस्थापक असला पाहिजे. ‘ आत्मायोग ’ पडला आहे तेथे आयुष्मान् योग, असें असावें. ईश्वरनामसंवत्सर बहुधा बरोबर आहे. तथापि तो पुन्हा पाहून कळवूं.

जन्मकुंडली.




आर्द्रा द्वितीय चरण.

ह्यावरून आज आचार्यांस जन्मून १९५१ वर्षें झालीं असें सिद्ध होतें. ह्याप्रमाणें पुत्र होतांच शिवगुरूंनीं स्नान करून ब्राह्मणांस भूमि, गाई, सुवर्ण

३ रे रा. रा. **नानाजी महादेव कुळकर्णी**-वखंड-पेटा दौंड, जि. पुणें, ह्यांनीं खालीं लिहिल्याप्रमाणें माहिती पाठविली आहे.

१ कुंडलींतील लग्न बरोबर आहे. गताब्द कली ३०५८-आतां ३०५९-सालीं जन्म झाला. जन्माची वेळ इष्टघटीवरून बरोबर आहे. आर्द्रा नक्षत्राचे द्वितीय चरणीं जन्म झाला. सबब त्याचें जन्मनांव गजानन आहे. चंद्रराशि २×११ अ. ते समयीं रवि राशि ०–११ होता. २ त्या वर्षीं ईश्वरनाम संवत्सर होता. हल्लीं गताब्दकली ५००९ आहे आणि चालू १० आहे. यावरून ईश्वरनाम सिद्ध होतें. शनि आणि गुरु. या कुंडलींत शनी धनेला आणि गुरु कुंभेला असे आहेत. ते ५०१० यावरून मिळवून पाहतां ५०१० च कर्केला गुरु सिद्ध आहे. त्या मानानें ३०५९ ला धनेला गुरु येतो व मीनेला शनी येतो. यावरून कुंडलींत असलेले ग्रह शनी, गुरु आणि केतु, त्या कालाला अनुसरून नाहींत. १९५१ वर्षांची पत्रिका आहे. ते समयीं विक्रम संवत् १४ आहे. त्याचें नांव विभवनामसंवत्सर आहे. ३ इसमाचें आयुष्य, गुरु आणि शनी हे दोन्ही ग्रह कायम नसल्यामुळें समजण्यास मार्ग नाहीं.

येणेंप्रमाणें माहिती आमचे समजुतीप्रमाणें पाठविली. करितां त्याबद्दलचा विचार होऊन आम्हांस कळविलें असतां आणखी लागणारी माहिती पाठविण्यास आम्ही तयार आहोंत.

येणेंप्रमाणें वरील तीन गृहस्थांनीं माहिती पाठविली, याबद्दल आम्हीं त्यांचे फार फार उपकार मानतों."

आदिकरून मोठ्या आनंदानें दानें दिलीं. तेव्हां दिशा सुप्रसन्न झाल्या; वायु सुगंधयुक्त वाहूं लागला; सर्व प्राणिमात्र आपआपला वैरभाव सोडून ते आनंदानें परस्पर खेळूं लागले; आणि वृक्षांनीं फळांची व पुष्पांची वृष्टि केली. इतकेंच नव्हे तर दुसरा असा चमत्कार झाला कीं, अद्वैत मताच्या विरुद्ध मतांचा ज्यांनीं ज्यांनीं पक्ष उचलला होता, त्यांच्या हातांतून एकाएकीं सर्व पुस्तकें गळून पडलीं; वेदांतशास्त्राला आनंद झाला; व्यासाचें हृत्कमल विकास पावलें; व देवांनीं पुष्पवृष्टी केली. गंधर्व गाऊं लागले; होमशाळेंतील अग्नि प्रदीप्त झाले. श्रीअंबिका देवी ज्या खोलींत प्रसूत होऊन पुत्र झाला, ती खोली त्या पुत्राच्या प्रभावानें क्षणभर सुप्रकाशित होऊन सर्वांचे डोळे दिपून गेले. आणि ती पुत्रसू माता, पृथ्वी जशी मेरू पर्वतानें शोभते, आकाश ज्याप्रमाणें वासरमणीनें शोभतें, त्याप्रमाणें आपल्या रातोत्पलाप्रमाणें कोमल, सुकुमार व तेजःपुंज बालकानें शोभूं लागली आणि त्या घरांत व गांवांत जिकडे तिकडे आनंदी-आनंदच होऊन गेला. शिवगुरूंनीं लगेच पुत्रावण वगैरे जे धर्मसंस्कार ते विधियुक्त केले.

आपल्या देशांत पुत्र जन्मास आला कीं, लगेच त्याची जन्मपत्रिका करावयासाठीं व त्याचें पुढील भवितव्य वर्तविण्यासाठीं ज्योतिषी किंवा जोशी बोलावण्याची चाल आहे. त्याप्रमाणें जोशीही येऊन पोंचला. त्यानें लगेच जन्मपत्रिका व जातक तयार करून फलश्रुति सांगितली कीं, ‘हा तुमचा पुत्र सर्वज्ञ, स्वतंत्र-शास्त्राची रचना करणारा व मोठमोठ्या पंडितांस वादामध्यें जिंकणारा असा होईल. ह्याची कीर्ति सर्व भूमंडलांत दुमदुमून राहील.’ खरें पाहतां जन्मपत्रिका केली ह्मणजे मुख्यतः आयुष्याची मर्यादा सांगत असतात. पण ती कांहीं त्या जोशांनीं सांगितली नाहीं, व शिवगुरूंनींही पण ती गोष्ट त्यांला विचारली नाहीं. कारण शुभ जाणणारे जे लोक असतात ते अशुभ जाणत असतांही ती गोष्ट तोंडाबाहेर काढीत नाहींत. नंतर शिवगुरूंनीं स्वतः सूतिकागृहांत जाऊन पुत्राचें मुख अवलोकन केलें. तेव्हां ग्रीष्मऋतूंत उन्हानें तप्त झालेला मनुष्य जसा चंद्रदर्शनानें आनंदित होतो, त्याप्रमाणें शिवगुरूचा आत्माही गार झाला.

नंतर जातकर्मादि संस्कार करून, हा लोकांचें कल्याण करणारा होईल—ह्मणून 'शंकर' असें 'सार्थ' नांव ठेविलें. व तेंच पुढें आद्य जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्य ह्या नांवानें आसेतुहिमाचल दिग्विजय करून प्रसिद्धीस आलें. त्याचें वर्णन आतां क्रमाक्रमानें पुढें येईल.

१२ **आचार्यांची बाललीला**—आचार्य बाल्यदशेमध्यें अत्यंत तेजस्वी व पाणीदार दिसत असत. त्यांचे नाक डोळे तरतरीत असून अंगकांति बालभानूप्रमाणें असे. बुद्धिमत्ता तर केवळ अलोट दिसून येई. ते क्रमाक्रमानेंच रांगूं लागले, व मधुर मधुर भाषण करूं लागले. तेव्हां त्यांच्या मातापितरांस केवढी बरें धन्यता वाटली असेल ! आचार्यांनीं बाल्यत्वाला उचित अशा बाललीला काय त्या एक वर्षपर्यंतच केल्या असतील. पण तेवढ्यांत सुद्धां त्यांनीं मातापितरांकडून व इतर इष्टआप्तांकडून धन्य धन्य ह्मणवून घेतलें. कारण, त्यांच्या बुद्धिमत्तेचा अंकुर असाधारण, केवळ दैविक शक्तीचा होता, असें तेव्हांपासूनच निदर्शनास आलें असलें पाहिजे. जे जे अवतारी पुरुष होऊन जातात, त्यांची गोष्ट नेहेमीं अशीच असते. श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं सातव्या आठव्या वर्षींच रेड्याकडून वेद बोलविले व १९ वर्षांच्या आंतच ज्ञानेश्वरीसारखा श्रीमद्भगवद्गीतेवर अप्रतिम ग्रंथ रचून समाधि घेतली. हें तरी मानवी शक्तीच्याच बाहेरचें उदाहरण नव्हे काय ? श्रीसमर्थ रामदास स्वामींनीं तरी बाराव्या वर्षाच्या आंतच विरक्त होऊन अंतरपाटापुढून निघून जाऊन 'सावध' होण्याइतकी जागृति राखून नाशिकास कडकडीत तपश्चर्येस प्रारंभ केला. आणि हल्लींच्या बारा वर्षांच्या मुलाला साधारण व्यवहारज्ञान सुद्धां समजत नाहीं. हें कशाचें लक्षण ? ह्यावरून येवढेंच सिद्ध होतें कीं, अवतारी पुरुष असतात ते पूर्वजन्मांच्या संस्कारानेंच मानवी बुद्धीच्या पलीकडे असतात; किंवा जे मानवबुद्धीच्या पलीकडे असतात, त्यांसच अवतारी पुरुष असें ह्मणतात. कसेंही मानलें तरी एकच. ह्याच नियमास अनुसरून आचार्यांची बुद्धि केवळ लोकोत्तर होती. त्यांना पहिल्या वर्षींच अक्षरज्ञान व देशभाषा येऊं लागली. दुसऱ्या वर्षीं ते पुस्तक वाचूं लागले. तिसऱ्या वर्षीं त्यांस काव्यें, कोश, पुराणें, आदि-

करून अवगत झालीं. इतकेंच नव्हे, तर त्यांचा स्वतः अर्थ करण्याची त्यांस शक्ति आली. केवढें आश्चर्य हें! आणखी ह्या गोष्टी केवळ सांगावांगीच्या नव्हेत, तर पुढील त्यांच्या चरित्रकृत्यावरून अशा गोष्टी घडलेल्याच पाहिजेत असें मुकरर सिद्ध होतें. भोजराजाच्या पदरीं नऊ कविरत्नें असून त्यांपैकीं कित्तीएक कवि अगदीं एकपाठी होते. पण आचार्य हे तिसऱ्या वर्षापासूनच, किंबहुना एकवर्षापासूनच एकपाठी होते. त्यामुळें त्यांचे गुरूही त्यांजवर फार ममता करीत. खरेंच आहे. अशा लोकोत्तर मुलावर कोण ममता करणार नाहीं? व अशा प्रकारचें मूल ह्मणजे केवळ ईश्वराचा अंश नव्हे, असें तरी कोणाच्या मनांत येणार नाहीं? असो. आचार्यांच्या वयाला तिसरें वर्ष लागतांच शिवगुरूनीं त्यांचें चूडाकर्म ह्मणजे जावळ राखणें वगैरे विधीही रीतीप्रमाणें केले. नंतर आचार्यांनीं लागलाच वेदांचा अभ्यास केला. इतकेंच नव्हे, तर तर्कशास्त्रादिकांत प्रवीणता संपादन करून त्या अल्प वयांतच पाखंडीमतांचें यथास्थित खंडण करून वेदांचें प्रामाण्य सिद्ध करूं लागले. ही आपल्या मुलाची कुशाग्र बुद्धि पाहून त्यांच्या मातापितरांस किती आनंद व केवढी धन्यता वाटली असेल बरें? खरेंच आहे; एखाद्या अजागळ शेंबड्यालेंबड्या मूर्ख पुत्राच्या शब्दानें सुद्धां त्यास कोठें ठेवूं आणि कोठें न ठेवूं असें आईबापांस होऊन जातें, मग अशा सद्गुणी, चपल, व विद्वान् पुत्ररत्नाच्या कौटिक्रमानें त्यांच्या मनास ब्रह्मानंद व्हावा हें अगदीं साहजिकच आहे. असो. असें होतां होतां आतां पांचव्या वर्षीं आपल्या पुत्राचें उपनयन करावयाचें ह्मणून शिवगुरूनीं निश्चित केलें होतें. परंतु "**विधेरिच्छाबलीयसी**" ह्या वाक्याप्रमाणें मनुष्याची इच्छा असते एक; आणि विधात्याची असते दुसरीच. त्याप्रमाणें झालें. ह्मणजे आचार्यांनां चवथें वर्ष पुरतें लागतें न लागते तोंच शिवगुरूंचा काल झाला! तेव्हां आचार्यांच्या कोमल मनावर व त्यांच्या मातुश्रीवर हा एक दुःखाचा पर्वतच कोसळल्याप्रमाणें झालें. पण ईश्वरी इच्छेपुढें कोणाचा इलाज नाहीं. तिला सर्वांनींच मान देणें भाग पडतें. त्याप्रमाणें आचार्यांनीं तें सर्व दुःख सहन करून पित्याचें और्ध्वदेहिक वगैरे कर्म यथासांग केलें. व पुन्हा पूर्ववत् अभ्यासास लागले.

**१३ गुरुगृहवास**—शिवगुरु गेल्यानंतर आचार्यांच्या पालनपोषणाचा भार त्यांच्या बिचाऱ्या माउलीवर येऊन पडला. तिनें त्यांस चांगल्या गुरूकडून आणखी अध्ययन करविलें. व पांचव्या वर्षीं आपले आप्त स्वकीय व बांधवजन बोलावून मोठ्या थाटानें आचार्यांचा उपनयनविधि केला. नंतर आचार्य हे ब्रह्मचर्य आश्रम पतकरून गुरुगृहीं राहिले. त्यांनीं गुरूपाशीं शिक्षा ज्योतिष, छंद, निघंट वगैरे सहा अंगें व चार वेद मिळून दशग्रंथांचा अभ्यास पूर्वींचाच होता तो पूर्ण केला. इतक्या अल्पवयांत येवढें अध्ययन केलेलें पाहून संपूर्ण लोक आश्चर्य करूं लागले. आचार्यांचा व्रतबंध झाल्यानंतर ते ब्रह्मचर्याश्रम पतकरून गुरुगृहीं राहिले. पण त्यांचें बहुतेक वेदाध्ययन पूर्वींच झालेलें होतें. असें उदाहरण जगामध्यें क्वचित्च आढळेल, किंबहुना मुळींच नाहीं ह्मटलें तरी सुद्धां चालेल. आचार्यांची बुद्धिमत्ता केवळ अलोट, निखालस अद्वितीय असून तींत ईश्वरी तेज प्रगट होत असे. एक पाठ दिला पुरे, कीं तो तत्काल त्यांचा वज्रलेप होत असे. अशा शिष्यापुढें गुरूची अगदीं त्रेधा उडून जावी हें अगदीं साहजिक आहे. प्रत्यक्ष गुरूंचीच डाळशिजण्याची जेथें मारामार, तेथें इतर सहाध्यायांची गोष्ट कशाला बोलावी ? त्यांच्यानें आचार्यांची मुळींच बरोबरी करवेना. दोन तीन महिन्यांतच आचार्यांनीं षट्शास्त्रांचा अभ्यास आटोपला. तेव्हां त्यांच्या गुरूंनीं त्यांजकडे दुसऱ्या शिष्यास पाठ देण्याचें सोपविलें. त्यांतही आचार्य प्रवीण झाले. ते केवळ त्यांच्या पाठांतीलच अर्थ समजून देत असें नाहीं, तर त्यांतील शंका प्रतिशंका काढून त्यांचें समाधानही सांगत. ह्याप्रमाणें आचार्य पाठ देऊं लागले ह्मणजे तो ऐकावयास अनेक लोक जमत. त्यामुळें आचार्यांची कीर्ति हां हां ह्मणतां सर्वतोमुखीं पसरत चालली. वेदांमध्यें प्रत्यक्ष ब्रह्मदेव; शिक्षा आदिकरून वेदांगांमध्यें गार्ग्य; शास्त्रांतील रहस्य सांगण्यामध्यें जणों काय बृहस्पति; वेदोक्त कर्म वर्णनाविषयीं जैमिनी व तत्त्वज्ञानामध्यें मूर्तिमंत व्यासच होत असे अल्पवयांतच आचार्य सर्व लोकांस भासूं लागले.

**१४ पहिला चमत्कार**—अशा रीतीनें आचार्य गुरुगृहीं असतां, सर्व सहाध्यायांबरोबर प्रत्यहीं भिक्षेस जाऊन आपला निर्वाह करित असत. त्या नित्यनियमा-

प्रमाणें एके दिवशीं ते आपल्या गुरुबंधूसह भिक्षेस निघाले, व जातां जातां एका अत्यंत दरिद्री ब्राह्मणाच्या घरीं गेले. ब्राह्मण कांहीं घरांत नव्हता, परंतु त्याची साध्वी स्त्री मात्र घरांत होती. तिनें डोळ्यांत आंसवें आणून दीनवाणीनें आचार्यांची प्रार्थना केली कीं " महाराज ! मी अत्यंत निर्धन व हतभागी आहें. कारण, आपल्यास भिक्षा घालण्यासारखें माझ्या घरांत आज कांहींच दिसत नाहीं. तथापि, आपल्यासारख्यास विन्मुख दवडणें हें उचित नव्हे. ह्मणून हें एक आमलकीफल ह्मणजे आवळा देत आहें तेवढा ग्रहण करून कृपा करावी" असें ह्मणून तिनें परमभक्तिभावानें आचार्यांस एक आवळा दिला. ती तिची स्थिति पाहून आचार्यांस फार दया आली. आणि त्यांनीं तत्काल तेथें लक्ष्मीचा स्तव केला. तेव्हां ती प्रत्यक्ष प्रगट होऊन प्रसन्न वदनानें आचार्यांस ह्मणाली कीं, "माझा स्तव कशाकरितां केला होता?" आचार्य हात जोडून ह्मणाले " हा ब्राह्मण फार दारिद्र्यांत दिवस काढित आहे. तेव्हां आपण आपल्या कृपाकटाक्षानें त्यास धनसंपन्नकरून सोडावें." त्यावर हास्यमुद्रेनें देवी ह्मणाली " यानें पूर्वजन्मीं कोणास कांहीं दिलेलें नाहीं; तेव्हां या जन्मांत ह्याला तरी कसें द्यावें?" आचार्यांनीं प्रार्थना केली " पूर्वजन्मींचा दोष कांहींही असो; ज्याला तुझें दर्शन झालें, त्याला तुझ्या दर्शनाचें फल हें मिळालेंच पाहिजे. शिवाय, ह्या स्त्रीनें भक्तिभावानें मला एक आवळा अर्पण केला आहे. तदर्थीं त्या पुण्याचें फळ ह्या कुटुंबाला मिळणें इष्ट आहे." हें भाषण ऐकून देवी लक्ष्मी प्रसन्न होऊन तिनें तें त्या ब्राह्मणाचें घर सुवर्णाच्या आवळ्यांनीं भरून टाकलें, आणि आपण अंतर्धान पावली. हें कृत्य पाहून सर्व लोक आश्चर्यानें अगदीं तटस्थ झाले, व ती कीर्ति जलावरील तैलबिंदुवत् सर्वत्र पसरली. आचार्य तेथून निघाले ते नित्यक्रमाप्रमाणें भिक्षा घेऊन आपल्या सर्व सहाध्यायांसह गुरुगृहीं परत आले.

१५ **नदीचा ओघ फिरला**—आचार्य हे गुरुगृहीं राहून एक दोन वर्षांतच वेदशास्त्रांत पारंगत झाल्यानंतर सातव्या वर्षी ते परत आपल्या घरीं गेले. व अध्ययन अध्यापन करून मातेच्या सेवेंत राहून आपली कालक्रमणा करूं लागले. एके दिवशीं त्यांची मातोश्री अंबिका देवी पूर्णानदीवर स्नानास गेली असतां,

त्यांच्या घरापासून नदी त्यावेळीं बरीच दूर असल्यामुळें माध्यान्हकाळच्या उन्हाच्या तापानें त्या वृद्ध मातोश्रीस अत्यंत त्रास होऊन त्या तात्काळ मार्गामध्यें मूर्च्छा येऊन पडल्या. तें पाहून जवळचे लोक धाऊन गेले, व त्यांनीं त्यांस उचलून घरीं आणून ठेविलें. नंतर आचार्यांनीं थोडेसे सीतोपचार वगैरे केल्यानंतर कांहीं वेळानें त्या शुद्धीवर आल्या. व हिंडूं फिरूं लागल्या. मातोश्रींची ती दशा पाहून आचार्यांस फार वाईट वाटलें. आणि ते तसेंच उठून त्या नदीवर गेले, आणि त्यांनीं तिची प्रार्थना केली कीं "हे जगदंबे! मातोश्री! तूं जगज्जननी आहेस. असें असतां माझ्या मातुश्रीला तुझ्यापासून ताप व्हावा हें नीट नव्हे. तिचा तर नित्य नेम आहे कीं तुझें स्नानपान घडावें. ह्याकरितां मी हात जोडून आपली प्रार्थना करतों कीं, आपण थोडीशी कृपा करून तसदी घ्यावी, आणि आमच्या घराशेजारून वाहत जावें. ह्मणजे तिला ताप होणार नाहीं." एखाद्या यःकश्चित् मनुष्यानें जरी भक्तिभावानें एखाद्या देवाची प्रार्थना केली, तरी तो सुद्धां त्याला प्रसन्न होईल. मग आचार्यांसारख्या सर्वज्ञ पुरुषानें व खरी खरी अंतःकरणपूर्वक प्रार्थना केल्यावर ती काय अमान्य होणार? निस्सीम भक्ताच्या इच्छेविरुद्ध जाण्याची देवादिकांना सुद्धां शक्ति नाहीं, मग ती नदी कशी जाणार? असो. ही प्रार्थना करून आचार्य घरीं गेले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं सर्व लोक पहातात तों पाव मैल लांब असलेली पूर्णा नदी आचार्यांच्या अगदीं परसांतून वाहूं लागली. आचार्यांचें मूळ घर, मूळ गांव, व मातोश्रीचें दहन केलेलें स्मशान आह्मीं स्वतः जाऊन पाहून आलों आहों. हल्लींचें पूर्णा नदीचें पात्र अगदीं त्या स्मशान भूमीला लागूनच आहे. नदीचा ओघ फिरलेला पाहतांच हजारों लोक तोच चमत्कार पहावयास तेथें येऊं लागले. व आचार्य हे साक्षात् ईश्वरी अंश आहेत असें ह्मणून सर्व लोक त्यांची कीर्ति गाऊं लागले.

**१६ राजनिमंत्रण**— आचार्यांची कीर्ति त्यांच्या विद्वत्तेवरूनच आधीं पसरलेली होती. त्यांत आणखी एका ब्राह्मणाला धनाढ्य करून सोडलें. आणि त्याहीपेक्षा आपल्या गांवच्या नदीचा ओघ आपल्या दारापुढें आणून सोडला. मग

काय विचारावें ? जिकडे तिकडे आचार्यांच्या अद्भुत चरित्राच्या गोष्टीच सर्वतोमुखीं होऊन राहिल्या. ही कीर्ति जात जात केरळदेशच्या राजाच्या कानावर गेली. तेव्हां तो आचार्यांच्या दर्शनाविषयीं फारच उत्सुक झाला. त्यानें आपल्या प्रधानांपैकीं अत्यंत शहाणा असा एक प्रधान निवडून काढून त्याच्याबरोबर हत्ती, घोडे, उत्तम पोषाख व जडजवाहीर देऊन आचार्यांस सन्मानपूर्वक घेऊन येण्याविषयीं पाठविलें. त्यानें जाऊन आचार्यांचें दर्शन घेतलें. व राजानें दिलेलीं वस्त्राभरणें व नजरनजराणा पुढें ठेवून हात जोडून नम्रपणें विनंति केली कीं, " हे महात्मन् ! मी ह्या देशाच्या राजाकडून आपल्यास विनंति करण्यास आलों आहें. ती विनंति हीच कीं महाराजांनीं आपल्या सेवेस हत्ती, घोडे, व हा नजरनजराणा पाठविला आहे ह्याचा कृपा करून स्वीकार व्हावा व आपण आमच्या समागमें राजगृहापर्यंत येऊन महाराजांना दर्शनानें कृतार्थ करावें. येवढीच विनंति करण्याकरितां मी मुद्दाम आलों आहें. " हें प्रधानाचें भाषण ऐकून आचार्य ह्मणाले " भिक्षा हेंच आमचें अन्न; आणि कृष्णाजिन हें आमचें वस्त्र; तेव्हां राजाकडे येऊन आह्मांस राजापाशीं मागावयाचें तें काय ? कष्टसाध्य अशी त्रिकाल स्नानसंध्या करून आह्मी आपली कालक्रमणा करणारे. ह्याकरितां हत्ती घोडे इत्यादिकांची उपाधि आह्मांस काय कामाची ? आणि द्रव्याचा तरी आह्माला काय उपयोग ? ह्याकरितां हें सर्व परत न्यावें. आणि राजास आमचा आशिर्वाद सांगावा. " कोणत्याही सत्पुरुषाची रीती अशीच असते. त्यांची कीर्ति पसरली ह्मणजे राजेलोक त्यांच्या दर्शनाविषयीं उत्कंठित होतात. पण ते निस्पृह असल्यामुळें राजाच्या कृपेची मुळींच पर्वा करीत नाहींत. द्रव्याचा तर त्यांना मनापासून वीट आलेला असल्यामुळें अशा प्रकारच्या राजदरबारच्या आमंत्रणाचा ते अव्हेरच करतात. तुकाराम महाराजांसही श्री छत्रपति शिवाजी महाराजांनीं प्रथमतः असेंच ' दिवट्या, छत्री, घोडे, ' पाठविले होते. पण त्यांनीं तें आचार्यांप्रमाणेंच परत पाठविलें असल्याचें उदाहरण तर आपल्या नेहमींच्या परिचयांतीलच आहे. तोच प्रकार आचार्यांच्या संबंधानें केरळ देशच्या राजाचा झाला. कारण, आचार्यांची ती वाणी

श्रवण करून तो प्रधान तसाच परत राजधानीस गेला व त्यानें तो आचार्यांचा निरोप व आशीर्वाद राजास श्रुत केला. तेव्हां ती आचार्यांची निस्पृहता पाहून तर त्या राजाला आचार्यांच्या दर्शनाविषयीं अतिशयच उत्कंठा लागून राहिली. आणि, त्यामुळें तो स्वतःच निघून आचार्यांच्या दर्शनास आला. तेव्हां आचार्यांनीं थोडे कुशल प्रश्न विचारून येण्याचें कारण विचारलें. राजानें दहा हजार मोहरा आचार्यांपुढें ठेवून विनंति केली कीं, " मी केवळ आपल्या दर्शनाकरितांच आलों आहें. तरी मी कांहीं ग्रंथ रचले आहेत तेही आपण अवलोकन करावेत, अशी माझी इच्छा आहे. " असें ह्मणून राजानें स्वतः रचलेलीं व शृंगारादि रसांनीं परिपूर्ण अशीं तीन नाटकें त्यांस दाखविलीं. तीं श्रवण करून आचार्यांनीं राजाच्या चतुरस्र बुद्धिबद्दल बरीच प्रशंसा केली. आणि पुढील मोहरांकडे पाहून राजास ह्मणाले " राजा ! द्रव्याची आह्माला इच्छा नाहीं, व आवश्यकताही नाहीं. ह्याकरितां तें परत न्यावें. किंवा तसें नेण्यास संकोच वाटत असल्यास एखादें देवालय बांधावें ह्मणजे झालें. आतां ह्याशिवाय आपली काय इच्छा आहे ती सांगावी " अशी ती आचार्यांची अमृतमय मधुर व प्रसादवाणी श्रवण करून राजानें हात जोडून विनंती केली कीं " माझ्यासारखाच मला पुत्र व्हावा अशी इच्छा आहे. " हें ऐकून आचार्यांनीं प्रसन्न मुद्रेनें " हे राजा ! तुला तुझ्यासारखाच पुत्र होईल. काळजी नसावी. " असा आशीर्वाद देऊन राजास जाण्याविषयीं निरोप दिला. तेव्हां तो राजा आनंदयुक्त होऊन परत आपल्या नगरास गेला, व त्यास आचार्यांच्या आशीर्वादाप्रमाणें पुत्रही झाला.

१७ **ऋषींचें आगमन**—साक्षात् शंकर भूतलावर अवतार घेऊन आले आहेत हें जाणून अगस्त्य, उपमन्यु, आदिकरून कांहीं ऋषी, आचार्यांचें दर्शन घेण्याकरितां ह्मणून एके दिवशीं त्यांच्या घरीं आले. त्यांस पाहतांच आचार्यांनीं आदरपूर्वक त्या सर्वांस वंदन करून आसनें वगैरे देऊन अर्घ्य पाद्यादिकांनीं मधुपर्कपूर्वक त्यांची पूजा केली. व आनंदानें ते त्यांच्यांशीं मोक्षमार्गासंबंधानें गोष्टी बोलत बसले. हें पाहून आचार्यांच्या मातोश्री त्यांच्या संनिध येऊन त्यांस

वंदन करून हात जोडून ह्मणाल्या कीं " आपल्या येण्यानें आह्मी कृतार्थ झालों. कारण, ह्या कलियुगांत आपल्यासारख्यांचीं दर्शनें परम दुर्मिळ आहेत. आतां हा माझा पुत्र जो आपल्या अग्रभागीं बसला आहे, त्यानें अल्प वयांत सर्व विद्या संपादन केली. व ह्याची लीला तर इतकी अद्भुत आहे कीं, तिचें मोठमोठ्या राजांस सुद्धां कौतुक वाटतें. मग माझ्यासारख्या दुबळ्या अनाथ स्त्रीला तें वाटेल ह्यांत नवल तें काय ? तेव्हां ह्यानें पूर्वजन्मीं असें कोणतें तप केलें होतें कीं, त्यामुळें त्याला हें असें सामर्थ्य प्राप्त झालें ? तें मला आपणाकडून ऐकण्याची इच्छा आहे. ह्याकरितां तें ऐकण्याला मी योग्य असेन, व तें सांगण्याला आपल्याला प्रत्यवाय नसेल तर सांगण्याची कृपा करावी. " ह्या त्यांचा प्रश्न ऐकून अगस्त्य ऋषि ह्मणाले " हे साध्वी ! पूर्वीं तुझ्या पतीनें व तूं सुपुत्रप्राप्तीकरतां शंकराची आराधना केली होतीत. त्यामुळें शंकर प्रसन्न होऊन तुझ्या पतीला वर माग ह्मणतांच 'मला पुत्र व्हावा' अशी त्यांनीं त्यांची प्रार्थना केली. तेव्हां शंकर ह्मणालेः—

**वरयस्व शतायुषः सुतानपि वा सर्वमिदं मितायुषम् ।**
**सुतमेकमितीरितः शिवं सति सर्वज्ञमयाचतात्मजम् ॥ १ ॥**

" शतायु परंतु अल्पज्ञ असे अनेक पुत्र पाहिजेत किंवा अल्पायु असून सर्वज्ञ असा एकच पुत्र पाहिजे ?, असा प्रश्न केल्यावर हे सती ! तुझ्या पतीनें सर्वज्ञ असा एकच पुत्र मागितला. तेव्हां 'तुला सर्वज्ञ असा एकच पुत्र होईल' असें वरप्रदान देऊन शंकर आपल्या स्थानीं गेले. परंतु देवादिकांमध्यें सुद्धां सर्वज्ञ असा श्रीशंकरावांचून दुसरा कोणीच नाहीं. ह्मणून शंकरांनीं स्वतःच पुत्ररूपानें तुझ्या उदरीं जन्म घेतला आहे. " ह्याप्रमाणें अगस्त्य ऋषींचें भाषण श्रवण करून त्या साध्वीनें पुन्हा प्रश्न केला कीं, " पण ह्या मुलाचें आयुष्य किती आहे तें सांगावें. कारण, सर्वज्ञ परंतु अल्पायु आहे असें आपल्या मुखांतून निघाल्यामुळें अत्यंत खेद उत्पन्न झाला आहे. " तें ऐकून अगस्त्य ऋषि ह्मणाले " ह्या तुझ्या पुत्राला खरोखर सोळाच वर्षें आयुष्य आहे. तथापि कांहीं कारणानें त्याची वृद्धि होऊन तो आणखी सोळा वर्षें ह्या भूमंडलावर

राहील. मिळून एकंदर ३२ वर्षें ह्याचें आयुष्य आहे." इतकें भाषण अगस्त्य ऋषि बोलत आहेत तोंच उपमन्यु आदिकरून ऋषींनीं नेत्रसंकेतानें उठविण्याविषयीं सुचविलें. तेव्हां तें बोलणें तितकेंच सोडून देऊन सर्व ऋषी आचार्यांचा निरोप घेऊन ते मार्गस्थ झाले.

१८ **मातुश्रींची समजूत**—ऋषींच्या मुखांतून अशा आपल्या गुणवंत, विद्वान् व सर्वज्ञ पुत्राचें आयुष्य अल्प आहे असें ऐकल्याबरोबर त्या माउलीच्या मनाची स्थिति काय बरें झाली असावी ? तिचें अंतःकरण दुःखानें होरपळून गेलें. तिच्या डोळयांपुढें आंधारी आली ! तिची वृत्ति क्षणैक शून्य होऊन राहिली. सर्व ऋषि आचार्यांचा निरोप घेऊन निघून गेले मात्र, तोंच झंझावातानें जशी एखादी केळ धाड्कर जमिनीवर कोसळावी, त्याप्रमाणें ती बिचारी माता मूर्च्छा येऊन धरणीवर पडली ! ती मातुश्रींची स्थिति पाहून आचार्यांनीं नेत्रांस पाणी वगैरे लावून तीस सावध केलें आणि ह्मणाले " आई ! ह्या संसाराची स्थिति अशीच क्षणभंगुर आहे. त्याबद्दल शोक करणें व्यर्थ होय. रथाच्या ध्वजावरील कापड जसें चंचल असतें त्याप्रमाणेंच हें शरीरही चंचल आहे. हें समजून अज्ञानी लोकसुद्धां त्याबद्दल शोक करीत नाहींत. आणि तूं तर सुज्ञ आहेस. तेव्हां तुझ्यासारख्यांनीं शोक करणें मुळींच उचित नव्हे. कारण, नानाप्रकारचे लोक भिन्नभिन्न मार्गांनीं येऊन एके ठिकाणीं मिळतात, आणि पुन्हा आपआपल्या मार्गांनीं चालते होतात. त्याप्रमाणेंच हा दारापुत्रादिकांचा समागम केवळ क्षणभंगुर असतो. ह्याकरितां तूं कोणत्याही प्रकारचा शोक करूं नको. आणखी माझा विचार ह्मणशील तर निराळाच आहे. तो हा कीं, हा सारा संसारच जर दुःखमूळ आहे, तर तो करावा तरी कशाला ? ह्मणून माझी तर अशी इच्छा आहे कीं, चतुर्थाश्रम घेऊन ह्या सर्व उपाधीपासून मुक्त व्हावें. ह्याकरितां तूं मला संन्यास घेण्याविषयीं आज्ञा दे.'

आचार्यांच्या मातुश्रींनीं तर आपल्या आप्त इष्टांच्या साह्यानें आचार्यांच्या लग्नाची तयारी चालविली होती. आणि त्या बिचाऱ्या कोणती मुलगी पसंत करावी ह्या विचारांत होत्या. आणि त्यांतूनही आपला मुलगा अल्पायु असल्याचें

त्यांच्या कानावर येऊन त्या दुःखानें त्या विव्हल झाल्या होत्या. आणि त्यांतच पुत्र आणखी आपल्यापाशीं संन्यास घेण्याची आज्ञा मागतो; हें पाहिल्यावर त्या माउलीची काय बरें अवस्था व्हावी ? आतां मात्र आपल्या दुःखाचा कडेलोट झाला असें त्यांस वाटलें. त्यांचा कंठ भरून आला; नेत्रांत अश्रु डबडबले; आणि मोठ्या काकुळतीस येऊन त्या ह्मणाल्या "बाळा ! अरे ! आह्मी तुझ्या लग्नाच्या विचारांत आहोंत, आणि तूं हें काय मनांत आणिलें आहेस ? ही भलतीच बुद्धि सोडून दे आणि चारचौघांप्रमाणें गृहस्थाश्रम करूनच रहा. संन्यास झाला तरी आधीं संसार करून मुलें बाळें झाल्यानंतर करावा असें ह्मणतात. आणि शिवाय, तूं मला अशा वृद्धापकाळीं सोडून का जाणार ? हें तरी तुला ठीक दिसतें कां ? पतीच्या पश्चात् पुत्रावाचून मातेचें संरक्षण दुसरा कोण बरें करील ? बरें; मागें पुढें मी मरण पावलें, तर माझें और्ध्वदेहिक कर्म तरी तुझ्याशिवाय दुसरें कोण करणार ?" असें ह्मणत त्या पुन्हा मूर्च्छा येऊन पडल्या ! तेव्हां आचार्यांनीं पुन्हा आपल्या मातुश्रीस सावध करून मधुर भाषणानें गृहकृत्यांस लावली. परंतु मनांत मात्र निश्चयकरून ठेवला कीं, मला आतां आठवें वर्ष लागलें. तेव्हां ह्याच वयांत संन्यास घ्यावयाचा. व कसें तरी करून मातुश्रींच्या तोंडून पडत्याफळाची तरी आज्ञा घ्यावयाची. ह्मणून त्यांनीं एक चमत्कारिक युक्ति योजून ठेविली. ती पुढच्याप्रकरणांत येईलच. पहा ! वय अवघें आठ वर्षांचें ! ह्मणजे लोकरीतीप्रमाणें ज्यांत चेंडू दांडू व लगोऱ्या खेळावयाच्या ! किंवा अज्ञानपणाचे चाळे करावयाचे. पण आचार्यांचा निश्चय संन्यास घेण्याचा ! हें मनांत आलें ह्मणजेः—

**'किती वय कसें तप प्रखर काय विश्वास तो'**

ह्या मयूर 'केकावली'ची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. अशा बालकामध्यें ईश्वरी अंश नाहीं ह्मणावें, तर तो दुसऱ्या कोणांत असणार ?

**१९ संन्यास घेण्याविषयीं अनुज्ञा**—मनुष्याच्या मनाचा एकदां दृढनिश्चय झाल्यानंतर दुसऱ्याच्या आडकाठीनें तो फिरणार थोडाच ! अशीच अवस्था आचार्यांसंबंधानें झाली. श्रीसमर्थ रामदास स्वामींनीं ज्याप्रमाणें त्यांच्या

मातुश्रींनीं केलेला लग्नाचा बेत फेटाळून लावला, व तपश्चर्येचा बेत कायम केला, त्याप्रमाणेंच हुबेहुब आचार्यांनींही संन्यासाचा व वैराग्याचा बेत आपल्या मनामध्यें अगदीं कायम करून ठेवला होता. आतां फक्त समर्थांनीं जसें आपल्या मातुश्रीचें वचन पुरविलेंसें केलें, तसेंच ह्यांनाही कांहींतरी युक्तिप्रयुक्तीनें आपलें वचन पुरें करावयाचें येवढेंच काय तें बाकी उरलें होतें. मनुष्याचा निश्चय तितकाच दृढतर झाला, तर मग तशा संधीला तरी काय उशीर ! तीही आपोआप चालत येते. किंवा असले करारी पुरुष ती मुद्दाम घडवून आणतात. कांहीं ह्मटलें तरी एकच. त्याप्रमाणेंच एके दिवशीं योगायोग आला. ह्या समयीं पूर्णानदीचें पात्र आचार्यांच्या अगदीं घराशेजारून वाहूं लागल्याचें पूर्वीं कळविलेंच आहे. त्या नदींत एके दिवशीं आचार्य नित्याप्रमाणें स्नानास गेले व पोहूं लागले. तों अकस्मात एका मगरानें येऊन त्यांचा पाय धरला. तेव्हां आचार्य मोठमोठ्यांनीं आक्रोश करूं लागले. त्या मुलाच्या दीनवाण्या आरोळ्या ऐकून, मातुश्री स्वयंपाक करित होत्या त्या तशाच धाऊन दरवाज्या-बाहेर येऊन पाहूं लागल्या. तों आचार्य हे खोल डोहामध्यें असून त्यांचा पाय एका मोठ्या मगरानें धरला आहे. तो सोडून घेण्याविषयीं आचार्य यत्न करित आहेत पण मगरमिठी कांहीं सुटत नाहीं. हा प्रकार पाहून बाईचे तर हात पायच गळाले ! त्याही मोठमोठ्यांनीं शेजाऱ्यापाजाऱ्यांस हाका मारूं लागल्या. पण तेथें वेळ तो किती ? आणि तितक्यांत येणार तरी कोण ? हिकडे वेळ तर आणीबाणीची येऊन पोंचलेली. कारण, मगराची आणि आचार्यांची झटपट चालू. तेव्हां ती बिचारी साध्वी पुत्रमोहानें अगदीं घाबरून जावी हें अ-गदीं साहजीकच आहे. ही संधि पाहून आचार्य मोठ्यानें आईस ह्मणाले "आई ! ह्या मगरानें पाय सोडावयाला एकच उपाय आहे. तूं जर मला संन्यास घ्याव-यास आज्ञा देशील तर हा मगर माझा पाय सोडील. नाहीं तर हा मी चाललों." हें ऐकून त्या माउलीस असें झालें कीं कांहींही होवो, पण माझा मुलगा माझ्या हातीं लागो. असा विचार करून तिनें दीनवाणीनें ह्मटलें "बाबा! दिली. पण घडपणीं परत ये कसा एकदाचा." हे शब्द मातुश्रीच्या मुखांतून

निघाले मात्र, तोंच मगरानें आचार्यांचा पाय सोडला व ते झट्कर येऊन मातोश्रीपाशीं उभे राहिले. मुलास सुखरूप व पायांस जखम वगैरे न होतां परत आलेला पाहतांच त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रु आले. आणि मोठ्या प्रेमानें कुरवाळून त्यास घेऊन त्या घरांत आल्या. ह्या गोष्टीवरून आचार्यांनीं मातुश्रींच्या मनांत एक गोष्ट बिंबवून दिली कीं, ह्या संसाररूपी नक्रापासून सुटण्यासही संन्यासाशिवाय दुसरें कांहीं साधन नाहीं.

असो. याप्रमाणें त्यादिवशीं आनंदानें भोजन वगैरे उरकल्यानंतर आचार्यांनीं पुन्हा मातोश्रीपाशीं गोष्ट काढली कीं " आई ! आतां मला आपली आज्ञा असावी. कारण, संन्यासाला जे जे धर्म उचित आहेत ते ते मला केले पाहिजेत, आणि त्यासाठीं मला देशाटनास जाणें भाग आहे. आपली वडिलोपार्जित जिनगी बरीच आहे. त्यावर तुझ्या अन्नवस्त्राचा निर्वाह होईल. आतां कदाचित् तूं ह्मणशील कीं, संन्यास घेतल्यानंतर तुला रोगादिकांची पीडा झाली किंवा कमजास्ती प्रसंग आला तर तुझी सेवा करावयाला व तुझें और्ध्वदेहिक कर्म करावयाला कोण आहे ? तर आपले आप्त व बंधुजन येथें आहेतच. ते तुझें कांहीं कमी पडूं देणार नाहींत. ह्याकरितां मला जाण्यास आतां आज्ञा द्यावी." तेव्हां ती ह्मणाली " माझें और्ध्वदेहिक जर दुसरे करणार तर मग तूं माझ्या पोटीं जन्मास येऊन फळ काय ? कारण और्ध्वदेहिककर्म करणें हेंच पुत्राचें मुख्य कर्तव्य आहे. व त्याला धर्मग्रंथांतही अनेक प्रमाणें आहेत. करितां तें कर्म तरी तूंच केलें पाहिजेस." हा मातुश्रींचा विशेष आग्रह पाहून व हेतु जाणून ती गोष्ट आचार्यांनीं मान्य केली. आणि ते ह्मणाले " आणखी आई ! तूं जर व्याधिग्रस्त होऊन तुझा अंतकाल समीप आला असें तुला वाटलें, तर तूं माझें स्मरण कर, ह्मणजे मी तत्काल तुझ्याजवळ येईन, आणि तुझें और्ध्वदेहिक कृत्य मी स्वतः करीन. तूं कांहीं एक काळजी करूं नको." असें सांगून आपल्या मातुश्रीला आपल्या भाऊबंदांच्या स्वाधीन करून व तिचें संरक्षण फार काळजीपूर्वक करावें असें सांगून आईस ह्मणाले कीं, "हे सर्व बांधव तुझें संगोपन माझ्यापेक्षांही शतपट अधिक करतील. ह्याकरितां तूं कोणत्याही प्रकारें चिंता करूं नको." याप्रकारें

सर्व व्यवस्था लावून आचार्यांनीं सद्गुरु पाहून संन्यास ग्रहण करण्याचा निश्चय केला.

२० **श्रीकृष्णमूर्तीची स्थापना**—इतक्यांत ज्या पूर्णानदीचा प्रवाह मातुश्रींना कष्ट होऊं नयेत ह्मणून आचार्यांनीं आपल्या द्वारामध्यें आणला होता, त्याच नदीच्यो पात्रांत त्या नदींत असलेली एक कृष्णाची मूर्ति प्रवाहाच्या जोरानें स्थानभ्रष्ट झाली होती. तींतून असा शब्द झाला कीं "मी ह्या नदीच्या प्रवाहांतरानें फार त्रस्त झालों आहें, तरी माझी योग्य ठिकाणीं स्थापना करावी." हा शब्द ऐकून आचार्यांनीं ती मूर्ति तेथून काढून आणली, व आपल्या गृहाच्या मध्यभागीं स्थापन करून तिच्या पूजेची वगैरे व्यवस्था बांधवजनांना सांगून आचार्य संन्यास ग्रहण करण्याकरितां स्वगृहांतून बाहेर पडले. ह्यावेळीं आचार्यांचें वय अवघें ८ वर्षांचें होतें, ही गोष्ट फार ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ही आचार्यांनीं स्थापन केलेली मूर्ति अद्याप त्यांच्या घरांत असून मंदिरही चांगलें बांधलेलें आहे. ही मूर्ति व स्थळ आह्मी प्रत्यक्ष पाहून तिचें दर्शन घेतलें आहे.

२१ **आचार्यांची संन्यासदीक्षा**—संन्यास ग्रहण करण्याच्या उत्कंठेनें आचार्य देशसंचार करीत करीत निघाले ते नानाप्रकारचीं वनें नगरें, ग्राम, पर्वत, नद्या, इत्यादिकांचें उल्लंघन करीत करीत व अद्वैतमताची स्थापना करीत नर्मदातटाकीं गेले. तेथील अरण्यांतील एका गुहेंत गोविंदनाथ ह्मणून कोणी एक महान् सत्पुरुष राहतात हें श्रवण करून आचार्य त्यांच्या दर्शनासाठीं त्या स्थानीं गेले. गोविंदनाथ हे परम विरक्त असून त्यांची कीर्ति फारच अद्भुत होती. त्यावरून त्यांसच गुरु करण्याचा आचार्यांनीं निश्चय केला. आचार्यांनीं गोविंदनाथांच्या आश्रमांत प्रवेश केला तों तो आश्रम फारच रमणीय आणि पवित्र असा होता. तेथें पपनसादि फलवृक्ष व चंपक आदिकरून पुष्पवृक्ष फलपुष्पांनीं गजबरलेले होते. तें स्थान पाहूनच आचार्यांचें मन सुप्रसन्न झालें. गोविंदनाथांच्या गुहेस त्यांनीं प्रथम तीन प्रदक्षिणा घातल्या, आणि मग आंत जाऊन काव्यमय मधुरवाणीनें त्यांनीं त्यांचा स्तव केला. त्यांतील सारांश असाः—

"साक्षात् महाविष्णूचा जो पर्यंक ह्मणजे शय्यास्थान; शंकराचें जें कंठभूषण; ज्यानें ह्या सप्तद्वीपात्मक पृथ्वीचा भार आपल्या मस्तकावर धारण केला आहे असा जो शेष, त्याचे आपण प्रत्यक्ष अवतार आहां. सहस्र मुखें पाहिलीं तर आपले शिष्य भय पावतील अशा हेतूनेंच जणों काय, आपण एकच मुख धारण करून संपूर्ण शिष्यांवर अनुग्रह करण्याकरितां मूर्तिमंत प्रगट झालां असें वाटतें. ज्यानें पाताळीं जाऊन साक्षात् शेषापासून अशेष ज्ञान संपादन केलें, ते पतंजलीच आपण आहांत. आणि व्यासशिष्य जे शुक, त्यांचे शिष्य गौडपाद यांजपासून परिपूर्ण ब्रह्मज्ञान प्राप्त झालेले अशा आपणांस, ब्रह्मज्ञान प्राप्त व्हावें ह्मणून अनन्य भावानें मी शरण आहें. करितां मजवर कृपा करावी."

ही गंभीर, आणि अधिकारयुक्त अशी वाणी श्रवण करून गोविंदनाथांनीं आचार्यांस विचारलें कीं, "तूं कोण आहेस ?" तेव्हां आचार्य बोलले:—

**स्वामिन्नहं न पृथिवी न जलं न तेजो**
**न स्पर्शनो न गगनं न च तद्गुणा वा ।**
**नापींद्रियाण्यपि तु विद्धि ततोऽवशिष्टो**
**यः केवलोऽस्ति परमः स शिवोऽहमस्मि ॥ १ ॥**

"हे स्वामिन् ! मी पृथ्वी नव्हे, जल नव्हे; तेज नव्हे; वायु नव्हे, आकाश नव्हे; किंवा त्यांचे गुणही पण मी नव्हे. तसेंच इंद्रियांचा समुदायही पण मी नव्हे. तर त्याहून निराळा असा मी शिवस्वरूप आहें," असें हें अद्वैत साक्षरयुक्त आचार्यांचें वचन ऐकून गोविंदनाथांचे हृदयांत अत्यंत आनंद झाला. ते त्यांस प्रसन्न मुद्रेनें ह्मणाले कीं "प्रत्यक्ष शंकर तोच तूं असल्याचें मी समाधिदृष्टीनें जाणतों." याप्रमाणें परस्परें भाषण झाल्यानंतर आचार्यांनीं गोविंदनाथांची मोठ्या भक्तिभावानें पादपूजा केली. आणि थोडे दिवस गुरुसेवा झाल्यानंतर गोविंदनाथांनीं त्यांस उपदेश देऊन संन्यासदीक्षा दिली.

**२२ गुरुगृहीं केलेला चमत्कार**—आचार्य गुरुगृहीं ह्मणजे गोविंदनाथांच्या आश्रमांत असतां पर्जन्यकालांत एक वेळ मनस्वी पर्जन्य पडून नर्मदा नदीस

महापूर आला. तेणेंकरून तीरावर असणारे सारे वृक्ष तर वाहून गेले, इतकेंच नव्हे तर तेथील राहणारे लोकसुद्धां वाहून जाऊं लागले. तेव्हां त्यांचा तो आक्रोश श्रवण करून आचार्यांस त्यांची फार दया आली. आणि त्यांनीं आपल्या गुरूकडे पाहून एक कमंडलु आपल्या हातांत घेतला आणि त्यास अभिमंत्रण करून नदीला आज्ञा केली कीं " तूं या कमंडलूमध्यें प्रवेश करावास. " तेव्हां सर्व प्रवाह त्या कमंडलूमध्यें शिरला आणि सर्व लोक त्या दुःखापासून मुक्त झाले !

२३ **गुरूंची आज्ञा**—आचार्यांनीं कांहीं दिवस सद्गुरुसमागमांत घालविल्यानंतर एके दिवशीं गोविंदनाथांनीं त्यांस सांगितलें कीं तुझा अवतार वैदिक धर्म स्थापनेकरितां आहे. ह्याकरितां तूं आतां जन्ममरणात्मक संसाररूप दावाग्नीचा नाश करणारी, सत्यासत्याचा निर्णय करणारी, तत्त्वपद्धतिरूप जी मेघपंक्ति तिची वृष्टि करण्याकरतां शंकराचें वसतिस्थान जी काशी, तेथें जाऊन कांहीं दिवस रहा, आणि तेथें शारीरभाष्य तयार कर. ह्याविषयीं पूर्वीं घडलेला वृत्तांत सांगतों, इकडे लक्ष्य असूं दे. प्राचीन काळीं अत्रि ऋषींनीं हिमालय पर्वतावर यज्ञ केला. त्या काळीं तेथें इंद्रादिदेव व मोठे मोठे महर्षीही आले होते. पराशरपुत्र व्यासही तेथें असून त्यांनीं उपनिषद्भागाचें विवरण चालविलें. त्यावेळीं मी त्यांना प्रश्न केला कीं, " हे आर्य ! आपण वेदसमूहाचे विभाग केले, परंतु " **अथातो ब्रह्मजिज्ञासा** " इत्यादि आपण केलेलीं जीं ब्रह्मसूत्रें त्यावर भाष्य नाहीं. यामुळें पाहिजे ते लोक आपआपल्या मताप्रमाणें हवा तसा अर्थ करतात. ह्याकरितां तसें होऊं नये. आपण स्वतः त्या ब्रह्मसूत्रावर भाष्य करावें. " याप्रमाणें माझें भाषण ऐकून व्यास बोलले कीं, " आपण जसा मला प्रश्न केला, तसाच सर्व देवांनीं श्रीशंकरांना पूर्वीं केला होता. तेव्हां " मी स्वतःच त्यांच्यावर भाष्य करीन " असें त्यांस शंकराचें अभिवचन मिळालें आहे. त्याप्रमाणें तो शंकरच तुझा शिष्य होऊन भाष्य करून तुझें यश विस्तृत करील. " ह्याप्रमाणें मला सांगून व्यास कैलास पर्वतावर गेले. त्या भवितव्याप्रमाणें सर्व तत्त्ववेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असा तूंच आहेस. ह्यास्तव निरवयव अशा निबंधनानें जगदुद्धार करण्याचा यत्न कर. पवित्रोदकानें

वाहणाऱ्या भागीरथी नदीनें शोभणारी अशी जी विश्वेश्वरपुरी ह्मणजे काशी; तें क्षेत्र वास्तव्य करण्याला फारच योग्य आहे. ह्याकरितां तूं तेथें जाऊन कांहीं दिवस रहा. आणि ब्रह्मसूत्रावर भाष्य कर. तेथें सर्व देवता तुला साह्य करतील." ह्याप्रमाणें सांगून व पूर्ण कृपाकटाक्षानें अवलोकन करून गोविंदनाथांनीं आचार्यांना निरोप दिला. तेव्हां सद्गुरुसंगतीचा लाभ अंतरणार ह्मणून त्यांस जरी दुःख झालें, तरी गुरूची आज्ञा शिरसा वंद्य करून व गुरूंच्या पादकमलावर मस्तक ठेवून ते निघाले. ते कांहीं दिवसांनीं श्रीक्षेत्र काशीस जाऊन पोंचले. व तेथें विष्णुपदापासून उत्पन्न झालेली, शंकरांनीं मस्तकावर धारण केलेली, व हिमालय पर्वतापासून प्रगट झालेली जी भागीरथी, तिचें स्नान करून सर्व देवादिकही ज्याचें अर्चन करितात अशा विश्वेश्वराचें पूजा दर्शन वगैरे करून आचार्यांनीं कांहीं दिवस तेथेंच वास केला.

**२७ पट्टशिष्य सनंदन किंवा पद्मपाद**—श्रीमच्छंकराचार्य काशीमध्यें असतां एक परम तेजस्वी ब्राह्मणाचा तरुण मुलगा, संपूर्ण वेदांचें अध्ययन केलेलें असून संसारसमुद्रांतून तरून जाण्याची इच्छा करणारा व वैराग्य-संपन्न असल्यामुळें दारपरिग्रह वगैरे ज्यानें निखालस वर्ज्य केलें आहे, असा येऊन आचार्यांच्या चरणकमलीं लीन होऊन दंडवत् पुढें पडला. त्यास आचार्यांनीं उठवून विचारलें कीं, " तूं कोण आहेस ? तुझें राहण्याचें ठिकाण कोणतें ? व आज कोठून आलास ? हें सांगावें. तुझ्या धैर्यावरून तूं मोठा प्रौढबुद्धीचा आहेस असें दिसतें." ह्याप्रमाणें आचार्यांचे प्रश्न ऐकून तो मुलगा ह्मणला ' स्वामी महाराज ! मी एका ब्राह्मणाचा मुलगा आहें. चोल देशांतील कावेरी तीरचा मी राहणारा आहें. ह्यापेक्षां अधिक काय सांगावें ? आपण सर्वज्ञच आहांत. तेव्हां अधिक सांगण्याची आवश्यकता नाहीं. आतां मी कां आलों ? अशी पृच्छा आहे तर माझा हेतु येवढाच कीं, पृथ्वीवर जेथें जेथें ह्मणून साधु भेटतील, तेथें तेथें जाऊन त्यांचीं दर्शनें घ्यावीत. आणि त्याच उद्देशानें देशपर्यटन करीत करीत मी येथें आलों आहें. तोंच माझ्या पूर्व पुण्याईनें ह्मणा, किंवा ईश्वरीकृपेनें ह्मणा, अनायासें आपलें दर्शन झाल्यानें मी कृतार्थ झालों. आतां

आपण माझ्या गुणदोषांचा विचार न करतां मला संसारसागरांतून मुक्त करावें. कारण, आपण करुणेचे केवळ मेघ आहांत. महाराज ! आपल्या कृपा-कटाक्षापासून होणाऱ्या सुखाची बरोबरी इंद्र, चंद्र, सूर्य, कुबेर, अग्नि, वायु, ब्रह्मदेव ह्यांच्या नगरांची प्राप्ती झाली तरी सुद्धां होऊं शकणार नाहीं." ह्याप्रमाणें त्या मुलाचें भाषण ऐकून आचार्य फार प्रसन्न झाले. त्यांनीं त्यास परम भक्तीनें आपल्या जवळ ठेवून घेऊन संन्यास दिला. आणि आपला शिष्य करून त्याचें नांव 'सनंदन' असें ठेवलें. हाच आचार्यांचा पट्ट शिष्य होय. श्रीसमर्थ रामदास स्वामींचा जसा 'कल्याण' त्याच प्रमाणें आचार्यांचाही हा शिष्य केवळ जीवप्राण होता. ह्यासच कांहीं दिवसांनीं 'पद्मपाद' नांव पडल्याची कथा पुढें येईलच.

यानंतर त्या ठिकाणीं जे जे मुमुक्षु आचार्यांस शरण आले, त्यांसही त्यांनीं आपले शिष्य केले. पुढें साक्षात् विश्वेश्वराचे जे वामदेवादिक शिष्य होते, तेही आचार्यांचें शिष्यत्व करूं लागले. तेव्हां त्यांस ही आचार्यांचे शिष्य असें लोक ह्मणूं लागले, व तेही प्रत्यक्ष शंकर समागमानें आपल्याला धन्य मानूं लागले,

**२५ अंत्यजाशीं संवाद**—अशा प्रकारें आचार्य श्रीक्षेत्र काशी येथें असतां एके दिवशीं सर्व शिष्यांसहवर्तमान गंगास्नानास व आह्निक कर्म करण्यास गंगेवर चालले असतां, श्रीशंकर चांडाळाच्या रूपानें बरोबर चार कुत्रे घेऊन त्याच मार्गानें जात होते. ते मुद्दाम आचार्यांची परीक्षा पाहण्याकरितां त्याच्या अगदीं जवळून जाऊं लागले. तें पाहून आचार्यांनीं त्या चांडाळास 'जरा बाजूस हो, मला शिवूं नको.' असें ह्मटलें. तें ऐकून त्या चांडाळानें थोडेसें हास्य करून बोलण्यास प्रारंभ केला. तो ह्मणाला:—

"यतिवर्य ! ब्रह्म एक, अद्वितीय, निरवयव असें असून तें संगरहित आहे. सत्य, ज्ञान, अनंत, असें ब्रह्माचें स्वरूप आहे. आत्माही अद्वितीय असल्याचें वेदतत्त्वज्ञ बोलतात. तेव्हां वेदांत्यामध्यें श्रेष्ठ अशा आपणाला अशी भेदबुद्धि असणें हें मोठें आश्चर्य होय. आणि त्यावरून आपलें काषाय वस्त्र, दंड, कमंडलु, हीं सर्व गृहस्थांना फसविण्याकरितांच आहेत असें मला वाटतें.

आतां ' दूर हो ' असें जें आपलें ह्मणणें तें आत्म्याला का शरीराला ? आत्म्याला असेल तर आत्मा भिन्न नाहीं. सर्व आत्मे एकच आहेत. शरीराला असेल, तर शरीराच्या अंतर्रचनेप्रमाणें शरिरें ही भिन्न नाहींत. हें आपण सर्व जाणतच आहां. तेव्हां याचें उत्तर काय ? गंगेमध्यें आणि मद्यानें भरलेल्या घागरीमध्यें सूर्याचें प्रतिबिंब जसें एकच; तद्वत् ब्राह्मणाच्या शरीरांतील किंवा चांडाळाच्या शरिरांतील आत्मा एकच आहे. आणि देहादिकांच्या ठिकाणीं आपल्या सारख्या तत्त्वज्ञान्यांना अहंभाव असणें केवळ अनुचित होय. आतां कदाचित् आपण ह्मणाल कीं, मी हें सर्व जाणतों: परंतु लोकरीतीला अनुसरून ' तुला दूर हो ' ह्मटलें. परंतु मुक्तिमार्गांत पोंचलेल्या आपल्या सारख्यांना लोकसंग्रहासारख्या क्षुद्र गोष्टींची पर्वा असणेंही बरोबर नाहीं. आपल्यासारखे तत्त्वज्ञानीही भगवंताच्या मायारूप इन्द्रजालांत गुरफटून फसतात ह्याचें राहून राहून आश्चर्य वाटतें !"

हें चांडाळाचें प्रमाणसिद्ध व शास्त्रसिद्धांतांनीं युक्त असें भाषण श्रवण करून आचार्य तर अगदीं चकित होऊन गेले. आणि ह्मणाले: —

" महाराज ! आपण भाषण केलें तें सर्व सत्य आहे. आपल्या ह्या वचनावरून हा अंत्यज आहे, व हा ब्राह्मण आहे, ही जी भेदबुद्धि, तिचाही मीं आजपासून त्याग केला आहे. आपण खरोखर अंत्यज नसून कोणीतरी श्रेष्ठ ज्ञानी आहांत असेंच मी समजतों. अभेदबुद्धि होणें हें कर्म फार कठीण आहे. कारण, कोणी उपनिषदार्थ आत्म्याशीं युक्त करतात; व कोणी त्याचें निदिध्यासन करतात. परंतु भेदरहित बुद्धि अशी कोणाचीच होत नाहीं. आतां जो कोणी हें ब्रह्मांड व आत्मा हीं एकरूपच असें बुद्धीच्या निश्चयानें मानतो, तो ब्राह्मण असो अगर चांडाळ असो; तो वंदनीयच आहे ह्यांत शंका नाहीं. तसेंच जो ब्रह्मदेव आदिकरून पिपिलिकेपर्यंत एकच चैतन्य समजतो; ज्याचा मीपणा नष्ट झाला, तो कोणीही असो, त्या तत्त्ववेत्त्याला मी गुरुस्थानीं मानतों."

ह्याप्रमाणें भाषण ऐकून श्रीशंकरांनीं तें चांडाळाचें स्वरूप टाकून देऊन आपल्या खऱ्या स्वरूपानें आचार्यांस दर्शन दिलें. तेव्हां आचार्यांनीं मोठ्या भक्तीनें व हर्षानें अष्टमूर्ति शंकराचा स्तव केला.

"हे शंभो! देहदृष्टीनें मी आपला दास आहें. तस्मात् आपली कृपा असावी. जीवदृष्टीनें मी आपला अंश आहें; आणि शुद्ध आत्मदृष्टीनें आपण तो मीच आहें. ह्याबद्दल 'तत्त्वमसि' इत्यादि श्रुति आहेतच."

याप्रमाणें स्तुति केल्यानंतर शंकर बोलले कीं, "हे सच्छ्रेष्ठ आचार्य! व्यासाप्रमाणें आपणही माझ्या कृपेला पात्र आहांत. आतां सर्व शिष्टाग्रणी जे व्यास, त्यांनीं सर्व वेदांतून सार काढून **'अथा तो ब्रह्मजिज्ञासा' 'जन्माद्यस्य यतः' 'शास्त्रयोनित्वात्'** इत्यादि सूत्रसमूह केला आहे. त्यावर कलिदोषांनीं युक्त अशा किंचिद्वेदज्ञांनीं कुत्सित भाष्यें करून त्यांचा विपरीतार्थ केला आहे. ह्याकरितां वेदाचा अर्थ निश्चित कळण्यासाठीं आपण त्यावर भाष्य करून सर्व कुबुद्धि मतांचें खंडण करावें. कारण, आपण सर्व वेदार्थ यथार्थ रीतीनें जाणणारे आहांत. आपल्या भाष्याला इंद्रादिक देव सुद्धां मान देतील. सर्व सभेमध्यें आपला विजय होईल. भाष्य केल्यानंतर भेदाभेदवादी **भास्कर**; शाक्तमती **अभिनवगुप्त**; भेदवादी **नीलकंठ**; शैववादी **गुरुप्रभाकर**; आणि गुरुमतानुयायी **मंडण**; इत्यादि जे भिन्न भिन्न मताला अनुसरणारे पंडित आहेत, त्यांस जिंकून सर्व पृथ्वीवर अद्वैत मत स्थापन करावें. आणि वेदस्थापित धर्माच्या संरक्षणार्थ ठिकठिकाणीं शिष्य स्थापन करावेत. ह्याप्रमाणें आपलें अवतारकृत्य झाल्यानंतर मजकडे यावें."

२६ **ग्रंथारंभ**—इतकें सांगून शंकर अंतर्धान पावले. आचार्यही विस्मित अंतःकरणानें शिष्यांसह गंगेवर गेले, व आह्निक संपल्यानंतर 'सूत्रभाष्य' करण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें ग्रंथरचनेस सुरवातही केली. नंतर आचार्य शिष्यांसह फिरत फिरत व अनेक तीर्थांचें सेवन करीत करीत हिमालयपर्वतावरील बदरिकाश्रमीं गेले. तेथें कांहीं दिवस वास्तव्य करून प्रथम गंभीर, भव्य व मधुर अशा *****ब्रह्मसूत्रावरील** भाष्य समाप्त केलें. नंतर ब्रह्मविद्याप्रतिपादक जीं **ईश, केन, कठ, प्रश्न, मुंड, मांडुक्य, तैत्तिरीय, ऐतरेय, छांदोग्य, बृहदारण्य,** ह्या दशोपनिषदांवर भाष्यें केलीं.

* ज्यांत ब्रह्माचें प्रतिपादन आहे, अशीं व्यासांनीं केलेलीं सूत्रें, ह्यांनाच 'उत्तरमीमांसा' असें ह्मणतात.

नंतर महाभारतांतील सकल वेदार्थसारभूत जी श्रीमद्भगवद्गीता, तिच्यावर भाष्य करून पुढें भारतांतील सनत्सुजातीय यावर व्याख्या करून **'नृसिंहतापिनी'** ह्याचीही व्याख्या केली. आणि विरक्ति उत्पन्न झालेले यति अविवेकपाशांतून मुक्त व्हावेत ह्या हेतूनें **'उपदेशसाहस्री'** आदि करून वेदांत प्रतिपादक अनेक ग्रंथ केले. अशा प्रकारें शंकराचार्यरूपी सन्मताचा उदय होतांच कुतर्कवादरूपी अंधकार नाहींसा होऊन जिकडे तिकडे ज्ञानप्रकाशाची प्रभात फांकली.

**२७ सनंदनांचें नांव पद्मपाद पडण्याचें कारण**—तदनंतर आचार्यांनीं आपण केलेले ग्रंथ आपल्या शिष्यांसही पढविले. त्यांतही सर्व शिष्यवर्गांत अग्रगण्य असे जे **सनंदन** त्यांस विशेषेंकरून पढविलें होतें. कारण, त्यांची गुरूच्या ठिकाणीं परिपूर्ण भक्ति असून वैराग्याची कडकडीत जागृति होती. हें जाणून आचार्यांनीं एक वेळ त्यांची भक्ति कशी व कितपत आहे, हें आपणही पहावें, व इतर शिष्यांनाही दाखवावें ह्मणून आचार्य स्वतः गंगेच्या पलीकडे जाऊन सनंदनासही तिकडे येण्याविषयीं आज्ञा केली. ही गुरूंची आज्ञा ऐकून सनंदनांनीं मनांत विचार केला कीं, संसारसागरांतून तारण्याविषयीं जर श्रीगुरु समर्थ आहेत, तर मग ह्या अल्प जलाशयांतून ते तारणार नाहींत कीं काय ? अवश्य तारतील, यांत तिळमात्र संशय नाहीं. असा मनाचा दृढ निश्चय करून ते तसेच भागीरथीच्या प्रवाहावर पाय ठेवून पलीकडे जाऊं लागले ! तों असा चमत्कार झाला कीं, ते जेथें जेथें उदकावर पाय ठेवीत, तेथें तेथें त्यांस आधारभूत असें एक एक कमल उत्पन्न होई. याप्रमाणें त्या नवीन उत्पन्न झालेल्या कमलांवर पाय ठेवून पलीकडे गेले. आणि आचार्यांस वंदन करून हात जोडून पुढें उभे राहिले. तो अद्भुत चमत्कार व त्यांची गुरुनिष्ठा हीं पाहून आचार्यांस व इतर शिष्यांसही मोठें नवल वाटलें. आचार्यांनीं तर त्यांस मोठ्या आनंदानें प्रेमालिंगन दिलें. आणि त्या दिवसापासून, त्यांच्या प्रत्येक पावलाला पद्म ह्मणजे कमल उत्पन्न झालें ह्मणून आचार्यांनीं त्यांचें **'पद्मपाद'** असें अन्वर्थक नांव ठेवलें, व तेंच शेवटपर्यंत चालू होतें.

**२८ पाशुपतमताभिमान्यांचें खंडण**—अशा प्रकारें आचार्य हे शिष्यांना अत्यंत निर्दोष अशी जी ब्रह्मविद्या ती पढवित असतां, अत्यंत गर्वानें युक्त व अभिमानास पेटलेले असे पाशुपतमताभिमानी अनेक पंडित येऊन आचार्यांशीं वाद करूं लागले. ते ह्मणालेः—

"पशुपति हाच मुख्य ईश्वर होय. त्यानें मोक्षाला साधनीभूत अशीं पांच साधनें सांगितलेलीं आहेत. तीं कार्य, कारण, योग, विधि, आणि **दुःखांत**. कार्य ह्मणजे महत्तत्वादि; कारण ह्मणजे मूलभूत प्रकृति; योग ह्मणजे समाधि; विधि ह्मणजे त्रिकाल स्नानसंध्यादि; व दुःखांत ह्मणजे मोक्ष. ह्या पांच साधनांपैकीं, प्रकृति ही जगाला उपादान कारण आहे; व पशुपति जो ईश्वर तो निमित्त कारण आहे; याविषयीं प्रमाण "**स ईक्षां चक्रे सप्राणमसृजत**" इत्यादि श्रुति आहे. यावरून त्याला ईक्षापूर्वक कर्तृत्व आहे. तें ईक्षापूर्वक कर्तृत्व जसें घटाला निमित्तकारण जे कुलालादि त्यांच्या ठिकाणीं स्पष्ट आहे; तसें यांच्या ठिकाणीं आहे. आतां ब्रह्म हें जगताला उपादानकारण आहे, असें जें आपलें ह्मणणें तेंही संभवत नाहीं. कारण, अवयवयुक्त, जड, अशुद्ध ह्या लक्षणांनीं युक्त जें ब्रह्म तें उपादानकारण संभवणार नाहीं. कारण जें ज्यामध्यें उत्पन्न झालें, त्याचे धर्म त्यामध्यें असले पाहिजेत. असें असतां निरवयवादि जे ब्रह्माचे धर्म ते जगामध्यें दिसत नाहींत, ह्मणून ब्रह्म हें जगताला उपादानकारण आहे असें ह्मणतां येत नाहीं."

ह्यावर आचार्यांनीं उत्तर दिलेंः—

"हें तुमचें मत बरोबर नाहीं. कारण, ब्रह्माशिवाय इतराला निमित्तकारणत्व किंवा उपादानकारणत्व मानलें तर उपनिषदामध्यें 'ज्याच्या ज्ञानानें अश्रुत श्रुत

१ जें कारण कार्याबरोबर असतें, त्याला उपादान कारण असें ह्मणतात. जसें घट हें कार्य आहे. त्याला कारणीभूत जी मृत्तिका ही कार्याबरोबर असते. ह्मणून मृत्तिका ही घटाला उपादान कारण आहे. २ ज्या निमित्तानें कार्य उत्पन्न होतें त्याला निमित्त कारण असें ह्मणतात. जसें–कुंभाराचें चाक दांड्यानें फिरविलें असतां, घट उत्पन्न होतो, ह्मणून दांडा हा घटरूपी कार्याला निमित्त कारण झाला.

होतें; आणि अविज्ञात विज्ञात होतें, तें मी विचारतों ' अशी जी प्रतिज्ञा सांगितली आहे, तिला विरोध येऊं लागेल. कारण, निमित्त कारणाच्या ज्ञानानें कार्याचें ज्ञान होत नाहीं. ह्मणून येथें उपादान कारणच घेतलें पाहिजे. आतां उपादान कारण जें घ्यावयाचें, तें जर प्रकृति घेतली, तर '**एकमेवाद्वितीयम्**'[1] या श्रुतीनें उत्पत्तीच्या पूर्वीं ब्रह्मावांचून अन्य पदार्थच नाहीं असें जें प्रतिपादन केलें आहे, त्याला विरोध येऊं लागेल. ह्मणून प्रकृतीला उपादान कारण न मानतां '**बहुस्यांप्रजायेय**'[2] या श्रुतीनें ब्रह्मालाच मानलें पाहिजे. आतां कार्यामध्यें उपादान कारणाचा कांहीं तरी अंश असला पाहिजे असें जें आपलें मत तेंही बरोबर नाहीं. कारण, शेणापासून उत्पन्न होणारे जे विंचू आदिकरून कीटक, त्यांच्या ठिकाणीं शेणाचा अंश कांहींच दिसत नाहीं. यावरून कार्य व उपादान कारण, या दोहोंमध्यें अत्यंत सादृश्य असलेंच पाहिजे असें ह्मणवत नाहीं. आतां भेद मानणारे जे तुह्मी, त्या तुह्मांला मुक्तिही होणार नाहीं. कारण, भावां[3]पासून होणारें सर्व कार्य अनित्य आहे. ह्याकरितां ब्रह्म हेंच मुख्य मानलें पाहिजे."

ह्याप्रमाणें 'मी' 'मी' ह्मणत असलेल्या पाशुपतमतानुयायी पंडितांचें अनेक प्रकारें खंडण केलें. तव्हां गरुडाच्या पंखाचा तडाका बसला ह्मणजे सर्प जसे भडाभड विष ओकून टाकतात, त्याप्रमाणें त्या सर्व पंडितांनीं आपल्या दुराग्रहाचा परित्याग करून त्यांनीं आपण होऊनच आचार्यांच्या मतांचा स्वीकार केला.

२९ **व्यासांचा आशीर्वाद**—एकदां आचार्य गंगातटाकीं शिष्यांना भाष्याचा पाठ सांगून थोडीशी विश्रांति घेण्याकरतां स्वस्थ बसले होते, इतक्यांत एका वृद्ध ब्राह्मणाचें स्वरूप घेऊन व्यासांची स्वारी तेथें आली. आणि त्या ब्राह्मणानें आचार्यांस प्रश्न केला कीं, "तूं कोण आहेस? आणि पाठ कशाचा चालला आहे?" ह्यावर आचार्य उत्तर देणार, तों पूर्वींच शिष्यांनीं सांगितलें कीं "ज्यांनीं उपनिषदावर व व्याससूत्रांवर भाष्य केलें, आणि संपूर्ण भेदवादाचा नाश केला असे हे आमचे गुरु आहेत. यांचें नांव श्रीशंकराचार्य. आतां हें शारीरभाष्य चाललें

१ ब्रह्म एक असून तें अद्वितीय आहे. २ तें प्रजायेय ह्मणजे होऊन पुष्कळ झालें. ३ देहादिकांपासून.

आहे." तेव्हां व्यासांनीं आचार्यांना विचारलें कीं, "हे आपले शिष्य आपण भाष्यकार आहांत असे सांगतात. यावरून मला आपल्या बुद्धिमत्तेबद्दल मोठा विस्मय वाटतो. ह्याकरितां आपण जर व्याससूत्रांचा खरा अर्थ जाणत असाल, तर एखादें सूत्र ह्मणून त्याचें व्याख्यान करावें." हें त्यांचें भाषण ऐकून आचार्य बोलले कीं, "खरा सूत्रार्थ जाणणारे जे सद्गुरु त्यांस माझा नमस्कार असो. मी सूत्रार्थ जाणतों, असा मला अभिमान मुळींच नाहीं, तथापि आपण विचाराल तें यथामति मी सांगेन."

तेव्हां व्यासरूपी ब्राह्मण ह्मणालाः—"तृतीयाध्यायाचें आरंभीं जेंः—

**'तदनंतर प्रतिपत्तौ रंहति संपरिष्वक्तः प्रश्ननिरूपणाभ्यां'**

हें सूत्र आहे. त्याचा अर्थ आपण जाणत असाल तर सांगावा. तेव्हां आचार्यांनीं जो अर्थ सांगितला, त्यांतील सारांश असाः—

"मरणकालीं भूतसूक्ष्मदेहबीजांनीं युक्त असा जीव अन्य देहांत जातो. कसा? तर 'प्रश्न निरूपणाभ्यां' ह्मणजे **नांदिश्रुतींत** गौतमांनीं जैमिनीला प्रश्न केला कीं, 'जीव देहांतर कसें करतो?' तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, जीव चंद्रमंडळापासून ओषधीमध्यें येऊन धान्यद्वारा पुरुषाचे उदरांत जाऊन रेतोरूप होतो, आणि तें रेत योनीमध्यें निषिक्त झालें असतां क्रमाक्रमानें वाढतें. आणि तो रेतोरूपी जीव आपल्या कर्मानुरोधानें ज्या योनींत जातो, तो देह त्याला प्राप्त होतो."

याप्रमाणें आचार्यांनीं सूत्रार्थ सांगितल्यानंतर त्या ब्राह्मणानें अनेक शंका घेतल्या. परंतु त्या सर्वांचें आचार्यांनीं योग्य व समर्पक समाधान केलें. हें उभयतांचें संभाषण चालू असतां जवळ पद्मपादशिष्य होते, त्यांनीं आचार्यांना सुचविलें कीं 'हे गुरो! हे ब्राह्मण सामान्य नव्हेत. तर सर्व वेदांतांतील रहस्य जाणणारे व्यास ते हेच होत. आपण साक्षात् शंकर, आणि हे मूर्तिमंत व्यास, तेव्हां उभयतांच्या संवादामध्यें मीं किंकरानें तें काय बोलावें?' हें शिष्याचें वचन ऐकून आचार्यांसही खूण पटल्यासारखी झाली. आणि त्यांनीं त्या ब्राह्मणास हात जोडून प्रार्थना केली कीं, "आपण साक्षात् व्यास आहांत. हें मीं जाणलें.

याकरितां आतां मीं केलेलें अद्वैतसिद्धांतप्रतिपादक ब्रह्मसूत्रावरील भाष्य आपल्याला संमत असेल तर मूळस्वरूपामध्यें दर्शन द्यावें." हें भाषण ऐकून व्यासांनीं किंचित् हास्यमुख करून मस्तकीं जटाभार असून कृष्णाजिन परिधान केलेल, आंगकांति मेघासारखी असून ज्ञानमुद्रा धारण केलेल्या अशा प्रकारच्या स्वरूपाचें तत्काल दर्शन दिलें. तेव्हां आचार्यांचें अंतःकरण सद्गदित होऊन त्यांनीं सर्व शिष्यासह त्यांच्या चरणावर मस्तक ठेविलें. तेव्हां व्यास बोलले "हे शंकर! आपण आमच्या योग्यतेला पूर्वींच पोंचलेले आहांत. आणि आपल्या ह्या अशा अस्खलित पांडित्यानें मी फार संतुष्ट झालों. माझा पुत्र शुक ज्याप्रमाणें मला प्रिय आहे, त्याप्रमाणेंच आपणही मला प्रिय आहां. आपण माझ्या सूत्रावर भाष्य केलें असें श्रीशंकराच्या **सभांकण**नामक दूतानें मला सांगितल्यावरून तें कसें काय झालें आहे हें पहावें ह्मणून मी मुद्दाम येथें आलों." तेव्हां आचार्य बोलले "**सुमंतु, पैल, वैशंपायन** आदिकरून आपले मोठमोठाले शिष्य आहेत. तेव्हां त्यांच्यापुढें मी अल्पमति कोणीकडे? तथापि आपल्या सूत्रावर भाष्य करण्याचा माझ्या साहसास आपण मान दिलात, येणेंकरून मी कृतार्थ झालों." तेव्हां व्यास ह्मणाले "हें आपलें साहस नव्हे. कारण, व्याकरण, मीमांसा, आदिकरून आपण सर्व जाणतच आहां! शिवाय, आपण **गोविंद भगवत्पाद** यांचे शिष्य असून ब्रह्मचर्यापासूनच विरक्त होऊन संन्यास ग्रहण केलें आहे, तेव्हां आपणही कांहीं प्राकृत पुरुष नाहीं. तर आपण साक्षात् शंकर आहां हें मी जाणतों. कारण, सांख्यादिक मतानुयायांनीं विपरीत केलेला जो वेदार्थ, त्याचा उद्धार करण्याविषयीं दुसरा कोण समर्थ आहे? तर आतां आपण श्रुतीवर भाष्य करून भेदवाद्यांना जिंकावें." तेव्हां आचार्य बोलले कीं "मी उपनिषद्भाष्यें पूर्वींच केलीं आहेत, व तीं सर्व भाष्यें शिष्यांनाही पढविलीं आहेत. तेव्हां आतां माझें कृत्य कांहींच राहिलें नाहीं. ह्याकरितां आपण आतां एक मुहूर्तपर्यंत येथें स्थिर व्हावें. कारण, माझें आयुष्य आतां संपूर्ण झालें आहे. ह्यास्तव मणिकर्णिकेंत देह ठेवून मी कैलासास जातों." असें ऐकून व्यास ह्मणाले "अद्याप आपलीं कृत्यें बहुत व्हावयाचीं आहेत. याकरितां मी आपल्यास आणखी

सोळा वर्षें आयुष्य देतों. आपण केलेलें भाष्य सूर्यचंद्र आहेत तावत्कालपर्यंत जागृत राहील. शिवाय, आपण सर्वांस वादामध्यें जिंकून अद्वैतमार्ग स्थापन कराल." ह्याप्रमाणें वर देऊन आचार्यांनीं चरणांस वंदन केल्यानंतर श्रीवेदव्यास अंतर्धान पावले.

**३० भट्टपादांचें दर्शन**--नंतर कुमारिलभट्ट ज्यांस भट्टपाद असें दुसरें नांव होतें, त्यांची कीर्ति आचार्यांच्या कानावर आली, ह्मणून त्यांस भेटण्यासाठीं ते सर्व शिष्यांसहवर्तमान निघून प्रयागक्षेत्रीं आले. आणि त्रिवेणीचा स्तव करून व आन्हिक वगैरे आटोपून तमालशालिनीच्या तीरीं विश्रांति केली, व भट्टपाद कोठें आहेत ह्मणून शोध करूं लागले. तों पर्वतावरून उडी टाकून वेदप्रामाण्य सिद्ध करणारे सर्व वेदार्थांत पारंगत, धैर्यशाली, व आस्तिक्यबुद्धीनें संपन्न असे भट्टपाद हे गुरूचा द्रोह घडला; व सहस्रावधि सौगतांच्या ह्मणजे बुद्ध व जैन ह्यांचा हत्या घडल्या, इत्यादि महत्पातकांबद्दल मनाला अत्यंत उद्वेग प्राप्त होऊन त्या पातकाच्या निष्कृतीसाठीं तुसाचा ढीग रचून त्यांत बसले आहेत, व त्याला अग्नि लावून दिला आहे. त्यामध्यें ते आतां लौकरच दग्ध होऊन जातील. अशी लोकवार्ता ऐकून आचार्य मोठ्या त्वरेनें त्या स्थानीं गेले. तेव्हां भट्टपादांना अशा स्थितींत आचार्यांचें दर्शन झालें ह्मणून मोठा संतोष झाला. त्यांनीं आपल्या शिष्यांकडून आचार्यांची पादपूजा वगैरे करविली. परंतु अशा वेळीं पूजा घेणें इष्ट नव्हतें, तरी भट्टपादांच्या आग्रहास्तव आचार्यांनीं तिचा स्वीकार केला, व दिलेली भिक्षा ग्रहण करून आपण केलेलें सूत्रभाष्य त्यांनीं भट्टपादांना दाखविलें. तें पाहून भट्टपादांना फार संतोष झाला. इतकेंच नव्हे, तर ते सुप्रसन्न मुद्रेनें ह्मणाले कीं "या भाष्याच्या पहिल्या अध्यायावरच आठ हजार वार्तिकें होतील! मीं जर ही अग्निप्रवेश दीक्षा घेतली नसती, तर खरोखरच आपल्या भाष्यावर मीं वार्तिकें केलीं असतीं. पण आतां त्याचा काय उपयोग? असो, आज माझ्या अंतकाळीं तरी मला आपलें दर्शन झालें, ह्याच्या योगानें मी कृतकृत्य झालों. हें माझ्या पूर्वपुण्याईचेंच फल असें मी समजतों. माझें कर्तव्य मी करून चुकलों आहे. तें हें कीं, प्रथम मी कर्ममार्ग

स्थापन करून नैयायिक युक्तिजालाचा नाश करून टाकला. तसेंच विषयापासून होणाऱ्या सुखदुःखाचा अनुभवही घेतला. आतां जगामध्यें अधिक कालक्षेप करण्याची तादृश इच्छा राहिली नाहीं. मीं ईश्वराला न मानतां वेद प्रामाण्य मानलें, हा एक ईश्वराचा द्रोह मजकडून घडला. व ज्या सुगतांना ह्मणजे बुद्ध व जैन विद्वानांना गुरूसमान मानून ज्यांच्यापासून मी सर्व विद्या शिकलों, त्यांचाच मी द्रोह करून सुधन्व्या राजाकडून घात करविण्यास कारणभूत झालों, ह्या पातकद्वयाच्या निरसनार्थ मी हें तुषाग्नीमध्यें देहदंडण करून घेण्यास प्रवृत्त झालों आहे."

ह्याप्रमाणें भट्टपादांचें भाषण ऐकून आचार्य बोलले कीं "आपण जें केलें, तें कांहीं निंद्य असें नाहीं. समयास उचित तेंच केलें. तेव्हां आपल्या त्या पातकद्वयाचा संसर्ग लागण्याचा संभव नाहीं." यावर भट्टपाद ह्मणाले "असो. काय असेल तें असो, आपल्या दर्शनेंकरून व नामस्मरणेंकरून मी जरी जगण्याला समर्थ आहें, तरी आतां मला तशी इच्छा राहिली नाहीं. आपण साक्षात् शंकर आहां हें मी जाणतों. आपण अद्वैतमार्ग प्रकाशित करण्याच्या हेतूनें अवतीर्ण झालां आहां व मला जिंकावें ह्मणूनच आपण येथें आलां असाल, हेंही पण मी जाणून आहें. ह्यास्तव आतां आपण एक कार्य करावें, कीं ज्याची कीर्ति दिगंतीं गेलेली आहे, असा, माझा अजिंक्य शिष्य व मेहुणा **मंडणामिश्र पंडित** या नामेंकरून प्रसिद्ध आहे. तो सर्व शास्त्रांमध्यें माझ्याहूनही निष्णात आहे. त्याची स्त्री **सरस्वती** या नामेंकरून विद्वत्तेमध्यें त्याच्याहूनही प्रसिद्ध आहे. ती माझी भगिनी. तिला वादामध्यें सभाध्यक्षाचें स्थान देऊन मंडणाला जिंकून आपलासा करावा. ह्मणजे तोच पुढें आपल्या भाष्यावर वार्तिक करील. आतां आपण तर साक्षात् शंकर आहां, तेव्हां मला ह्या समयीं तारक मंत्राचा उपदेश करण्याकरितांच आलां असें मी समजतों. हे निष्कपट, करुणासागर, आपण मुहूर्त मात्र येथें बसावें, ह्मणजे मी आपलें स्वरूप पाहत पाहत हा देह सोडून परम पदाला जाईन."

ही भट्टपादांची विनंति श्रवण करून आचार्यांनीं त्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणें

तारक मंत्राचा उपदेश केला. तेव्हां अखिलबंधनें नष्ट झालेले भट्टपादाचार्यही शंकरकृपेनें शांतचित्त होत्साते त्या अग्नीमध्यें भस्मीभूत होऊन वैकुंठास गेले !

**३१ मंडणमिश्रांची भेट**—तेथून परत आल्यानंतर आचार्य मंडणपंडिताकडे जाण्यास निघाले. ते आकाशमार्गानें माहिष्मती नगरींत येऊन दाखल झाले. त्या नगरासमीप एक रमणीय बाग होता, त्या ठिकाणीं उतरून स्नानादिक आन्हिककृत्य उरकून दोन प्रहर दिवस येण्याच्या सुमारास मंडणपंडितांच्या घराचा शोध करीत चालले. तों पाणवठ्यावर मंडणपंडितांच्या घरांतील दोन दासी, पाणी नेण्याकरितां तेथें आल्या होत्या. त्यांस आचार्यांनीं प्रश्न केला कीं, "मंडणपंडितांचें घर कोठें आहे ?" पण त्या दासीही मंडणपंडितांच्याच घरांतल्या होत्या. त्यांनींही त्यांस कवितात्मक उत्तर दिलें. तें असें:—

**स्वतः प्रमाणं परतः प्रमाणं कीरांगना यत्र गिरं गिरंति ।**
**द्वारस्थनीडांतरसंनिरुद्धा जानीहि तन्मंडणपंडितौकः ॥ १ ॥**
**फलप्रदं कर्मफलप्रदोजः कीरांगना यत्र गिरं गिरंति ।**
**द्वारस्थनीडांतरसंनिरुद्धा जानीहि तन्मंडणपंडितौकः ॥ २ ॥**
**जगद्ध्रुवं स्यात् जगदध्रुवं स्यात्कीरांगना यत्र गिरं गिरंति ।**
**द्वारस्थनीडांतरसंनिरुद्धा जानीहि तन्मंडणपंडितौकः ॥ ३ ॥**

"वेदवाक्य हें स्वतःप्रमाण आहे, किंवा परतःप्रमाण आहे ? सुखदुःखांचें फल कर्म देतें, का सर्वशक्तिमान् परमेश्वर देतो ? जग हें सत्य आहे कीं मिथ्या आहे ? हा वाद ज्याच्या दारामध्यें मैना करित आहेत, तेंच **मंडणपंडितांचें** घर होय." इतकीं उत्तरें देण्याची ज्याच्या दासींची योग्यता, त्या पंडिताची स्वतःची योग्यता केवढी असेल ? ह्याचा विचार मनांत येऊन साश्चर्य होत्साते **आचार्य मंडणपंडितांच्या** घरीं गेले. तों पंडितांच्या घरांत त्या दिवशीं श्राद्धतिथी असल्यामुळें **व्यासस्वरूपी** व जैमिनीस्वरूपी ब्राह्मणांस क्षण देण्यासाठीं पात्रावर बसवून पंडित स्वतः श्राद्धसंकल्पाच्या तयारींत होते व घराचें पुढील द्वार बंद होतें. हें पाहून आचार्यांनीं शिष्यांस बाहेरच ठेवून आपण योगबलानें आकाशमार्गें चढून आंत गेले आणि त्या निमंत्रित ब्राह्मणांच्या

शेजारीं जाऊन बसले. मंडणमिश्र आधींच कर्ममार्गी; त्यांत श्राद्धास बसलेला; आचार्य बोलूनचालून संन्यासी, सर्वसंगपरित्याग केलेले; आणि अकस्मात् भलत्याच मार्गानें आलेले; आणि धीटपणानें येऊन निमंत्रित ब्राह्मणांशेजारीं बसले; मग काय विचारावें? मंडणपंडितांना अर्थातच त्यांचा राग आला. आणि त्यांनीं तिरस्कारबुद्धीनें त्यांच्याशीं बोलण्यास प्रारंभ केला. **आचार्यांनीं**ही त्यांच्या प्रत्येक वाक्यांतील श्लेष काढून विनोदात्मक उत्तरानें त्यांचें खंडन केलें. ह्या उभयतांचा संवाद फारच रमणीय आहे. तो असाः--

**मंडणपंडितांनीं** रागारागानें **आचार्यां**ना प्रश्न केलाः--

१. **कुतो मुंडी**?–हे संन्याशा! तूं कोठून आलास?–पक्षीं–तूं कोठपासून मुंडण केलेंस?–ह्या अर्थावर लक्ष ठेवून आचार्यांचें उत्तरः—

२. **आगलात्**—गळ्यापासून वर.

ह्या द्व्यर्थी उत्तरानें **मंडणपंडित** अधिकच चिडले, आणि पुन्हां त्यांनीं सुधरून जोरानें प्रश्न केला.

३ **मया ते पृच्छयते पंथाः**—मी तुझा मार्ग विचारतों. ( मुंडण कोठपासून केलेंस तें विचारित नाहीं. ) पक्षीं–मी तुझ्या मार्गाला विचारतों, ह्या अर्थावर लक्ष्य ठेवून **आचार्यांनीं** उत्तर दिलें:—

४. **किमाह पंथा**?—मग मार्गानें काय उत्तर दिलें?

पंडित संतापून उत्तर देतातः—

५. **त्वन्माता मुंडेत्याह**—तुझी आई विधवा आहे ह्मणाला. आचार्य ह्मणाले:—

६. **समीचीनं**—( तें त्यानें ) बरोबर सांगितलें.

ह्याप्रमाणें प्रत्येक शब्दांत आपणांस चकविलें असें पाहून पंडितांनीं त्रासून विचारलें:—

७. **अहो पीता किमु सुरा**?—तूं काय दारू पिऊन आला आहेस काय? पक्षीं–दारू पिंवळी असते काय? ह्या अर्थाला अनुलक्षून **आचार्यांनीं** उत्तर दिलें:—

८. **नैव नैव श्वेता**—छे! छे! ती पांढरी असते. हें ऐकून पंडित विचारतातः—

९. **किं त्वं जानासि तद्वर्णं** ?— तर मग तिचा रंग तुला माहित आहे वाटतें ?

१०. **आचार्य—अहं वर्णं भवान् रसं**—मला रंग माहित आहे, आणि तुला रुचि माहित आहे.

११. **मंडण०—कंथां वहसि दुर्बुद्धे गर्दभेनापि दुर्वहां।**
**शिखायज्ञोपवीताभ्यां कस्ते भारो भविष्यति ॥ १ ॥**

"हे दुर्बुद्धे ! गर्दभालासुद्धां जड होईल येवढी कंथा तूं आपल्या खांद्यावर वागवितोस, आणि शिखायज्ञोपवीताचेंच तुला ओझें झालें काय ?"

१२. **आचार्य—कंथां वहामि दुर्बुद्धे तव पित्रापि दुर्भराम्।**
**शिखायज्ञोपवीताभ्यां श्रुतेर्भारो भविष्यति ॥ २ ॥**

"हे मूढमते ! [ स्त्रियांनीं वारंवार तिरस्कृत केला तरीही त्यांच्या ठिकाणीं आसक्त होणारा अतएव गर्दभ असा जो तुझा बाप त्या ] तुझ्या बापालाही उचलली नाहीं, ती कंथा मी उचलतों आहें. शिखेचा व यज्ञोपवीताचा वेदांना सुद्धां भार होईल."

१३. **मंडण—त्यक्त्वा पाणिगृहीतीं स्वामशक्त्या परिरक्षणे।**
**शिष्यपुस्तकभारेच्छोर्व्याख्याता ब्रह्मनिष्ठता ॥ ३ ॥**

"धर्मपत्नीचें पालग्रहण करण्याचें सामर्थ्य नाहीं, ह्यास्तव शिष्यांचा आणि पुस्तकांचा भारा जमवून ब्रह्मनिष्ठेची प्रौढी मिरवतोस, दुसरें काय ?"

१४. **आचार्य—गुरुशुश्रूषणालस्यात्समावर्त्य गुरोः कुलात्।**
**स्त्रियाः शुश्रूषमाणस्य व्याख्याता कर्मनिष्ठता ॥ ४ ॥**

"गुरुकुलाला पराङ्मुख होऊन व गुरुसेवेविषयीं आळस करून स्त्रीची शुश्रूषा करित बसला आहेस, ह्यावरून तुझी कर्मनिष्ठा कशी आहे तीही सहजच कळून येते."

**१५. मंडण०—स्थितोसि योषितां गर्भे ताभिरेव विवर्धितः ।**
**अहो कृतघ्नता मूर्ख कथं ता एव निंदसि ॥ ५ ॥**

" ज्यांनीं तुझें पालनपोषण करून तुला वाढविलें, व ज्यांच्या गर्भामध्यें तूं होतास त्याच स्त्रियांची तूं निंदा करतोस काय ?"

**१६. आचार्य—यासां स्तन्यं त्वया पीतं यासां जातोसि योषितः**
**तासु मूर्खतम स्त्रीषु पशुवद्रमसे कथं ? ॥ ६ ॥**

" हे मूर्खशिरोमणे ! ज्यांचें तूं स्तनपान केलेंस, ज्यांच्या ठिकाणीं तूं जन्म घेतलास, त्या स्त्रियांचे ठिकाणीं तूं तरी पशूसारखा रमतोस कसा ?"

**१७. मंडण०–" वीरहत्यामवाप्नोसि वन्हीनुद्वास्य यत्नतः "**

" अग्नित्रयाचे ( गार्हपत्य, दक्षिणाग्नि व आहवनीय ) नाशानें वीरहत्येला ( इंद्रहत्येला ) मात्र पात्र झालास."

**१८. आचार्य—" आत्महत्यामवाप्तस्त्वमविदित्वा परं पदं."**

" परमपदाला न जाणल्यामुळें तूं तर आत्महत्येला पात्र झाला आहेस."

**१९. मंडण०—" दौवारिकां वंचयित्वा कथं स्तेनवदागतः."**

" द्वारपालानां फसवून तूं चोराप्रमाणें आंत कसा आलास ?"

**२०. आचार्य–" भिक्षुभ्योन्नमदत्वा त्वं स्तेनवद्भोक्ष्यसे कथम् ."**

" भिक्षूंचा भाग भिक्षूंना न देतां तूं चोराप्रमाणें कसा भक्षण करितोस ?"

आचार्यांच्या प्रत्युत्तरांनीं कुंठित होऊन पंडित बोलावयास असमर्थ झाले, तेव्हां त्यांनीं अन्यरीतीनें बोलण्यास प्रारंभ केला.

**२१. मंडण०–" कर्मकाले न संभाष्य अहं मूर्खेण संप्रति."**

" तूर्त मी कर्मामध्यें गुंतलों असल्यामुळें मूर्खाबरोबर बोलत बसणें बरोबर नाहीं."

**२२. आचार्य–" अहो प्रकटितं ज्ञानं यतिभंगेन भाषिणा."**

" यतीपासून भाषणांत पराजय पावणारा जो तूं, त्या तुझें ज्ञान कितपत आहे तें समजलेंच ! "

**२३. मंडण०–" यतिभंगे प्रवृत्तस्य यतिभंगो न दोषभाक् ॥"**

"यतीच्या पराभवालाच जो उद्युक्त झाला, त्याला यतीच्या पराभवाचा दोष नाहीं."

**२४. आचार्य–" यतिभंगे प्रवृत्तस्य पंचम्यंतं समस्यताम्."**

"यतिभंग हा समास षष्ठीतत्पुरुष न करतां पंचमीतत्पुरुष करावा ह्मणजे यतीपासून भंग झाला असतां मला दोष नाहीं असा अर्थ होतो."

आपलें कांहींच चालत नाहीं असें पाहून अखेर पंडित ह्मणतातः—

**२५. मंडण०–" क्व ब्रह्म क्व च दुर्मेधाः क्व संन्यासः क्व वा कलिः।**
**स्वाद्वन्नभक्ष्यकामेन वेषोऽयं योगिनां धृतः ॥ ७ ॥"**

"तें ब्रह्म कोणीकडे ! तुझी दुर्बुद्धि कोणीकडे ? हा संन्यास कोणीकडे आणि हें कलियुग कोणीकडे ? कशास कांहीं मेळ नाहीं. तर तूं फक्त यथेच्छ गोड गोड खावयास मिळावें ह्मणून योग्याचें सोंग आणलें आहेस झालें. दुसरें काय ?"

**२६. आचार्य–" क्व स्वर्गः क्व दुराचारः क्वाग्निहोत्रं क्व वा कलिः।**
**मन्ये मैथुनकामेन वेषोयं कर्मिणां धृतः ॥ ८ ॥"**

"तो स्वर्ग कोणीकडे ! तुझा दुराचार कोणीकडे ! अग्निहोत्र कोणीकडे आणि हें कलियुग कोणीकडे ! तर स्त्रीच्या उपभोगाकरितांच तूंही गृहस्थाश्रमाचें केवळ सोंग आणलें आहेस !"

**३२ मंडणमिश्राशीं वाद**—ह्याप्रमाणें उभयतांचा दुरुक्तीनें संवाद चालला असतां, व्यासरूपी ब्राह्मण मंडणपंडितांना ह्मणाले कीं "हे **मंडण** ज्यानें साक्षात् आत्मतत्त्व जाणलें आहे; पूर्णपणें त्याचा विचार केला आहे; आणि पुत्र, दारा, आदिकरून लोकेषणा ज्याची नष्ट झाली आहे, अशा यतीला तुझ्या सारख्या योग्य व आचारसंपन्न पुरुषानें असें बोलणें योग्य नाहीं. करितां असें दुर्भाषण करूं नये. तर हा यतिरूपानें साक्षात् विष्णूच आला आहे असें समजून त्याची निमंत्रणपूर्वक पूजा वगैरे करून त्याच्या यतिधर्माला उचित अशी भिक्षा द्यावी. ह्याप्रमाणें पंडितांना सांगितलें तेव्हां मंडणपंडित शांत झाले. आणि त्यांनीं आचार्यांची यथाशास्त्र पूजा करून भिक्षेकरितां आचार्यांना आमंत्रण दिलें. तेव्हां

आचार्य त्यांस ह्मणाले "हे मंडणपंडित! मला ह्या अन्नभिक्षेची विशेष आवश्यकता नाहीं. मी आलों आहें तो वादभिक्षेसाठीं आलों आहें. ह्याकरितां मला वादाची भिक्षा द्यावी, व त्यांत दोघांपैकीं जो कोणी जिंकला जाईल त्यानें दुसऱ्याचें शिष्यत्व करावें." ह्यावर मंडणपंडित ह्मणाले "फार उत्तम. वादभिक्षा तर मी मोठ्या आनंदानें देण्यास तयार आहें. मलाही कोणीतरी असा वादी भेटावयास पाहिजेच होता. आपण आलांत फार उत्तम झालें. भोजनोत्तर आपण खुशाल वाद करूं." ह्याप्रमाणें पंडितांचें अभिवचन मिळाल्यानंतर सर्वांचीं भोजनें उरकलीं.

नंतर ब्राह्मणस्वरूपी व्यास, जैमिनी, आचार्य व मंडणपंडित एकत्र बोलत बसले असतां पुन्हा वादाचा विषय निघाला. तेव्हां मंडणपंडित ह्मणाले "सहस्र मुखें ज्याला आहेत, असा शेष जरी प्रत्यक्ष माझ्याबरोबर वाद करावयास आला, तरी सुद्धां तो हात टेंकील. मग दुसऱ्या तिसऱ्याची कथा काय? मलाही फार इच्छा होती कीं, असा कोणीतरी वादी भेटावा. ती इच्छा आतां मात्र सफल होईलसें दिसतें. आतां मी कसा आहें तें सांगतों ऐका. मी ईश्वराला न मानणारा असून पूर्वमीमांसक आहें. मला निरीश्वरवादी असें ह्मणतात. आपण माझें भाषण ऐकलें नाहीं, तोंपर्यंतच वादाविषयीं याचना करतां आहां, परंतु मग आपोआपच तो वाद आपण सोडून द्याल." अशा प्रकारें पंडितांनीं पुष्कळ प्रकारें आत्मप्रौढी सांगितली असतां आचार्य त्याच्यावर कांहींच बोलले नाहींत. त्यांनीं 'चक्षुर्वै सत्यं'—आतां काय तें प्रत्यक्षच दृष्टीस पडेल—येवढेंच सांगितलें. नंतर पंडितांनीं आपण उद्यांपासून वाद सुरू करूं असें ह्मणून जैमिनी आणि व्यास ह्यांस वादांतील साक्षी होण्याविषयीं प्रार्थना केली. परंतु त्यांनीं सांगितलें कीं "मंडणपंडितांची स्त्री सरस्वती ही साक्षात् सरस्वतीचा अवतार असून ती सर्वशास्त्रपारंगत आहे. करितां तिलाच साक्षीदार करावें किंवा सभेचें आधिपत्य द्यावें." तोच बेत सर्वानुमतें कायम झाला. नंतर मंडणपंडितांनीं व्यास, जैमिनी व आचार्य ह्या त्रिवर्गाची उत्तम प्रकारें पूजा केली. तेव्हां ते त्रिवर्गही एक मुहूर्तपर्यंत कांहीं विचार करित बसले होते. थोड्या वेळानें व्यास व जैमिनी स्वस्थानाप्रत निघून गेले. आचार्यही

नर्मदा तटाकीं कदंबादिक वृक्षांनीं रम्य अशा एका आरामामध्यें एक शिवालय होतें, तेथें जाऊन राहिले.

इकडे मंडणपंडितांनीं आपल्या वाड्यामध्यें दुसऱ्या दिवशीं सभेचा मोठा थाट केला. गांवांतील व आसपास राहणाऱ्या सर्व विद्वान् व सभ्य लोकांस निमंत्रणें केलीं. मोठ्या दिवाणखान्यामध्यें सभास्थान निश्चित करून तेथें बिछाइती वगैरे घालून सर्व जागा सुशोभित केली. मध्यभागीं एक मोठें उच्चासन मांडून दोहों बाजूस तशींच दोन उच्चासनें तयार करून ठेवलीं. सकाळींच नेमलेल्या वेळेला विद्वान् लोकांची व प्रेक्षक समुदायाची गर्दीच गर्दी जमा होऊं लागली. कारण, असा वाद ऐकावयास मिळणें परम दुर्मिळ होतें. मंडणमिश्रांची कीर्ति पहिल्यापासूनच लोकांस विदित होती. आणि नवीन आलेले आचार्यही दिग्विजय करित आलेले त्यांच्या कानावर आलेले होतें. तेव्हां हा वादही केवळ अश्रुतपूर्वच होईल, ह्मणून तमाम लोक मोठ्या उत्कंठेनें तेथें जमा झाले होते. आचार्यांनीं प्रातःकालींच नर्मदेचें स्नान करून आपला आन्हिकविधि वगैरे आटोपल्यानंतर ब्रह्म जाणणारांमध्यें श्रेष्ठ असे जे श्रीशंकराचार्य, ते आपल्या शिष्यांसह मंडणपंडितांच्या घरीं येऊन सभामंडपांत शिरले. व सर्वांनीं उत्थापन दिल्यानंतर सूचनेप्रमाणें दोहों बाजूंस केलेल्या उच्च सिंहासनापैकीं एका आसनावर स्थित झाले, आणि मोठ्या उत्सुकतेनें मंडणपंडितांची मार्गप्रतीक्षा करित बसले. इतक्यांत सर्व शास्त्रांत पारंगत अशी जी मंडणपंडितांची भार्या, सरस्वती, तिच्यासहवर्तमान पंडितही सभेमध्यें येऊन दाखल झाले. तेव्हां सर्वांनीं आदरपूर्वक उत्थापन दिल्यानंतर सर्वानुमतें त्यांनीं आपल्या भार्येस सभाध्यक्षाच्या स्थानीं जाऊन बसण्याची आज्ञा दिली. तेव्हां सरस्वतीही मध्यभागीं मांडलेल्या सिंहासनावर बसली, व मंडणपंडित आचार्यांच्या सन्मुख ठेवलेल्या आसनावर जाऊन बसले. नंतर उभयतांनीं वादाच्या संबंधानें प्रतिज्ञा केल्या. त्या अशाः—

आचार्य बोलले "ब्रह्म हेंच सत्य आहे. हें मी सिद्ध करून देतों. ह्यांत जर माझा पराजय होईल तर मी काषाय वस्त्राचा व संन्यासाचा परित्याग करून श्वेतवस्त्र परिधान करून गृहस्थाश्रम पतकरीन. ह्या वादामध्यें कोणाचा जय

झाला किंवा कोणाचा पराजय झाला, ह्याचा निर्णय पंडितांची भार्या सरस्वती हिनें करावा. तो आह्मां उभयतांसही मान्य आहे." ह्याप्रमाणें आचार्यांची प्रतिज्ञा झाल्यानंतर मंडणपंडितांनीं आपली प्रतिज्ञा सांगितली कीं "वेदाचा पूर्वभाग ह्मणजे कर्मकांड हाच प्रमाण असून तोच सर्वांना कारण आहे हें मी सिद्ध करून देतों. ह्यांत जर माझा पराजय होईल, तर आचार्यांच्या उलट मी शुभ्रवस्त्राचा व गृहस्थाश्रमाचा परित्याग करून काषायवस्त्र व संन्यास यांचा स्वीकार करीन. ह्याचा निर्णय करणें तो माझी पत्नी सरस्वती हिनें करावा. तो मलाही मान्य आहे." असें ह्मणून त्यांनीं आपल्या पत्नीकडे पाहिलें, तेव्हां तिनेंही ती गोष्ट सर्वानुमतें मान्य केली. ह्याप्रमाणें वादाची सर्व सिद्धता होतांच सरस्वतीनें उठून उभयतांच्याही गळ्यांत एक पुष्पमाला घातली. आणि ह्मणाली कीं "ज्याची माळा आधीं कोमेजून जाईल, त्याचा पराजय झाला असें मी समजेन." इतकें सांगून व वादास सुरवात करावी अशी प्रार्थना करून ती अंतर्गृहांत गेली. नंतर उभयतांचा वाद सुरू झाला. त्या वेळीं ब्रह्मदेव आदि करून सुरगण विमानांत बसून तो चमत्कार पाहण्यासाठीं अंतरिक्षांत येऊन राहिले.

अशा प्रकारें वाद चालू असतां माध्यान्हकाल झाला ह्मणजे सरस्वती येऊन आपल्या पतीला भोजनाला व आचार्यांना भिक्षेला चलावें अशी प्रार्थना करित असे. नंतर उभयतांही भोजनास उठत, व भोजनोत्तर पुन्हा वाद सुरू करित. असा क्रम चालला असतां आचार्यांनीं मंडणपंडितांचें बहुतेक प्रकारें खंडण केल्यानंतर ते आचार्यांना ह्मणाले कीं "जीवेश्वराचें ऐक्य आहे, असें जें आपलें मत, त्याविषयीं मला कोठें प्रमाण दिसत नाहीं. आपण जीं उपनिषद्वाक्यें प्रमाण ह्मणून मानतां, त्यांना पुरुषार्थत्व नाहीं. ह्मणून त्यांना प्रमाण मानतां येत नाहीं. ह्याकरितां आपला सिद्धांतही मला मान्य नाहीं." तेव्हां आचार्यांनीं अनेक प्रकारें श्रुतिप्रमाणांनीं ब्रह्म सिद्ध करून अद्वैतमत स्थापन केलें; व तें सरस्वतीलाही मान्य झालें. इतक्यांत मंडण पंडितांच्या गळ्यांतील पुष्पमालाही सुकली! हा चमत्कार पाहून सरस्वतीनें आचार्यांचें मत स्थापित झालें, व त्यांचा विजय झाला असा निर्णय सांगितला. आणि उभयतांही भिक्षेस चलावें ह्मणून प्रार्थना केली. तेव्हां उभयतांनींही जाऊन भोजन केलें.

**३३ सरस्वतीचें बंधन**—आपल्या पतीचा पराभव झाला;व तो आतां आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें संन्यास ग्रहण करणार हें जाणून सरस्वती आचार्यास बोलली- " पूर्व जन्मीं मला दुर्वास ऋषींनीं शाप दिला होता कीं, तूं मृत्यु लोकावर जन्म घेशील व श्रीशंकराचार्यांचा अवतार होऊन तुझ्या भ्रताराचा पराजय झाला म्हणजे मग तूं मुक्त होऊन परत स्वर्गास येशील. ती अवधी आज संपली. ह्याकरितां मी आतां निजधामास गमन करतें. " असें म्हणून ती निघाली. परंतु आचार्यांना ती जाते हें इष्ट वाटलें नाहीं म्हणून त्यांनीं मंत्रसामर्थ्यानें तिला बंधन करून ठेवलें. ह्याचें कारण, तिच्याशींही आपला वाद व्हावा हें एक; आणि दुसरें, ती प्रत्यक्ष सरस्वतीचा अवतार असल्या कारणानें तिला जें मत मान्य, तें इतर जनांना सहजच मान्य होईल. आणि तेणेंकरून अद्वैतमताची सिद्धि उत्तम प्रकारें तडीस जाईल. हा विचार मनांत आणून मंत्रसामर्थ्यानें तिचें बंधन करून लौकिकरीत्या तिची प्रार्थना केली कीं, मी जेथपर्यंत आपणास ह्या लोकीं रहा म्हणेन तेथपर्यंत आपण राहिलें पाहिजे. हें आचार्यांचें म्हणणें सरस्वतीनेंही मान्य केलें.

**३४ जैमिनींचा मंडणपंडितास बोध**—नंतर मंडणपंडितांनीं आचार्यांना जैमिनी सूत्राचा जो कर्मपर आशय आहे, त्याविषयीं प्रश्न केला. त्याचें आचार्यांनीं यथायोग्य समाधान केलें, तरीही पंडितांचा त्याबद्दल निश्चय होईना. म्हणून त्यांनीं जैमिनीचेंच ध्यान केलें. तेव्हां जैमिनी प्रत्यक्ष प्रगट होऊन त्यांनीं सांगितलें कीं, " शंकराचार्यांनीं माझ्या सूत्राचा जो अर्थ केला आहे, तोच खरा आहे. कारण, माझ्या गुरूनीं केलेलीं जीं ब्रह्मसूत्रें, त्यांच्यावर सुद्धां आचार्यांनीं यथार्थ व्याख्यान केलें आहे. तेव्हां त्यांना माझा आशय दुर्बोध कसा होईल ? शिवाय, ज्या गुरूपासून मला ज्ञानप्राप्ती झाली, त्याच्या सिद्धांताला माझा सिद्धांत कधींच विरुद्ध होणार नाहीं. ह्याकरितां आचार्यांनीं अर्थ केला तोच बरोबर आहे. ह्यास्तव तुह्मी त्या अर्थाचा नीट विचार करून तोच ग्रहण करावा. आतां तुला एक अत्यंत गुह्य गोष्ट सांगतों ती ऐक. ह्या संसारसागरांत निमग्न होऊन जे लोक गटकळ्या खात आहेत, त्यांचा उद्धार करण्याकरितां साक्षात् शिवांनीं शंकराचार्य ह्या नामेंकरून अवतार धारण केला आहे. चार युगांमध्यें चार

ब्रह्मनिष्ठ ज्ञानदाते होतील असें शिवपुराणांत स्पष्ट सांगितलेंच आहे. त्यांतील पहिला, कृतयुगांतील कपिल महामुनि; त्रेतायुगांतील दत्त; द्वापारांत श्रीवेदव्यास आणि कलियुगांत श्रीमच्छंकराचार्य या नामें शंकर. ह्याकरितां तूं त्यांना शरण जाऊन संसारसमुद्रांतून तरण्याविषयीं यत्न कर. " ह्याप्रमाणें जैमिनींनीं मंडण पंडितांना बोध करून ते अंतर्धान पावले.

**३५ मंडणपंडित शरण आले**—नंतर मंडणपंडित श्रीगुरुशंकराचार्यांना वंदन करून बोलले कीं " स्वामिन् ! आपण कोण आहां हें मी आतां प्रत्यक्ष जाणतों. साक्षात् शंकराचा अवतार ते आपण. जगताचा उद्धार करावा, येवढ्याच उद्देशानें आपण ह्या भूलोकीं अवतार धारण केलेला आहे. तें आपलें स्वरूप आजपर्यंत न जाणल्याकारणानें मी आपल्यास ज्या कांहीं दुरुक्ति बोललों त्यांची क्षमा करण्याविषयीं आपण समर्थ आहां. श्रुतीच्या अर्थाविषयींच पाहिलें तरी सुद्धां कपिल, गौतम, कणाद आदिकरून मोठमोठे समर्थ असतां त्यांनाही भ्रम उत्पन्न झाला. तो श्रुत्यर्थ आपण यथार्थ रीतीनें केला आहे. तेव्हां आपण साक्षात् शंकर आहां ह्यांत तिळमात्र संशय नाहीं. नाहींतर श्रुतीचा अर्थ करण्याविषयीं कोणीच समर्थ झाला नसता. आतां आपल्या दर्शनानेंच माझा सर्व संदेह गेला आहे. हा लाभ माझ्या पूर्व सुकृतानेंच मला मिळाला असें मी समजतों. आतां मी सर्वस्वाचा परित्याग करून आपल्याला शरण आहें. तरी ह्या दासाला जी काय आज्ञा करणें असेल ती करावी.

**३६ सरस्वतीची पूर्वकथा**—मंडणपंडितांचें हें भाषण श्रवण करून व त्यांच्यावर प्रसाद करावा असें मनांत आणून आचार्यांनीं त्यांची पत्नी जी सरस्वती तिच्याकडे पाहिलें. तो आचार्यांचा अभिप्राय जाणून तिनें भाषण करण्यास सुरवात केली. ती ह्मणाली " हे यतिश्रेष्ठ ! मी आपला हेतु समजलें. आतां माझें ह्या जन्माचें भविष्य मी एका तपस्व्याच्या मुखांतून ऐकलेलें होतें तें मी आपणांस निवेदन करतें. तें आपण या सर्व सभ्यजनांसहवर्तमान श्रवण करावें. मी लहान असतांना एके दिवशीं आपल्या मातेची सेवा करित असतां तेथें अकस्मात् एक तपस्वी आला. त्याच्या मस्तकावर जटाभार असून सर्वांगास शुभ्र

भस्म लावलेलें होतें. त्याचें शरीर भव्य व कांति तेजःपुंज असल्यामुळें हा दुसरा सूर्यच आहे कीं काय असा भास होत असे. त्यास आलेला पाहतांच माझ्या आईनें त्याची अर्ध्यपाद्यादिकेंकरून पूजा करून त्याच्या पुढें हात जोडून उभी राहिली. तेव्हां त्या तपस्व्यानें "तुझी काय इच्छा आहे?" असा प्रश्न केला असतां, तिचा मजवर अत्यंत लोभ असल्यामुळें, तिनें त्यांची अशी प्रार्थना केली कीं, "हे भगवन्! माझ्या मुलीचें भवितव्य आपण आपल्या तपोबलानें जाणतच असाल. ह्याकरितां तेवढें मला कृपा करून सांगावें. ह्या माझ्या कन्येला आयुष्य किती आहे? हिला नवरा कसा काय मिळेल? ही धनधान्यांनीं युक्त अशीं यज्ञादिकृत्यें करील किंवा कसें? हें सर्व मला सांगावें." ह्याप्रमाणें आईचा प्रश्न ऐकल्यानंतर त्या तपस्व्यानें कांहीं थोडा वेळ नेत्र मिटले आणि विचार केलासा दाखविलें. आणि जरी अत्यंत गूढ व न सांगण्यासारखें होतें तरी सुद्धां तें त्यानें तिला सांगितलें. तो ह्मणाला "ह्या पृथ्वीवर सांप्रत वेदबाह्य मत फार प्रचलित झालेलें आहे. त्याचा मोड करून वेदमार्गाचा उद्धार करण्याकरितां ब्रह्मदेवांनीं मंडण कवींद्र ह्या नामेंकरून अवतार घेतलेला आहे. तो मंडणपंडित अत्यंत विद्वान् व बुद्धिवान् असून वाद करण्यामध्यें फार चतुर असा आहे. तुझी कन्याही सर्व विद्येनें परिपूर्ण व बुद्धिवान् असून स्वरूपसंपन्न आहे. ह्याकरितां शंकराला जशी पार्वती प्राप्त झाली; विष्णूला जशी लक्ष्मी प्राप्त झाली; त्याप्रमाणें ह्या उभयतांचा विवाह होऊन तीं उभयतां यज्ञादिकर्में करून पुत्रासह आनंदानें कालक्रमणा करतील. नंतर नष्ट झालेला जो उपनिषद्भाग त्याचें संजीवन करण्याकरितां श्रीशंकर मनुष्यरूप धारण करून दुष्ट मतांचें खंडण करीत करीत ह्या भूमीला अलंकृत करतील. नंतर ते शंकराचार्य ह्या नामेंकरून यतिवेषधारी शंकर, यांचा व तुझ्या जामाताचा फार मोठा वाद होईल, त्यांत तुझा जामात जिंकला जाऊन आचार्यांस शरण जाईल, व गृहस्थाश्रमाचा त्याग करून संन्यास दीक्षा ग्रहण करील." असें सांगून तो तापसी निघून गेला. त्यानें ह्मटल्याप्रमाणें आजपर्यंत सर्व कांहीं घडून येऊन माझ्या पतीला आपलें शिष्यत्वही प्राप्त झालें. त्या तपोनिधि मुनीचें भाषण अन्यथा कसें होईल?

**३७ सरस्वतीशीं वाद**—इतकें बोलून सरस्वतीनें पुन्हां किंचित् हास्ययुक्त मुद्रेनें आचार्यांस विनंति केली कीं, "इतकें झालें तरीसुद्धां माझ्या पतीला आपण पूर्णपणें जिंकलें असें अद्यापही होत नाहीं. कारण, '**आत्मनोऽर्द्धं पत्नी**'[1] अशी श्रुति आहे. ह्याकरितां मला जिंकून नंतर त्यांस आपण शिष्य करावें. तोंपर्यंत त्यांस आपले शिष्य करतां यावयाचें नाहीं. आतां आपण सर्व जगताला कारण असा जो शंकर त्याचे अवतार असून तें मी न जाणतां वादाला प्रवृत्त झालें अशी शंका येईल, तर तें मी सर्व जाणत आहें. आणि ह्मणूनच आपल्याशीं वाद करण्याविषयीं माझें अंतःकरण उत्कंठित झालें आहे. ह्याकरितां कांहीं वेळ माझ्याशीं वाद व्हावा."

हें सरस्वतीचें भाषण श्रवण करून आचार्य अत्यंत संतोषित होऊन बोलले कीं "तुझें अंतःकरण वादासाठीं उत्कंठित झालें आहे खरें; परंतु आमच्या सारख्यांनीं स्त्रियांबरोबर वाद करणें प्रशस्त नव्हे. तेव्हां आह्मी तुझ्याशीं वाद कसा करावा?" ह्यावर सरस्वतीनें उत्तर दिलें कीं "जो आपलें मत स्थापन करण्याकरितां प्रवृत्त झाला, त्याला तद्विरुद्ध खंडण करणारे पुरुष असोत किंवा स्त्रिया असोत; त्यांच्या बरोबर वाद करून आपला पक्ष स्थापन करणें हेंच उचित होय, व तसें करण्यास कोणत्याही रीतीचा प्रत्यवाय नाहीं. ह्याला पूर्वीचा इतिहासही प्रमाण आहे. पूर्वी याज्ञवल्क्य व गार्गी ह्यांचा असाच संवाद झाला असल्याची कथा बृहदारण्यकांत आहे. तसेंच जनक व सुलभा यांचा मोठा वाद झाल्याची कथा महाभारतांतील शांतिपर्वांतर्गत मोक्षधर्मांत सांगितलेली आहे. तेव्हां याज्ञवल्क्य व जनक हे महात्मे नव्हते काय? का आपणच एक माहात्मे आहांत?" हें सरस्वतीचें सयुक्तिक भाषण ऐकतांच आचार्यांनीं तिच्याशीं वाद करण्याचें मान्य केलें. तेव्हां पूर्वप्रमाणेंच सभा भरून वाद सुरू झाला. हा वाद सरस्वतीशीं—एका प्रसिद्ध विदुषी स्त्रियेशींच—असल्यानें तो श्रवण करण्यास पहिल्याहूनही अधिक गर्दी जमूं लागली. आचार्यांनीं सर्व शास्त्रांत तिला जिंकलें. कोठेंच कांहीं आपलें चालत नाहीं असें पाहून आतां पुढें

---

१ पत्नी हीं आत्म्याचे अर्थात् पुरुषाचें अर्धांग आहे.

आचार्यांस कसे कुंठित करावेत या विवंचनेंत सरस्वती पडली. तेव्हां तिनें एका रात्रीं असा विचार केला कीं, आचार्य हे दुसऱ्या कोणत्याही शास्त्रांत हार जाण्याचें लक्षण दिसत नाहीं. ह्याला एकच युक्ति दिसते. ती ही कीं, हे बालपणापासून संन्यास धर्मांतच असल्यानें त्यांस कामशास्त्राची माहिती असणें शक्य नाहीं. तेव्हां त्याच शास्त्रांतील त्यांस प्रश्न करावेत, ह्मणजे ते कुंठित होतील. किंवा उत्तरें दिलीं तर त्यांच्या यतिधर्माचा भंग झाला असें होईल. एवंच त्या शास्त्रांतील प्रश्न केल्याबरोबर त्यांना दुहेरी पेंच पडेल. ही युक्ति मनांत आणून दुसऱ्या दिवशीं वादास सुरवात झाली असतां, सरस्वतीनें आचार्यांस कामशास्त्रांतीलच पहिला प्रश्न घातला. तो असाः—

**कलाः कियंत्यो वद पुष्पधन्विनः**
**किमात्मिकाः किंच पदं समाश्रिताः ।**
**पूर्वे च पक्षे कथमन्यथा स्थितिः**
**कथं युवत्यां यथमेव पूरुषे ॥ १ ॥**

"कामाच्या कला किती आहेत? त्या कशा स्वरूपाच्या आहेत ? त्या कोणत्या स्थानाचा आश्रय धरून राहतात ? त्यांची पूर्वस्थिति कशी असते ? स्त्रीच्या ठिकाणीं किंवा पुरुषाच्या ठिकाणीं त्यांचा विलक्षण परिणाम काय होतो ?" अशा प्रकारचे त्या शास्त्रांतील अनेक प्रश्न केले.

ते प्रश्न ऐकून आचार्य सर्वशास्त्रांत पारंगत होते तरी, फार बुचकळ्यांत पडले. त्यांनीं विचार केला कीं ह्या कलांची संख्या आमच्या सारख्या यतींना कळणार कशी ? बरें; ती जाणण्याविषयीं प्रयत्न करावा, तर यतिधर्माचा भंग होणार. ज्ञानबलानें सांगावयासही मी समर्थ होईन. परंतु तसें केल्यानें जगामध्यें आमच्या सारख्यांनीं परमहंसव्रताचा नियम रक्षण करणें जें अवश्य कर्तव्य, त्याला कलंक लागतां कामा नये. असा विचार करून आपल्यास कामशास्त्र जणों काय अवगतच नाहीं अशा रीतीनें आचार्य कांहीं वेळ अगदीं स्तब्ध बसले. आणि मग बोलले "हे सरस्वती ! तुझ्या ह्या प्रश्नाचें उत्तर देण्याला मला एक महिन्याची अवधि पाहिजे. ह्मणजे ह्या शास्त्रांतही तुला कुंठित करीन." ती गोष्ट

सरस्वतीनें मान्य केल्यावर सभा विसर्जन झाली, व आचार्यांसह सर्व लोक आपआपल्या स्थानीं गेले.

**३८ परकायाप्रवेश**—नंतर आचार्य सरस्वतीचा निरोप घेऊन आपल्या शिष्यांसह पुन्हा देशसंचारास निघाले. ते फिरत फिरत अमरक नांवाच्या राजाच्या राजधानीमध्यें येऊन पोंचले. तों तेथील राजा वयानें अगदीं तरुण होता तो नुकताच मरण पावला असून त्याच्या मागें त्याच्या सुंदर सुंदर बायका वगैरे बहुत शोक करित आहेत, व मृतदेह अद्याप तसाच पडून आहे. अशी लोकवार्ता त्यांच्या कानावर आली. तेव्हां आचार्यांनीं पद्मपाद आदिकरून सर्व शिष्यांस विचारलें कीं "ज्याला अनेक स्त्रिया आहेत, असा एक राजा गतप्राण होऊन वाड्यांत पडला आहे, तर त्याच्या देहांत प्रवेश करून तेथें कामशास्त्राचें ज्ञान करून घ्यावें. आणि त्याच्या पुत्राला त्याच्या गादीवर बसवून पुन्हा योगबलानें परत यावें असें माझ्या मनांत आलें आहे. तरी ह्याविषयीं तुमचा अभिप्राय कसा काय आहे ?"

ह्या आचार्यांचा प्रश्न ऐकून शिष्यांनीं सांगितलें "महाराज ! आपण सर्वज्ञ आहांत. तेव्हां आपल्या सारख्यास आह्मी अल्पबुद्धींनीं सांगणें बरें नव्हे. तथापि भक्तीस्तव पूर्वींचा एक कथाभाग सांगतों. पूर्वीं मत्स्येंद्रनाथ ह्मणून एक महान् योगी होते. त्यांनीं आपला शिष्य गोरक्ष ह्यास आपल्या देहाचें संरक्षण करण्यास सांगून तेही असेच विषयसुखोपभोगांच्या सेवनाकरितां एका राजाच्या देहांत प्रवेश करून ते राज्य करूं लागले. त्यांचें राज्य अत्यंत नीतीनें चालल्यामुळें प्रजेला दुःख ह्मणून कसलें तें माहित नाहीं असें झालें. यथाकालीं यथायोग्य पर्जन्य पडून जिकडे तिकडे सुबत्ता झाली. तेणेंकरून त्याचे जे महाज्ञाते व चतुर प्रधान होते, त्यांच्या ती गोष्ट सहज लक्ष्यांत आली कीं, हा राजा एक वेळ मरण पावून पुन्हा सजीव झाला आहे; तेव्हां त्या राजदेहांत कोणी तरी दिव्य योग्यानें प्रवेश केला असावा. ह्मणूनच हें असें आह्मां प्रजेचें भाग्य उदयास आलें. तर आतां तो फिरून या देहांतून लौकर न जाईल अशी कांहीं तरी युक्ति केली पाहिजे. ह्मणून हाच देह त्याला आवडावा व याच देहांत तो रम-

माण व्हावा ह्मणून त्यांनीं त्याच्याकडे सुंदर सुंदर स्त्रिया पाठवून दिल्या आणि त्यांना सांगितलें कीं, जेणेंकरून महाराजांची मर्जी निरंतर सुप्रसन्न राहील अशी तजवीज ठेवावी. त्याप्रमाणें सर्व व्यवस्था लागल्यावर मत्स्येंद्रनाथांचा आत्मा त्या राजदेहांतच रममाण होऊन आपला पूर्वींचा योग वगैरे सर्व विसरून जाऊन केवळ विलासी पुरुष बनून राहिला! हें वर्तमान गोरक्षास कळतांच तो आपल्या गुरूचा ह्मणजे मत्स्येंद्रनाथाचा देह नीट व्यवस्थित रीतीनें ठेवून त्या नगरांत गेला. आणि गवयाचें सोंग घेऊन तेथील राजस्त्रियांना गायन व नृत्य शिकवूं लागला. ह्या मुळें त्याची त्या राजापर्यंत दाद लागून तो त्या राजाजवळ गेला. आणि एकांताची संधि साधून त्यानें त्यास आपण पूर्वीं कोण होता वगैरेची तत्त्वज्ञानाच्या मिषानें ओळख पटवून दिली, आणि त्यांना पूर्वदेहांत आणलें. तसाच प्रकार ह्याही होणार आहे. ह्याकरितां त्याचा नीट विचार करणार श्रीगुरु समर्थ आहेत. दुसरी गोष्ट, आपली योग्यता कोठें आणि तें अति निंद्य कामशास्त्र कोठें? शिवायः—

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनु वर्तते ॥ २ ॥**

असें भगवद्वाक्य आहे. त्यावरून थोर लोक जसें आचरण करतात, तसें सामान्य लोकही वागूं लागतात. ह्याकरितां त्याबद्दलही विचार व्हावा. आपण तर यतिधर्माचें कंकण बांधलें आहे, तेव्हां ह्या सर्व गोष्टी आपल्यालाही विदितच आहेत. तथापि प्रेमानें माझ्या बुद्धीप्रमाणें सूचनार्थ मी बोललों ह्याची क्षमा असावी."

तेव्हां आचार्य बोलले "तुह्मी ह्मणतां तें खरें; पण हे सर्व बंध कोणाला? जो कोणी विषयासक्त असेल त्याला. सर्वसंगपरित्याग केलेल्याला हे बंध काय होत? हें पहा! श्रीकृष्ण गोपींचा सखा होता, पण तो कांहीं बंधनांत पडला नाहीं. बंधाला संकल्प हा मुख्य हेतु असतो. ह्मणून सर्व प्रकारें '**ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या**' मानणाऱ्याला कोणत्याही कर्मानें बंधन होत नाहीं. स्वप्नांत केलेलें पुण्य किंवा पाप ज्याप्रमाणें केव्हांही फलद्रूप होत नाहीं. कारण, तें खोट्या बुद्धीपासूनच उत्पन्न झालेलें असतें. तद्वत् सर्व जगताला जो मिथ्या मानतो, तो सुकृतानें किंवा दुष्कृतानेंही लिप्त होत नाहीं. कारण, त्याचा कर्तृत्त्वाभिमानच नष्ट झालेला

असतो. तो अश्वमेधादिक सुकृतें करो, कीं ब्रह्महत्त्यादि दुष्कृतें करो, तरी तो परमार्थवेत्ता असल्यामुळें त्या सुकृतानें किंवा दुष्कृतानें तो बद्ध होत नाहीं. इंद्रानें त्वष्ट्याचा पुत्र त्रिशिर ह्याचा वध केला, परंतु तोही कर्मानें लिप्त झाला नाहीं. किंवा जनकानें अश्वमेध करून ब्राह्मणांस बहुत दक्षणा दिली. ह्मणून तोही पण कर्मानें लिप्त झाला नाहीं. ह्यावरून तत्त्ववेत्ता आहे तो कोणत्याही कर्मानें बद्ध होत नाहीं. आतां खरें ह्मटलें तर मी जरी ह्या शरिरानें कामशास्त्राचा अभ्यास केला तरी सुद्धां कांहीं हरकत नाहीं. पण शिष्ट सांप्रदायाला विरोध येईल ह्मणून अन्य शरीरांत प्रवेश करून तो अभ्यास करण्याचें मनांत आणलें आहे.”

अशा प्रकारें शिष्यमंडळीचा संशय दूर करून अति दुर्गम अशा एका पर्वताच्या शिखरावरील गुहेंत जाऊन शिष्यांस सांगितलें कीं, “मी कामशास्त्र-कलेचा अभ्यास करण्याकरितां दुसऱ्या एका राजदेहांत प्रवेश करणार आहें. तरी तुह्मी सर्वांनीं ह्या माझ्या मृतवत् पडलेल्या शरिराचें संरक्षण करावें. मी एक महिन्यानें परत येईन.” अशी शिष्यांस आज्ञा करून आचार्यांनीं समाधि लावली आणि असलेला स्थूल देह प्रेतवत् तेथें ठेवून लिंगदेहाच्या योगानें त्या अमरक राजाच्या मृत देहांत प्रवेश केला. मग त्या राजवाड्यांतील स्थिति काय विचारावी? त्या तरुण व रूपसंपन्न राजाचा देह लांकडासारखा होऊन मध्यभागीं पडला होता व सभोंवार त्याच्या दिव्य अप्सरेसारख्या विलासवती स्त्रिया त्याच्या प्रेतावर पडून दुःखानें केश तोडीत व आक्रोश करित बसल्या होत्या. दासदासींनीं कपाळें बडवून घेऊन एकच हलकल्लोळ मांडला होता. सर्व जन एकसारखे अश्रु ढाळीत व हाय हाय करित उभे राहिले होते. प्रधानमंडळ चिंतातुर मनानें चित्राप्रमाणें तटस्थ होऊन पुढील विचारांत चूर होऊन गेले होते. इतक्यांत आचार्यांनीं लिंगदेहानें त्या प्रेतामध्यें प्रवेश करतांच, तो राजा हळूच हातपाय हालवूं लागला! मेलेलें मनुष्य ह्मटलें, ह्मणजे त्याची आशा कोणाला असणार? व असून उपयोग तरी काय? तें मनुष्य परत येणार थोडेंच! तेव्हां अशा दुर्धर प्रसंगीं राजानें आंग हालविल्यावर मग काय विचारावें? त्याच्या

स्त्रियांस, प्रधानमंडळांस व इतर यच्चयावत् लोकांस इतका आनंद झाला कीं, तो गगनांत मावेना. आपण स्वप्नांत आहोंत कीं जागृतींत आहोंत, ह्याचीच क्षणभर त्यांस भ्रांति पडली ! मृताच्या मुखांत अमृत पडल्याप्रमाणेंच खरोखर गोष्ट घडून आली. डोळ्याचें पातें लवतें न लवतें, तोंच राजा अगदीं खडखडीत होऊन पूर्वीप्रमाणें उठून बसला ! त्याबरोबर सुकून गेलेलीं त्याच्या स्त्रियांचीं मुखकमलें अरुणोदयाबरोबर प्रफुल्लित होणाऱ्या कमलाप्रमाणें टवटवीत दिसूं लागलीं ! आनंदाचा एकच जयजयकार झाला. मंगल वाद्यांनीं तर तो राजवाडा अगदीं दणाणून गेला. हां हां ह्मणतां ती बातमी साऱ्या नगरांत पसरून प्रजाजनांच्या आनंदानें तें शहर दुमदुमूं लागलें ! राजपुरोहित आदि करून सर्व ब्राह्मण जमून शांतिकर्में वगैरे करून मोठ्या थाटानें तो राजा पुन्हा सिंहासनावर बसून आपला राज्यकारभार पाहूं लागला. आणि संपूर्ण परिजनांचें सांत्वन करून आपल्या प्रधानमंडळासहवर्तमान तो अमरक राजा स्वर्गींतील इंद्राप्रमाणें भूमीचें पालन करूं लागला. परंतु त्या राजाच्या पूर्वींच्या वृत्तींत व हल्लींच्या वृत्तींत लोकांना महदंतर दिसूं लागलें. तेव्हां सुज्ञ मंत्री आपआपसांत विचार करूं लागले कीं, प्रजेच्या भाग्यानें हा मृत झालेला राजा पुन्हा जिवंत झाला हें खरें; पण पूर्वींच्या व हल्लींच्या स्वभावावरून तो पूर्वींचाच राजा आहे असें वाटत नाहीं. कारण हा जसा सर्वगुणसंपन्न व पुण्याईनें प्रबळ दिसतो, तसा पूर्वीं दिसत नव्हता. हा तर ययाति राजाप्रमाणें धन देणारा आहे; इतकेंच नव्हे तर सुरुगुरूप्रमाणें अर्थज्ञ व भाषण करणारा आहे. त्याचप्रमाणें परराजाला जिंकण्याविषयीं साक्षात् अर्जुन आणि महादेवाप्रमाणें सर्वज्ञ आहे. ह्याच्या सारखा गुणवान् राजा कोणीही नसेल. खरा सत्पुरुष ह्मणून जो ह्मणतात तो हाच होय. अहो ! ह्याचा स्वभाव काय सांगावा ? हा राजा सजीव झाल्यापासून अकालींच सर्व वृक्षपुष्पांनीं व फलांनीं युक्त झाले आहेत. तशाच गाई व ह्मशी हल्लीं दूध तरी किती देतात ? पर्जन्य वेळच्या वेळीं व मनमुराद पडतो. पृथ्वीवर सर्व धान्यें पिकून जिकडे तिकडे सुबत्ता होऊन सर्व लोक धनधान्यानें संपन्न झाले आहेत. चारही वर्ण आपआपल्या धर्मामध्यें निमग्न आहेत. फार काय सांगावें ?

कीं आज आमच्या महाराजांच्या प्रभावानें संपूर्ण दोषांची खाण जें कलियुग तें निखालस त्रेतायुगच झालें आहे ह्मटलें तरी चालेल. ह्यावरून मनाचा असा सूर वाहतो कीं, कोणीतरी एखादा ऐश्वर्यसंपन्न सत्पुरुष योगबलानें महाराजांच्या शरीरांत शिरून तोच राज्याचा उपभोग घेत आहे. तेव्हां अशा गुणांचा केवळ समुद्रच असा जो आपला हल्लींचा राजा, ह्याचा प्राण पुन्हा आपल्या शरिरांत परत न जाईल अशी आपण कांहींतरी युक्ति योजिली पाहिजे. असा विचार करून त्यांनीं दूतांना आज्ञा केली कीं, तुह्मी सर्व ठिकाणीं शोध करून ज्या ठिकाणीं तुह्मांला कोणाचें मृत शरीर बरेच दिवस जपून ठेवलेलें आढळेल, तेथून तें काढून कोणताही विचार न करतां एकदम जाळून टाकावें. अशी आज्ञा करून त्या प्रधानमंडळानें चारही दिशांला दूत रवाना करून दिले. इतक्यांत राजानेंही आपला सर्व कारभार प्रधानावर सोंपवून आपण स्त्रियांबरोबर यथेच्छ क्रीडा करून व अनेक प्रकारचे भोग भोगून वात्स्यायनानें केलेल्या कामशास्त्राचें पूर्ण अध्ययन करून त्याचा स्वतः अनुभव घेतला.

३९ **आचार्यांचें पुनरागमन**—हिकडे आचार्यांच्या आज्ञेप्रमाणें जे शिष्य त्यांच्या शरीराचें रक्षण करित होते, त्यांनीं विचार केला कीं, श्रीगुरूनीं एक महिन्यानें परत येतों ह्मणून सांगितलें होतें. त्याला एक महिना होऊन गेला, परंतु स्वारी अद्याप कांहीं परत येत नाहीं. तेव्हां आतां पुढें काय करावें? त्यांस शोधावें तरी कोठें? ते अमुक ठिकाणीं आहेत असा शोध तरी सांगणार कोण? आज एक महिना गुरूंचें सान्निध्य नसल्यामुळें आह्मांला तर परम दुःख होत आहे. अशा प्रकारें पद्मपादादिप्रमुख शिष्य खेरीज करून इतर शिष्यमंडळी चिंताक्रांत झाली. कारण, पद्मपादादि मुख्य चार शिष्यांना मात्र आचार्य कोठें आहेत ही गोष्ट माहित होती. तरी तेही इतर शिष्यांबरोबर शोक करूं लागले. नंतर पद्मपाद त्या सर्वांचें सांत्वन करून ह्मणाले "आपण ह्या ठिकाणीं बसूनच शोक करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तर आतां सर्वांनींच त्यांच्या शोधास लागावें तें बरें. ह्मणजे कोठें ना कोठें तरी त्यांचें दर्शन होईल. असा संकेत करून त्यांनीं थोडेसे शिष्य आचार्यांच्या देहसंरक्षणास ठेवून बाकीची पद्मपादादि शिष्यमंडळी

आचार्यांच्या शोधाकरतां निघाली. ती फिरत फिरत अमरक राजाच्या राजधानींत येऊन पोंचली. तेथील राजा एक वेळ मृत होऊन पुन्हां जिवंतपणानें राज्य करित असल्याचें त्यांच्या कानीं आलें. तेव्हां तत्काल सर्वांस खूण पटली कीं, तेच आपले गुरु आचार्य असले पाहिजेत. कारण, तो राजा जिवंत झाल्या-पासून त्या राज्यांतील सुबत्ता धर्म, न्याय, नीति हीं वृद्धिंगत झाल्याचेंही लोक त्यांस सांगत होते. तेव्हां त्या राजाची भेट घेण्याचा त्यांनीं निश्चय केला. त्याकरितां पद्मपादांनीं अशी युक्ति काढली कीं, हा राजा नेहेमीं स्त्रीविलासांत व नृत्यगायनांत दंग असतो. ह्याकरितां आपण गवय्याचें सोंग घेऊन तेथें जावें. त्याप्रमाणें लागलीच पद्मपाद हे एक दोन ठळक ठळक अशा गुरुबंधूंसह गवयी बनून राजाच्या दर्शनास गेले. राजानेंही त्यांचा चांगला आदरसत्कार करून बसावयास आसन वगैरे दिलें, व आपला गायनाचा गुण दाखवावा ह्मणून सांगितलें. तेव्हां पद्मपादांनीं गावयास प्रारंभ केला. आणि त्या चिजेमध्यें असें सुचविलें कीं "आपण आमचे गुरु आहां. आपल्या आज्ञेप्रमाणें आपल्या पूर्व-शरीराचें आह्मी आजपर्यंत संरक्षण करित आहों. परंतु आपल्या वियोगामुळें आह्मांस अतिशय दुःख झालें आहे. आपण शिवगुरूपासून उत्पन्न झालेले आहां. व्याससूत्रावर भाष्य करणारे ते आपण." अशा प्रकारें तालसुराच्या नादामध्यें संगीतांत शिष्यांनीं सूचना देतांच त्या राजरूपी आचार्यांस एकदम पूर्वज-न्मींची स्मृति झाल्यासारखें झालें. आणि पुन्हा आपल्या देहांत जाण्याची उत्कंठा उत्पन्न होतांच त्या राजाला मूर्च्छा येऊन त्यानें धाडकर जमिनीवर देह टाकिला व अकस्मात् गतप्राण झाला! त्यामुळें राजवाड्यांत जिकडे तिकडे एकच हाहाःकार उडाला. त्या धांदलींतच पद्मपाद आदिकरून शिष्य, आपलें काम झालें अशाबद्दल आनंदित होऊन न जाणों ह्यांत आणखी एखादें कांहीं लचांड आंगावर येईल कीं काय, अशा भीतीनें त्या गर्दींतून ते त्वरा करून बाहेर पडले. आणि ज्या उच्च पर्वतावरील गुहेंत आचार्यांचा देह ठेवला होता तेथें येऊन दाखल झाले. तों हिकडे त्या राजाच्या प्रधानांनीं पाठविलेले दूत येऊन त्यांनीं तो आचार्यांचा देह शोधून काढून जबरदस्तीनें दग्ध करण्याविषयीं चि-

तेवर ठेवला होता. आतां अग्नि देणार, इतक्यांत आचार्य सावध झाले व त्यांनीं नरसिंहाचा स्तव केला. त्यामुळें त्या सर्व राजदूतांचा नाश होऊन आचार्य त्या सर्व संकटांतून मुक्त झाले.

**४० सरस्वतीचें प्रयाण**—नंतर तेथून आचार्य पद्मपादादि सकल शिष्यांसह निघाले ते मंडणपंडितांच्या घरीं आले. तेव्हां मंडणपंडितांनीं मोठ्या सत्कारानें त्यांची षोडशोपचार पूजा वगैरे करून मोठा उत्सव केला. नंतर आचार्य सरस्वतीस ह्मणाले "तुझ्यापासून मागून घेतलेली एक महिन्याची अवधि समाप्त झाली. ह्याकरितां आतां तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें सांगतों तीं ऐकावींत." हें ऐकून सरस्वतीनें आचार्यांस वंदन केलें आणि ह्मणाली:—

**ईशानः सर्वविद्यानां ईश्वरः सर्व देहिनाम् ।**
**ब्रह्मणोऽधिपतिर्ब्रह्मन्भवान्साक्षात्सदाशिवः ॥ १ ॥**

"हे ब्रह्मन्! आपण सर्वविद्यांचे व सर्व भूतांचे ईश्वर आणि ब्राह्मणांचे अधिपति असून साक्षात् सदाशिवच आहांत." आपणापासून जेवढीं प्रश्नोत्तरें ऐकावयाचीं तेवढीं ऐकलीं. तेणेंकरून माझें अत्यंत समाधान झालें. आतां सभेमध्यें कामशास्त्रांत मला जिंकण्याकरितां आपण जो यत्न केला, तो केवळ मनुष्यधर्मास अनुसरून आहे. वस्तुतः आपण सर्वज्ञच आहांत. आपण आह्मां उभयतांसहीं जिंकलें ह्मणून आह्मांस तिळमात्रही कमीपणा किंवा लज्जा वाटत नाहीं. कारण, आपण साक्षात् परब्रह्म आहां. असें असून आपल्याशीं आह्मीं वाद केला. तेव्हां सर्वज्ञानें अल्पज्ञास जिंकणें हें साहजिकच आहे. आतां माझें इहलोकचें कर्तव्य संपलें. कोणतीही आशा राहिली नाहीं. ह्याकरितां मला स्वस्थानीं जाण्याविषयीं आज्ञा असावी. असें ह्मणून ती जावयास निघाली. तेव्हां आचार्यांनीं तिची प्रार्थना केली कीं, "मी ऋष्यशृंगपुर [शृंगेरी] ह्मणून एक स्थान राहण्यासाठीं तयार केलेलें आहे. तेथें तूं निरंतर राहून सर्वांच्या इच्छित कामना परिपूर्ण कराव्यास. तेथें तूं शारदा या नामेंकरून प्रसिद्ध होशील." हें आचार्यांचें भाषण ऐकून देवीनें तें मान्य करून ती ब्रह्मलोकीं निघून गेली! ती एकाएकीं अदृश्य

झालेली पाहतांच सर्वांस मोठा चमत्कार वाटला. इतकी विद्यासंपन्न, इतकी जाणती, इतकी सद्गुणी, व इतकी कीर्तिमती स्त्री अर्धांगी ती अकस्मात् गेल्यामुळें मंडणपंडितांस किती बरें वाईट वाटावें ! तथापि त्यांतल्यात्यांत विवेकानें त्यांनीं त्या गोष्टीचें मुळींच दुःख न मानतां उलट आनंदच मानला कीं, आपण संन्यास घेण्यापूर्वींच आपली स्त्री वैधव्य वगैरे न स्वीकारतां अंतर्धान पावली, हें एक उत्तमच झालें. तिचें तें सत्कृत्य पाहून आचार्यांसही फार गहिंवर आला.

**४१ मंडणमिश्रांचा संन्यास**—मंडणपंडितांच्या मागचा सर्व पाश नाहींसा होतांच त्यांनीं 'विश्वजित्' याग करून ह्मणजे सर्वस्व दान करून आचार्यांपासून विधियुक्त संन्यास घेतला. त्या समयीं आचार्यांनीं त्यांच्या कर्णामध्यें उपदेश करून **'तत्त्वमसि'** ह्या वाक्याचा स्पष्ट अर्थ सांगितला. नंतर उपनिषद्भांगातील अनेक प्रकारचे सिद्धांत सांगून व त्यांतील शंकांचें समाधान करून त्यांना आपल्या सर्व शिष्यांमध्यें श्रेष्ठ केलें. आणि त्यांचें नांव **'सुरेश्वराचार्य'** असें ठेविलें.

अशा प्रकारें मंडणपंडितांना जिंकून आचार्य आपल्या सर्व शिष्यांसह कांहीं दिवस नर्मदातीरीं वास करून सुरेश्वराचार्यांसह दक्षिण दिशेला निघाले. ते महाराष्ट्र वगैरे देशांत संचार करीत व तेथील दुर्मतांचें खंडण करीत व अद्वैतमताची स्थापना करीत श्रीशैल्यपर्वतावर आले. तेथें तुंगभद्रेचें स्नान करून श्रीशंकराचें दर्शन घेतलें, व तेथें कांहीं दिवस राहून अनेक प्रकारच्या कुतर्कवाद्यांचें खंडण करून अद्वैत मताची स्थापना केली.

**४२ कापालिकाचा वध**—श्रीमच्छंकराचार्य श्रीशैल्यपर्वतीं असतां त्यांच्याकडे एके दिवशीं एक कपटवेष धारण केलेला व बाह्यात्कारें अत्यंत सभ्य दिसणारा असा एक भैरवाचा भक्त कापालिक ह्या नांवाचा गृहस्थ येऊन त्यांस भेटला. आणि आचार्य एकांतांत बसले आहेत असें पाहून आतां आपला कार्यभाग होण्यास कांहीं हरकत नाहीं असें मनांत आणून त्यास मोठा हर्ष झाला. त्यानें आचार्यांस हळूच विनंति केली कीं "महाराज ! आपली कीर्ति मी फार दिवस ऐकत होतों. परंतु पूर्वपुण्याईच्या योगानें दर्शनाचा योग आज आला. तेव्हां आज

माझें भाग्यच उदयास आलें असें मी समजतों. या जगामध्यें जो तो मोहालाच वश झालेला दिसतो. त्याला वश झालां नाहींत असे एक आपण मात्र. आपल्यावांचून दुसरा कोणीही तसा समर्थ नाहीं. आपली योग्यता मी तोंडानें काय वर्णन करावी ? आपण केवळ परोपकाराकरितांच अवतार घेतला आहे. आपल्याजवळ याचक आला आणि तो विन्मुख गेला असें कधींच घडत नाहीं. आपण मोठमोठालीं कृत्यें केलींत ह्मणून कापालिक जो भैरव त्याला संतुष्ट करण्याकरितां मी यत्न करतों. तो संतुष्ट झाला असतां आपणही कृतार्थ व्हाल. आज मोठा मंगल दिवस आहे. कारण, मला आपलें दर्शन झालें. आतां मला जी एक ईप्सित गोष्ट आहे ती मी आपल्या कानावर घालतों. मला भैरवास प्रसन्न करून घेण्याकरितां एक नरकपाल पाहिजे आहे. पण तें सामान्य मनुष्याचे उपयोगीं नाहीं. पट्टाभिषेक झालेल्या राजाचें तरी एक; किंवा महान् योग्याचें तरी एक; ह्या दोहोंपैकीं कोणतें तरी पाहिजे. आतां राजकपालासंबंधानें विचार केला तर तें स्वप्नांत सुद्धां मिळणें दुर्लभ आहे. तेव्हां ती आशा सोडूनच दिली पाहिजे. आतां योग्याचें नरकपाल देणें तें मात्र आपल्या स्वाधीन आहे. आपण कृपा कराल तर माझी गरज भागणार आहे. आपण आपलें नरकपाल दिल्यास आपलीही जगामध्यें कीर्ति होऊन माझीही कार्यसिद्धि होणार आहे. शरीर हें बोलून चालून नाशिवंतच; आणि आपली तर त्यावर मुळींच आसक्ति नाहीं, ह्याचा विचार करून आपल्या मनाप्रमाणें करावें. आतां अशा अघोर कर्माला तूं कां प्रवृत्त झालास ? असें ह्मणाल तर जगामध्यें अनेक क्लेश व संकटें आढळतात. त्यांचा निरास होण्याकरितांच माझा हा प्रयत्न आहे. पूर्वी वृत्रासुराच्या वधाकरितां इंद्रानेंही दधीची ऋषीपाशीं त्याच्या अस्थीची याचना केली होती. तशीच मी आपल्याजवळ आपल्या मस्तकाची याचना करित आहें. तेव्हां परोपकाराकरितां त्या ऋषीनें जशा आपल्या हातानें आपल्या अस्थि काढून दिल्या, त्याप्रमाणें आपणही मला आपलें मस्तक द्यावें."

असें त्याचें भाषण श्रवण करून आचार्य बोलले "ठीक आहे. तुझें कर्म निंद्य आहे असेंही मी ह्मणत नाहीं, व त्यापासून माझें कांहीं अनहित आहे

असेंही पण मला वाटत नाहीं. ह्याकरितां मी आपलें मस्तक देण्यास केव्हांही सिद्ध आहें. पण हे माझ्या भोंवतीं माझे शिष्य आहेत ते तुला प्रशस्तपणें माझें मस्तक घेऊं देणार नाहींत. ह्याकरितां तूं व मी एकांतस्थलीं जाऊन बसून मी समाधि लावीन. माझी समाधि लागली कीं, तूं आपलें काम उरकून घे. असा संकेत झाल्यावर तो आपल्या घरीं निघून गेला. दुसऱ्या दिवशीं कंठामध्यें हाडांची माळ घालून हातामध्यें त्रिशूळ घेऊन मद्यप्राशनानें धुंद होऊन तो आचार्यांकडे आला. तेव्हां जवळ कोणी शिष्य नाहींत असें पाहून आचार्य व तो कापालिक एकांतीं गेले. आणि आचार्यांनीं सिद्धासन करून समाधि लावली. तेव्हां त्या कापालिकानें त्यांचें मस्तक छेदण्याकरितां खड्ग बाहेर काढून आतां घाव घालणार, तोंच पद्मपादांनीं योगसिद्धीनें जाणलें कीं, कापालिक आचार्यांचा नाश करित आहे. तेव्हां त्यांनीं नरसिंहाचें ध्यान करतांच त्यांच्या शरिरांत नरसिंहाचा संचार होऊन ते धावत धावतच नरसिंहस्वरूपानें जेथें कापालिक तें दुष्कर्म करित होता तेथें गेले. आणि त्यांनीं, जसा पूर्वीं हिरण्यकश्यपूचा नाश केला, त्याप्रमाणें त्या दुष्ट व घातक कापालिकाला धरून आपल्या तीक्ष्ण नखांनीं फाडून त्याचें कपाळ फोडून त्याचे तुकडे तुकडे करून टाकले! आणि भयंकर सिंहनाद केला. तो शब्द ऐकून 'काय आहे? काय आहे?" ह्मणून सर्व शिष्य भराभर तेथें धावून आले. आणि पाहतात तों साराच भयंकर प्रकार! आचार्य समाधि लावून बसले आहेत आणि कापालिकाचा देह छिन्नविछिन्न होऊन पुढें पडला आहे! रक्ताचा पाट चालला आहे; मस्तकाच्या कवटीचे तुकडे तुकडे होऊन चहूंकडे पसरले आहेत! व नरसिंहाची उग्रमूर्ति अक्राळविक्राळ मुख पसरून आरक्त नेत्र वासून लळ लळ लळ लळ जिव्हा हालवित तग्रउग्र झालेली आहे. हा प्रकार पाहतांच भयानें व आश्चर्यानें सर्वांचीच अगदीं गाळण होऊन गेली. भीतीनें सर्वांचीं आंगें थरथर थरथर कांपूं लागलीं. इतक्यांत त्या भयंकर सिंहनादानें आचार्यांचीही समाधि उतरून तेही नेत्र उघडून पाहूं लागले. तों कापालिक आपल्यापुढें मृत होऊन पडला आहे व भयंकर उग्रमूर्ति आपल्या समोर आहे. हें पाहून त्या नरसिंह मूर्तीचा आचार्यांनीं तेथच्या तेथें

द्रुत विलंबित वृत्तांत स्तव केला आणि प्रार्थना केली कीं, "या देहाचें संरक्षण करण्याकरितां आपण प्रगट झालां. तें कार्य झालें. तर आतां ह्या स्वरूपाचा उपसंहार करावा." तेव्हां तें नरसिंहाचें उग्र स्वरूप नाहींसें होऊन पद्मपाद आपल्या पहिल्या स्वरूपानें दिसूं लागले. आणि जसें एखादें स्वप्न पडून मनुष्य जागें व्हावें, त्याप्रमाणें पद्मपादांच्या मनाची स्थिति झाली. हा चमत्कार पाहून सर्व शिष्यमंडळींनी आचार्यांचा स्तव केला. तेव्हां आचार्य बोलले कीं, "हा आज तुह्मी व आह्मी केलेला नृसिंहस्तव आणि कथा जे कोणी श्रवण व पठण करतील त्यांस कोठेंही भय प्राप्त होणार नाहीं."

**४३ मृत ब्राह्मणपुत्रास उठविलें**—नंतर आचार्य शिष्यांसहवर्तमान तीर्थयात्रा करीत करीत, घोर कली पासून रक्षण करण्याविषयीं व संपूर्ण पातकांपासून मुक्त करण्याविषयीं समर्थ असें जें गोकर्णक्षेत्र त्या ठिकाणीं येऊन ब्र-

१ नरहरे हर कोपमनर्थदं तव रिपुर्निहतो भुवि वर्तते । कुरुकृपां मयि देव सनातनीं जगदिदं भयमेति भवद्दृशा ॥ १ ॥ तव वपुः किल सत्वमुदाहृतं नव हि कोपनमण्वपि नोचितं । तदिह शान्तिमवाप्नुहि शर्मणे हरगुणं हरिराश्रयसे कथम् ॥ २ ॥ सकलभीतिषु दैवतमस्मरन्सकलभीतिमपोह्य सुखी पुमान् । भवति किं प्रवदामि तवेक्षणे परमदुर्लभमेव तवेक्षणम् ॥ ३ ॥ स्मृतवतस्तव पादसरोरुहं मृतवतः पुरुषस्य विमुक्तता । तव कराभिहतो मृतभैरवो नहि स एष पुनर्भवमेष्यति ॥ ४ ॥ दितिजसूनुममुं व्यसनार्दितं सकृदरक्षदुदारगुणो भवान् । सकलगत्वमुदीरतमस्फुटं प्रकटमेव विधित्सुरभूत्पुरा ॥ ५ ॥ सृजसि विश्वमिदं रजसावृतः स्थितिविधौ श्रितसत्व उदायुधः । अवसि तद्धरणे तमसावृतो हरसि देव तदा हरसंज्ञितः ॥ ६ ॥ तव जनिर्न गुणास्तव तत्वतो जगदनुग्रहणाय भवादिकम् । तव पदं खलु वाङ्मनसातिगं श्रुतिवचश्चकितं तव बोधकं ॥ ७ ॥ नरहरे तव नाम परिश्रवात्प्रमथगुह्यकदुष्टपिशाचकाः । अपसरन्ति विभोऽसुरनायका नहि पुरः स्थितये प्रभवन्त्यपि ॥ ८ ॥ त्वमेव सर्गस्थितिहेतुरस्य त्वमेव नेता नृहरेऽखिलस्य । त्वमेव चिन्त्यो हृदयेऽनवेद्य त्वामेवचिन्मात्रमहं प्रपद्ये ॥ ९ ॥ हतो वराको हि रुषं नियच्छ विश्वस्य भूमन्नभयं प्रयच्छ । एते हि देवा शममर्थयन्ते निरीक्ष्य भीताः प्रतिखेदयन्ते ॥ १० ॥ द्रष्टुं नशक्याहि तवानुकंपाहीनैर्जनैर्निह्नुतकोटिशंपां । मूर्तिं तदात्मन्नुपसंहरेमां पाहि त्रिलोकीं समतीतसीमाम् ॥ ११ ॥ इति आचार्यकृतनृसिंहस्तवः ॥

ह्मादि देवही ज्याचा स्तव करतात, जो सर्व प्रपंचाचा सूत्रधार व जगच्चालक असा जो श्रीशंकर त्याला अष्टांगभावें वंदन करून त्याचा स्तव केला कीं, "हे देवाधिदेवा ! तूं सत्त्व, रज, आणि तम ह्या तीन गुणांहून निराळा आहेस. भक्तांचीं दुःखें निवारण करण्याविषयीं तूंच एक समर्थ आहेस." अशा प्रकारें गोकर्ण महाबळेश्वराची स्तुति करून तीन दिवस तेथें मुक्काम केला आणि मग आचार्य हरिशंकर स्थळीं गेले. तेथें शंकर व विष्णु ह्या दोन्हीं मूर्तींचें स्थान आहे. तेथें जाऊन त्या उभयतांचा ऐक्यबुद्धीनें स्तव केला. त्यांत दशावताराची स्तुति करून श्लेषार्थानें शंकराचीही स्तुति केली. अशाप्रकारें उभय देवांची स्तुति करून संतुष्ट झाल्यावर तेथून नजीकच मूकांबिकेचें स्थान आहे, तेथें जाण्याकरितां सर्व शिष्यांसह निघाले. तों मार्गांत एका ब्राह्मणाचा एकुलता एक पुत्र मृत झाल्यामुळें त्याचीं आईबापें त्याचें प्रेत मांडीवर घेऊन मोठ्यानें आक्रोश करित होतीं. तो त्यांचा शोक असा होता कीं, एखाद्या पाषाणहृदयी पुरुषाच्या हृदयास सुद्धां घाम फुटावा. मग आचार्यांचें अंतःकरण ह्मणजे केवळ नवनीत, त्यास पाझर फुटला ह्यांत आश्चर्य तें काय ? त्यांच्या अंतःकरणांत दया उत्पन्न होऊन आतां तो पुत्र ते सजीव करणार, तोंच आकाशवाणी झाली कीं "मृताला सजीव करण्याचें ज्याच्या आंगांत सामर्थ्य आहे, त्यानें दुसऱ्यावर दया करणें, हें त्यालाच दुःखप्रद होतें." ह्यावर आचार्यांनीं मोठ्यानें उत्तर दिलें "हें खरें आहे; परंतु त्रैलोक्याचें संरक्षण करण्याविषयीं जो समर्थ असेल, त्यालाच हें बोलणें शोभतें. करितां आपण सर्वांचें रक्षण करण्याविषयीं समर्थ आहां, तरी कृपा करून ह्या उभयतांचा शोक दूर करावा." इतकें आचार्य बोलत आहेत, तोंच तो मुलगा निजून उठल्याप्रमाणें उठून बसला ! तेव्हां जमलेल्या सर्व लोकांसही आनंद व आश्चर्य झालें. मग खुद्द त्या मुलाच्या मातापितरांस काय वाटलें असेल तें सांगणें नकोच. त्यावेळीं तेथें प्रत्यक्ष असणाऱ्या सर्व लोकांस आचार्यांच्या चरित्राबद्दल व अद्भुत सामर्थ्याबद्दल अत्यंत विस्मय झाला.

**४४ हस्तामलकाची पूर्वकथा**—नंतर आचार्य सिद्धस्थानीं गेले. व तेथील मूकांबिकेच्या मंदिरांत जाऊन तिची पूजा व स्तव करून तेथून जवळच अस-

णारा व सर्व ब्रह्मवृंदांस अग्रहार ( इनाम ) दिलेला श्रीबलि नामक ग्राम होता, तेथें जाऊन कांहीं दिवस वास्तव्य केलें. त्या गांवांत ब्राह्मणांची वस्ती मोठी असून प्रत्येक घरीं अग्निहोत्र असे. किमानपक्ष दोन हजार ब्राह्मण तरी वेद पठण करणारे होते. त्या गांवाच्या मध्यभागीं श्रीशंकराचें देवालय असल्यामुळें त्या गांवाला फारच शोभा आलेली होती. रत्नहारामध्यें जसा मेरूमणी शोभतो, त्या प्रमाणें त्या गांवांत तो शंकरप्रासाद शोभत असे.

ह्या गांवांत प्रभाकर ह्मणून एक मोठा स्नानसंध्याशीळ विद्वान् ब्राह्मण धर्मकर्मामध्यें मोठा दक्ष असे. तो धनधान्यादिकांनीं संपन्न असून त्याची कीर्तीही तशीच मोठी होती. तो मोठा कुटुंबवत्सल असून त्याला त्याचे आप्तइष्टही पुष्कळच होते. परंतु पोटीं पुत्र मात्र एकच असून तो निखालस मूढ असल्यामुळें घरांत सर्व असूनही तो निरंतर चिंताक्रांत असे. ह्मणून त्याला कुटुंब सौख्याचा लेशही नसे. खाल्लेलें अन्न आंगीं लागूं नये अशी त्याची अवस्था झाली होती. पुत्राचें रूप तर काय, केवळ मदनासारखें, व तेज केवळ सूर्यासारखें होतें. पण कोणाशीं कांहीं बोलूं नये व कोणी कांहीं विचारलें असतां त्याचें उत्तरच देऊं नये. आपल्याच मनाशीं गुंगत असावें. किंवा डोळे मिटून ध्यानस्थ बसावें. अशी त्याची लहानपणापासूनच स्थिति होती. ही त्याची अमिष्टवृत्ति पाहून बापाला वाटे कीं, हा काय मूळचाच खुळा आहे; का ह्याला कांहीं भूतबाधा झालेली आहे; का ह्याच्या मागें कांहीं ग्रहांची पीडा आहे; कां कांहीं पूर्वकर्मानें ही ह्याला अशी दशा प्राप्त झाली आहे ? आतां ह्याला करावें तरी काय ? कोणास दाखवावा ? अशा चिंतेनें तो व्यग्र असतां त्यास असें समजलें कीं, आपल्या गांवांत कोणी मोठे संन्यासी आले असून त्यांच्या बरोबर अनेक शिष्यांचा समुदाय व ग्रंथांचे भारेच्या भारे आहेत. तेव्हां त्या प्रभाकरानें असा विचार मनांत आणिला कीं, येवढा मोठा जो महात्मा, कीं ज्याच्या बरोबर शेंकडों शिष्य व हजारों ग्रंथ संग्रहीं आहेत, त्या अर्थीं तो कोणीतरी मोठा साधु असला पाहिजे. ह्मणून तो प्रभाकर आपल्या त्या मुलास घेऊन जेथें आचार्यांची स्वारी उतरली होती, तेथें गेला आणि साष्टांग नमस्कार करून आपल्या त्या पुत्रालाही

त्यानें त्यांच्या पायावर घातलें. तेव्हां त्या मुलानें आचार्यांचे जे एकदां पाय धरले, ते सोडीचना! तेव्हां आचार्यांनीं आपल्या हातांनीं त्यास उठविलें. तेव्हां प्रभाकर अत्यंत नम्रतेनें आचार्यांस सांगूं लागला कीं, "हा माझा पुत्र असा मूढ कोणत्या कर्मानें झाला आहे, तें कृपा करून सांगावें. ह्याच्या वयाला आज तेरा वर्षें झालीं परंतु अद्याप ह्याला वेदाचा संस्कार नाहीं, व कोणत्याही प्रकारचें ज्ञान नाहीं. केलें पाहिजे ह्मणून कसें तरीं आठव्या वर्षी नांवाला उपनयन मात्र केलें आहे. बरें; अध्ययन करित नाहीं तर नाहीं; पण बरोबरीच्या मुलांत खेळावयास तरी जावें, पण तसाही जात नाहीं. बरें; हा असा भोळसट आहे असें पाहून दुसऱ्या मुलांनीं ह्यास मारलें, तरी हा कांहीं त्यांच्यावर रागावत नाहीं. मनाला वाटलें तर जेवतो; नाहींतर एक एक दिवस कांहींच खात नाहीं. आह्मी कांहीं सांगावयाला गेलों तर ऐकत नाहीं. ह्मणून ताडण केलें, तर उलटून शब्द बोलत नाहीं. सारें कांहीं मुकाट्यानें सहन करतो." ह्याप्रमाणें प्रभाकराचें भाषण ऐकून आचार्यांनीं त्या मुलाला विचारलें, "मुला! अशा जड वृत्तीनें राहणारा तूं आहेस तरी कोण?" तेव्हां मुलानें आचार्यांस वंदन करून उत्तर दिलें "हे गुरो! मी स्वतः जड नाहीं; तर माझ्या सान्निध्यानें मात्र जड रहातें. आतां मी कोण? असा आपला प्रश्न आहे. तर शोक, मोह, क्षुधा, तृषा, जरा, मृत्यु ह्या सहांनीं रहित असून उत्पत्ति, स्थिति, वृद्धि, क्षय, नाश, व विपरिणाम ह्या सहा विकारांनीं रहित अत्यंत सुखाचें स्थान जें परब्रह्म तें मी आहें." असें सांगून त्या अज्ञान ह्मणून मानलेल्या मुलानें तेथें सर्वांसमक्ष बारा श्लोकांनीं आत्मतत्त्वज्ञानाचें प्रतिपादन केलें! ते श्लोक ऐकून आचार्य फार प्रसन्न झाले. आणि त्या मुलाला ह्मणाले कीं "ह्या श्लोकांनीं आत्मतत्त्वाचा बोध हातांतील आमलकवत् (आवळ्याप्रमाणें) स्पष्ट होतो, ह्याकरितां ह्या श्लोकांनां व ते श्लोक रचणारा जो तूं, त्या तुलाही आजपासून "**हस्तामलक**" असेंच नांव पडेल." नंतर आचार्यांनीं विचार केला कीं, गुरूच्या उपदेशावांचूनच ज्या अर्थी ह्याला परमतत्त्वाचा बोध झाला, त्या अर्थी हा पूर्वजन्मींचा कोणीतरी योगी असला पाहिजे. हा विचार मनांत येऊन मोठ्या प्रेमानें त्यांनीं त्या मुलास जवळ घेऊन

त्याच्या मस्तकावर हस्त ठेविला आणि आचार्य त्याच्या बापाला ह्मणाले " ह्या पुत्रापासून तुह्माला प्रपंचांत कांहींच उपयोग व्हावयाचा नाहीं. कारण, ह्याची स्वतःच्या देहावरच प्रीति नाहीं, मग दारादिक जीं प्रपंचांतील साधनें त्यांच्यांवर ती कितीशी असणार ? ह्याकरितां आपली मर्जी असेल तर ह्याला आमच्या स्वाधीन करा. ह्मणजे तो आपलें देहसार्थक तरी करील." ती गोष्ट ऐकून प्रभाकराला पुत्रवात्सल्यास्तव प्रथम जरी कठिणसें वाटलें, तरी आचार्यां सारख्यांचें नित्य सान्निध्य घडणार हा विचार मनांत आणून त्यानें मोठ्या सद्गदीत अंतःकरणानें परंतु संतोषपूर्वक त्याला त्यांच्या पदरांत घातलें. व आचार्यही मोठ्या प्रेमानें त्यास बरोबर घेऊन पुढें निघाले.

४५ **शृंगेरीमठाची स्थापना**—आद्य श्रीमच्छंकराचार्य, यांस श्रीक्षेत्र शृंगेरी हें स्थान फार पसंत पडलें, यास्तव त्यांनी विभांडक ऋपीपासून जागा मागून घेऊन विक्रम संवत् २२ मध्यें तेथें तुंगातीरीं आपला आद्य मठ स्थापन केला. आणि त्यांत सुंदर पाषाणाचें देवालय बांधून त्यांत स्वहस्तें श्रीशारदापीठाची स्थापना केली. नंतर आपल्या पश्चात् वादांत हरून मुंडन करून पट्टशिष्य बनलेले मंडणमिश्रपंडित ज्यांस आचार्यांनीं प्रसन्न होऊन सुरेश्वराचार्य असें नामाभिमान दिलें होतें, त्यांस त्या मठाचें आधिपत्य दिलें. श्रीसुरेश्वराचार्य हे महान् योगाभ्यासी असत. त्यांच्या आंगांत आपला देह पाहिजे तितका काळ धारण करण्याचें सामर्थ्य होतें. हे वादांत हरल्यानंतर विक्रमसंवत ३० विजयनाम संवत्सरीं चैत्र शुद्ध १५ मेस त्यांनीं चतुर्थाश्रम धारण केला आणि शालिवाहन शके ६९५ प्रमाथी संवत्सरीं माघ शुद्ध १२ स त्यांनी समाधी घेतली. ह्मणजे ह्या सिंहासनाचा उपभोग त्यानीं ७९९ वर्षें घेतला!! असा तेथें लेख आहे.

४६ **प्रस्तुतचे अधिपति**—त्यानंतर त्यांच्या पश्चात् ह्या मठाचे सिंहासनावर शिष्य परंपरेनें अधिपति होत आले. प्रस्तुतचे शृंगेरी सिंहासनस्थ श्रीमज्जगद्गुरु स्वामी महाराज " **श्रीसच्चिदानंदशिवाभिनवविद्यानरसिंहभारती** " हे तेहतिसावे यति होत. श्रीसंकेश्वर वगैरे मठाधिपति पूर्वी गृहस्थाश्रमी असून नंतर चतुर्थाश्रम घेतात. परंतु शृंगेरीची गोष्ट तशी नाहीं. तेथील अधिपतीस बाल्यद-

शेंतच संन्यासधर्म स्वीकारावा लागतो. हल्लींचे स्वामी ह्यांनीं शके १७८८ क्षय नाम संवत्सरीं आषाढ वद्य ६ रोजीं ह्मणजे आपल्या वयाच्या अकराव्या वर्षींच संन्यासधर्म स्वीकारला. भावी गुरु होणारानें ह्याच मठांत आपल्या गुरुस्वामीपाशीं आश्रमधर्माचा अभ्यास करावा लागतो. त्याप्रमाणें प्रस्तुत गुरूंचाही अभ्यास उत्तम झाला होता. शृंगेरी आणि तेथील मठ ह्मणजे हल्लींच्या मन्वंतरांतसुद्धां एक साक्षात् ऋषींचाच आश्रम होय. वैदिक धर्माचें आगर; शास्त्राध्ययनाचा सागर, संस्कृताचा भर, आणि सदाचाराचें माहेरघर. मग काय विचारावें ? स्वामींची बुद्धि प्रथम पासूनच भारी तीव्र; आणि विद्येची मनस्वी अभिरुचि. ह्यामुळें थोडक्याच दिवसांत स्वामी वेदशास्त्रांत पारंगत झाले. संस्कृत भाषेंत तर ह्यांचा हातखंडा. ह्यामुळें काशीपासून रामेश्वरापर्यंत ह्यांची कीर्ति पसरली. श्रीची स्वारी काशीस गेली असतां त्यांची शास्त्रनिपुणता, संस्कृतभाषा वक्तृत्वशैली इत्यादि पाहून तेथील मोठमोठाले शास्त्री पंडित ही अगदीं थक्क झाले. येथील प्रत्येक मठाधिपति असेच विद्वान् होऊन गेले असें ह्मणतात. ह्यांच्या पदरच्या मंडळींतही मोठमोठालीं जाडीं प्रकरणें आहेत. त्यांचें वर्णन पुढें येईलच.

सांप्रतकालीं श्रीस्वामी महाराजांचें वय चौपन्न वर्षांचें आहे. ह्यांचें शरीर भव्य आणि कांति तेजःपुंज आहे. ब्रह्मचर्य व्रताचें तेज तर मुखश्रीवर साक्षात् उभेंच आहे असें वाटतें. क्षमा, शांति, दया ह्या तर महारांजाच्या दासीच बनून राहिल्या आहेत. सर्वांत मनोल्हादकारक गोष्ट ह्मटली ह्मणजे श्रीस्वामी महाराजांचें निरंतर प्रसन्नमुख ही होय. कोणी केव्हांही महाराजांचें दर्शन घ्या. ते किंचित् हास्य मुद्रेनें आपणाकडे अवलोकन करीत आहेत असें वाटतें. त्यांनीं तो रत्नखचित् मुकुट, ती टपूरमौक्तिकांची माला, हिरेजडित पदक वगैरे धारण करून ते छत्रचामरादि राजचिन्हांनीं युक्त सिंहासनारूढ झाले ह्मणजे तर कांहीं अप्रतिम शोभा दिसते. सोबत दिलेल्या श्रीस्वामी महाराजांच्या मूर्तीचें दर्शन घेतलें ह्मणजे आमच्या ह्मणण्यापैकीं पुष्कळ भाग दृष्टोत्पत्तीस येईल.

श्रीगुरूंचा नित्यक्रम ह्मटला ह्मणजे प्रातःकाळीं चार पांच वाजतां उठून प्रातःस्नान करावयाचें. नंतर प्रातःसंध्यावंदनादि कर्म वगैरे उरके पर्यंत आठ वाजतात.

मग कोणी परके मनुष्य दर्शनास वगैरे आले असतील तर त्यांस दर्शनास परवानगी असते. दर्शनास प्रतिबंध बहुतकरून केव्हांही नसतो. तथापि परकीयांनीं शांत संधि पाहून जावें हा उत्तम पक्ष. संध्यावंदनाच्या आसनावर स्वारी असली ह्मणजे मात्र भाषण होणें तें संस्कृतांत होतें. त्यासमयीं दुसरी भाषा बोलत नाहींत. दर्शनार्थ आलेले लोक कोणी उंची फळफळावळ, कोणी श्रीफळ, कोणी कांहीं, कोणी कांहीं, महाराजांपुढें ठेऊन साष्टांग नमस्कार घालतात. महाराज प्रसन्न मुद्रेनें किंचित् हास्य करून प्रत्येकास संस्कृत वाणीनें कुशल प्रश्न विचारतात. कोणी संस्कृतानभिज्ञ असला, तर त्यास समजावयासाठीं जवळ शास्त्री मंडळी असतेच. महाराजांचें तें कोमल आणि दयायुक्त भाषण, त्यांची ती प्रसन्न आणि शांत मुद्रा, स्वभक्तांविषयीं त्यांची ती प्रेमळ आणि प्रसादमय दृष्टि, त्यांचें तें कडकडीत वैराग्य आणि ईश्वरी तेज, हीं पाहिलीं ह्मणजे शरणागतांचें अंतःकरण पूज्य बुद्धीनें अगदीं सद्गदित होऊन जातें. क्षणभर संसाराचा विसर पडतो; बायका पोरें तुच्छ वाटूं लागतात; ज्या कनककांतादि संसारसुखास आपण भुलून गेलों आहों, त्याचें तें भिकार आणि ओंगळ स्वरूप पट्कन डोळ्यापुढें उभें राहतें; आणि एकदम मनांत विचार येतो, कीं बेहत्तर आहे पोटाला नाहीं मिळालें तरी ! येथच्या येथें यज्ञोपवीतास रजा द्यावी, शिखादेवीस वंदन करावें, आणि तुंबींशीं शरीर संबंध जोडून ह्या आनंदभुवनांत पडून अशा सत्पुरुषाच्या चरणांची सेवा करावी. परंतु उपयोग काय? मन चंचलवृत्ति, दृढतर संस्कार झालेल्या विषयांकडे त्याचा मनस्वी ओढा. त्यामुळें मठांतूनपाय बाहेर पडला कीं झालें. विसरला सारें, आणि लागला " **भार्याश्च मेमे पशवश्च मेमे**" करायला. मग यांतूनही जो श्रीगुरुचरणकमलीं मिलिंदायमान होत असेल त्याचें भाग्य काय वर्णन करावें ? अस्तु.

नंतर महाराज दरबारास येऊन बसतात. दररोजच्या दरबारास सिंहासन वगैरे कांहीं नसतें. कडासनावर कोठेंही स्वारी बसते. नेहमींचा पोषाख ह्मटला ह्मणजे नेसलेली छाटी एक व आंगावर छाटी एक. दुसरें कांहीं नाहीं. मग वैदिक ब्राह्मण वगैरे कोणी आले असतील तर त्यांजकडून चार मंत्र ह्मणवून किंवा

कोणी व्युत्पन्न असल्यास त्यास कोणाकडून चार प्रश्न वगैरे विचारून ज्याच्या त्याच्या योग्यते प्रमाणें बिदागी, मंत्राक्षता, श्रीफळ, वगैरे प्रसाद देऊन संभावना करतात. कोणी ब्रह्मचारी, वैरागी वगैरे प्रवाशी असतील तर कोणास शिध्याचा हुकूम, कोणास कांबळी, कोणास बनात, कोणास पातेली, तपेलीं, वगैरे पात्रें देऊन संतुष्ट करतात. कोणी गुणी मनुष्य गेल्यास त्यासही अल्पस्वल्प गुण पाहून यथोचित बिदागी देऊन तृप्त करितात. तात्पर्य, कोणीही श्रीमठांतून विमुख येत नाहीं. हें आटोपलें ह्मणजे संस्थानचे मुख्य कारभारी, मामलेदार वगैरे मंडळी येऊन आपआपलीं कामें श्रीस समजावतात. आणि नवीन कामाबद्दल सल्ला मसलत विचारतात. त्यानंतर शिरस्तेदार येऊन आलेले टपालचे कागदपत्र वाचून दाखवितात. अनाचारासंबंधीं कोणाच्या फिर्यादी वगैरे असल्यास त्याची सुनावणी करतात. लहानसहान खटले मठाचे पारपत्येगार ह्यांजकडे निकालास देतात. महत्वाचा खटला असला तर हुजूर चालतो. मोठमोठे विद्वान् शास्त्री बारिष्टराप्रमाणें पूर्वपक्ष उत्तरपक्ष करून सत्य निवडून काढतात. व सारासार विचार पाहून महाराज फैसला देतात. स्वामी महाराजांचा स्वभाव अत्यंत दयाळू आणि क्षमाशील आहे. त्यांस कलह आवडत नाहीं. सर्वांनीं नेहमीं शांतचित्त असावें असें वाटतें. कोणी "ह्याबद्दल मला क्षमा असावी" अशी श्रीस विनंती केली, तर स्वामी हास्यवदन करून ह्मणतात—"क्षमा हें आमचें व्रतच आहे." त्याबद्दल विनंती नको ! ह्यावरून काम, क्रोध, लोभ ह्यांपासून अतीत असणें हें आपलें व्रत त्यांच्या मनांत सदासर्वकाल किती जागृत असतें ह्याची कल्पना होईलच.

श्रीगुरूस थोड्या बहुत प्रमाणानें हिंदुस्थानांतील सर्व भाषा येतात. येत नाहीं अशी इंग्रजी. मराठी भाषा जरी फार उत्तम अवगत नाहीं, तत्रापि साधारण भाषणांत कोठेंच नडत नाहीं. समजतात तर उत्तमच. आणि बोलतात तीही फार स्पष्ट, शुद्ध, आणि प्रौढ अशी असते. संस्कृतभाषा तर काय करतलामलकवत्. एखाद्या विषयावर भाषण करूं लागले ह्मणजे ही जन्मभाषा नव्हे असें कोण ह्मणेल ? कर्नाटक तर बोलून चालून त्यांची देशभाषा आणि जन्मभाषा.

ती उत्कृष्ट असेल ह्यांत आश्चर्य काय ? हा मठ कर्नाटक प्रांतीं असल्यामुळें येवढा प्रसिद्ध असूनही महाराष्ट्र देशांत आजपर्यंत त्याची फारशी प्रसिद्धि नव्हती. परंतु प्रस्तुत स्वामींनीं प्रसिद्ध गरवारे प्रकरणाचा थोड्यावर्षांपूर्वी निकाल केल्यामुळें आणि श्रीची स्वारी सोलापूर, कोल्हापूर, बेळगांव, धारवाड वगैरे प्रांतीं दिग्विजयास आली होती त्यावरून बऱ्याच लोकांस माहिती झाली आहे. तसेंच करवीर, धारवाड, सोलापूर वगैरे कित्येक ठिकाणीं वादविवादांत श्रीगुरूंची विद्वत्ता, व संस्कृतभाषानैपुण्य अप्रतिम दिसून आल्यावरून तेथील शास्त्री मंडळींनीं फार वाहवा केली. अस्तु.

आचारविचारांच्या फिर्यादींचा विचार झाला ह्मणजे स्वारी माध्याह्नस्नानास उठते. तों अकरा वाजण्याचा सुमार होतो. माध्याह्न संध्या वगैरे झाल्यावर स्वारी पूजेस बसते. पंचायतनपूजेचा थाट फारच पाहण्या सारखा असतो. सिंहासनें कमळें, प्रभावळी वगैरे साहित्य सर्व सोन्याचें रुप्याचें व जडावाचें असून त्यावर उत्तम कुसर आहे. **रत्नगर्भ हेरंब** आणि **चंद्रमौलीश्वर** ह्या दोन मुर्ति तर फारच पाहण्यासारख्या केवळ अलौकिक अशा आहेत. 'रत्नगर्भ हेरंब' ही गणपतीची सुमारें चार अंगुळें उंचीची स्फटिकाची मूर्ती आहे. ही प्रकाशांत पाहिली ह्मणजे तिच्या आंत नऊ रत्नें असलेलीं स्पष्ट दिसतात. चंद्रमौलीश्वराची मूर्ति सुमारें टीचभर उंच असून प्रकाशांत पाहिली ह्मणजे तींत चंद्राची पांढरी स्वच्छ कोर दिसते. ह्या दोन्ही मूर्ति आद्य श्रीमच्छंकराचार्य यांनीं कैलासाहून आणलेल्या आहेत, असें सांगतात. पण केव्हां आणल्या ह्याबद्दलचा इतिहास त्यांच्या चरित्रांत कोठें सांपडत नाहीं.

ह्या सर्वांची पूजा, अर्चा, ध्यान, प्रार्थना होईपर्यंत बारावर एक वाजून जातो. मग श्रीची स्वारी श्रीशारदाअंबेच्या दर्शनार्थ नजीकच्या चौकांतील देवालयांत जाते. तेथें गेल्यावर थोडा वेळ द्वार बंद करून जप, ध्यान, धारणाकरून श्रीदेवीचें तीर्थ स्वहस्तांत घेऊन श्रीगुरु बाहेर येतात. ह्यावेळीं परस्थळाहून तीर्थ प्रसाद घेण्यासाठीं आलेले लोक बाहेर उभे असतात. इतक्यांत एक परिचारक तबक आणून श्रीशारदापीठासमोर ठेवतो. त्यांत तीर्थप्रसाद घेणारांनीं यथा-

शक्त्या पूजाद्रव्य ठेवावें. मग महाराज तीर्थप्रसाद देतात. आणि त्यांस प्रसादास येण्याची आज्ञा करून आपण श्रीगुरुसमाधीच्या दर्शनास जातात. नंतर दक्षिण दरवाजानें स्वारी घाट उतरून श्रीतुंगातटाकीं गंगापूजनास बसते. उपाध्याय पूजामंत्र ह्मणत असतो. व महाराज षोडशोपचार यथासांग स्वहस्तें पूजन करितात. प्रवाहांत नैवेद्य वगैरे समर्पण केल्या नंतर स्वारी परत स्वस्थळीं येऊन आसनावर बसते. आणि सर्वांस स्वहस्तें तीर्थप्रसाद देते. नंतर प्रसादास आलेल्या मंडळीची नीट वास्तपूस करून जप जाप्य ध्यान धारणा आटपून देवास नैवेद्य समर्पण करून भोजन होतें.

महाराजांची फळफळावळीवर भक्ति फार आहे. ह्यास्तव उत्तमोत्तम भक्तार्पित फळें असल्यास त्यांचा सर्व देवतांस नैवेद्य समर्पण करून नंतर यथाविभाग मठांतील सर्व मंडळीस प्रसाद पोंचवितात आणि अवशिष्ट राहील त्यांतील अल्पमात्र स्वीकारून त्यांची मुखशुद्धि होते. हें सर्व आह्निक उरकावयास दुपारचे चार वाजतात. नैमित्तिक कांहीं असलें ह्मणजे याहीपेक्षां उशीर. भोजन आटोपलें ह्मणजे स्वारी पुन्हा दरबारास बसते. महाराजांची कालक्रमणा ह्मटली ह्मणजे '**काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमतां**' अशा प्रकारची आहे. विद्यार्थ्यांची परिक्षा घेणें ही त्यांची नित्य करमणूक. आज काय ऋग्वेदाची परीक्षा; आज काय यजुर्वेदाची परीक्षा; आज काय काव्यांची परीक्षा; आज काय षड्दर्शनांची परीक्षा. ह्याप्रमाणें नित्य परीक्षा सुरू असतात. श्रीच्या मुखांतून सार्वकाल छंदोमय वाणी स्रवत असते. निरनिराळ्या वृत्तांतील काव्य श्लोक ह्मणण्याची श्रीस फार आवड आहे. श्लोक ह्मणत असतां कोणाशीं बोलण्याचा प्रसंग आला तर जवळच्या दुसऱ्या कोणास पुढें ह्मणण्यास सांगून आपण भाषण करितात. इतकी शास्त्र पठणाची आवड ! मधून मधून दर्शनास आलेल्या लोकांशीं भाषण, मधून मधून षड्दर्शनांची, वेदांताची, तर्कशास्त्राची चर्चा चालूच असते. सायंकाळच्या सुमारास पदरचें शास्त्री मंडळ, गांवांतील सभ्यलोक वगैरे दर्शनास येतात. सुमारें आठ वाजण्याच्या वेळेस स्वारी सायंसंध्येस उठते. नित्यकर्म आटोपल्यावर रात्रौ सर्व देवतांचें

दर्शन वगैरे घेऊन होईपर्यंत दहा अकरा वाजून जातात. मग पुन्हा शास्त्राची थोडीबहुत चर्चा होऊन स्वारी शयन करते. आणि पहांटेस चार वाजतां प्रातःस्नानास उठते. श्रीगुरूंच्या ह्या वर सांगितलेल्या दिनचर्येवरून त्यांचा वैराग्यशील स्वभाव, शास्त्रविद्येवरील भक्ति, भक्तांवरील प्रेम, इत्यादिकांचें संपूर्ण नाहीं तथापि अंशमात्रें करूनें वाचकांस ज्ञान होईलच. आतां महाराजांविषयीं लोकांची पूज्य बुद्धि, त्यांची सत्ता, त्यांचा राजेरजवाड्यांतील मान, **हैदर, टिपू व इंग्रजसरकार** इत्यादि परजाती सुद्धां त्यांस किती भजतात, मठांतील दरबारांत शास्त्रपारंगत मंडळी कोण कोण आहे, इत्यादि विषय सांगावयाचा राहिला तो पुढील प्रकरणांत येईल.

४७ **श्रीशृंगेरी-मठाची सत्ता**—ही फारच मोठी आहे. येथील मठाधिपतींस जितका राजेरजवाड्यांकडून मान मिळाला आहे, व मिळत आहे, तितका मान हिंदुस्थानांतील आचार्यांच्या इतर मठांस सुद्धां क्वचित्च असेल. ह्या मठास इनामी उत्पन्न सुमारें अर्धे लक्षाचें असून शिवाय राजेरजवाड्यांकडून हजारों वर्षासनें आहेत. **म्हैसूरच्या** राज्यांत व **निजामच्या राज्यांत** अनेक प्रकारचे करभार आहेत. ह्यावरून ह्या मठाधिपतींस मुसलमानी राज्यांत सुद्धां किती मान आहे हें व्यक्त होतें. ह्या उभय राज्यांत जितके ब्रह्मचारी, बैरागी, अवधूत, संन्यासी व फकीर आहेत, त्या सर्वांवर ह्या मठाची पूर्ण सत्ता आहे. स्मार्तधर्मानुयायी चतुर्वर्ण प्रजेवरही आहे, हें निराळें सांगणें नकोच. ह्या सर्वांकडून करभार घेण्याचा, व प्रत्येक मंगलकार्यांतील अग्रपूजेचा स्वामींस अधिकार आहे. ह्याशिवाय जे श्रीमान राजेरजवाडे भक्तिभावानें गुरुदर्शनास येतात, त्यांचें पूजाद्रव्य नजरनजराणा येतो तो वेगळाच. श्री० **आप्पासाहेब राजे जमखिंडीकर** ह्यांची जगद्गुरूंवर विशेष निष्ठा होती, असें दिसून येतें. कांहींवर्षांपूर्वीं ते श्रीगुरूंच्या दर्शनास गेले होते, व तेथें त्यांनीं भक्तिभावें श्रीस चांदीचें व सुवर्णाचें सुंदर सिंहासन अर्पण केलें. पूर्वींही त्यांनीं ह्या मठास अशाच बहुमोल देणग्या दिल्या आहेत. श्रीजगद्गुरूंची अपूर्व योग्यता पाहून मुसलमान व इंग्रज लोक सुद्धां ज्यांस भक्तिपूर्वक देणग्या देतात, त्यांस

घेतलीच आहे. ती त्रिदावळी शृंगेरीमठासच मिळावयाची. इतरांस मिळावयाची नाहीं. असें असतां कोणी फाजीलपणा करतील, तर त्याचा योग्य बंदोबस्त ठेवावा"

हैद्राबाद—सरकार परधर्मी असूनही आमच्या जगद्गुरूवर किती निष्ठा आहे, हें प्रदर्शित करण्याकरितां त्याच्या मूळ तैलंगी ठरावांतील सारांश दाखल करतों. " बनाव, हवालदार, पटेल, कैबर, वगैरे तमाम कामगार लोकांस फर्मावलेलें आज्ञापत्र ऐशीजेः—

श्रीशृंगेरीमठाचे स्वामी वर्णाश्रमधर्मविचारणार्थ आडवी पालखी, पंचकलश, श्वतछत्र, मकरतोरणें, पंचदीपिका, पंचकळशी चांदीची अंबारी वगैरे त्रीदावळी सहीत येतील. सबब स्वामींचे आज्ञेनुसार वागून स्वामित्वाबद्दल द्रव्य देत जावें. इतर किरकोळ संन्याशी ह्मणजे विरूपाक्ष, पुण्यगिरी वगैरेंचे मठाधिकारी आपण मोठे असें सांगत फिरतील, तर त्यांचें ह्मणणें अगदीं ऐकूं नये. ते आल्यावेळीं मान मरातब किंवा स्वामित्वाचें द्रव्य त्यांस देऊं नये. वरील मुलखांत अनुग्रह किंवा शिक्षा करण्याचा अधिकार श्रीशृंगेरी महास्थानमठाधिकाऱ्यांस मात्र आहे. किरकोळ मठाधिकाऱ्यांस कोणताही अधिकार नसल्यामुळें, ते येतांच त्यांस पकडून श्री यांच्याकडे पाठवून द्यावे. शृंगेरीमठाच्या आज्ञापत्राखेरीज कोणासही मानमर्यादा करतां कामा नये. याप्रमाणें अम्मल चालवीत असावा." दुसऱ्या एका पर्शियन भाषेतील सनदेंत हैद्राबाद सरकारनें आपल्या राज्यांतील खालीं लिहिलेलें, श्रीशृंगेरीमठास अधिकार दिल्याचें कबूल केलें आहे, व त्याप्रमाणें सर्व राष्ट्रांत हुकूम फर्मावला आहे. ते अधिकार येणें प्रमाणें—

( १ ) सदर श्रीस्वामी यांचा अधिकार श्रीमल्लिकार्जुन आणि इतर देवालयें ह्यांत चालेल.

( २ ) मठास दिलेलीं इनामें, जहागिरी वगैरे पूर्वीप्रमाणेंच चालतील.

( ३ ) जोशी यांच्या ताब्यांत असलेले हत्ती, घोडे, यांजवर मठाचेंच स्वामित्व राहील.

( ४ ) संन्यासी व अवधूत जे बेवारस स्वर्गस्थ होतील, त्यांची मालमत्ता श्रीमठाचे ताब्यांत जाईल. ( ५ ) श्रीमठाचे शिष्यवर्गानें विवाहादि प्रसंगीं

देण्याचे मान, नजराणे वगैरे श्रीमठास दिले पाहिजेत. ( ६ ) देवालयाच्या उत्पन्नांतून दर रुपयास एक आणा याप्रमाणें उत्पन्न मठाकडे दिलें पाहिजे. ( ७ ) लंगरखाना आणि मुसलमान फकिरांची खैरात, याबद्दलच्या नेमणुकांपैकीं कांहीं अंश मठाकडे दिला पाहिजे.

ह्या ठराव इ० स० १७९९ सालीं केलेला आहे. मुसलमानांच्या फकिरांच्या खैरातींत सुद्धां आमच्या गुरूचा अंश! ह्यावरून शृंगेरी मठाची प्राचीन सत्ता कशी होती, ह्याचें चांगलें स्पष्टीकरण होतें. असो. आतां प्रस्तुतचे सार्वभौम इंग्रज सरकार ह्यानींही प्रस्तुत मठाधिपतींस किती मान आणि पूज्यता दिली आहे तें पहा. ह्मैसूरच्या कमिशनर साहेबांनीं इंडियासरकारास शृंगेरी स्वामींसंबधें लिहिलेल्या इंग्रजी पत्राचा भाषांतर उतारा. ह्मैसोर कमिशनरचें आफिस

**बंगलोर ता० २७ जुलै सन १८६८ इ०**

मेहरबान हिंदुस्थान सरकारचे सेक्रेटरी साहेब ह्यांचे हुजुरास.

महाराज, **सिम्ला.**

आपलें पत्र नंबर १२०१ तारिख १६ मिनहूमधील दुसऱ्या प्यारेग्राफांतील मजकुरासंबधानें हिंदुस्थान सरकारास कळविण्यासाठीं खालील खुलासा लिहिला आहे.

( २ ) शृंगेरीचे गुरु हे आद्यधर्मसंस्थापक श्रीमच्छंकराचार्य यांचे परंपरागत मठाधिपति असून ह्यांस दक्षिणहिंदुस्थानांतीलच पुष्कळ लोकांनीं गुरु मानलेलें आहे असें नाहीं, तर पूर्वींचे पेशवे व होळकर इत्यादि मराठी घराण्यांनीं व राजेरजवाड्यांनीं सुद्धां गुरु मानलें आहे. आणि त्यामुळें त्यांची सत्ता हिंदुस्थानांतील कोणत्याही धर्मगुरूंपेक्षां फार मोठी आहे असें ह्मणावें लागतें. आणि ह्याचकारणावरून त्यांस जो अतोनात मान दिलेला आहे, तो अगदीं यथायोग्य आहे, असें ह्मणण्यांत मलाही मोठें भूषण वाटतें. ह्या प्रांतांत आढापालखीचे अधिकारी फक्त हेच गुरु होत. ह्यांच्यापाशीं प्राचीन निजाम, पेशवे, आणि ह्मैसूरचा राजा ह्यांच्या सनदा आहेत. आणि होळकर इत्यादि राजेरजवाड्यांनीं फारच मोठा सन्मान दिलेला आहे. ( ३ ) ह्यांची मानमान्यता विशेष असल्यामुळें प्राचीन

कालापासून त्यांच्या वैभवास उचित असा शिलेदारी सरंजमाही ते बरोबर बाळगितात, आणि ह्मैसूर, हैद्राबाद इत्यादि राज्यांतून जाऊं लागले ह्मणजे त्यांस त्या त्या राज्यांतून संरक्षणार्थ स्वार देण्यांत येतात. मद्रास सरकारांतून सुद्धां तशीच वहिवाट आहे. ( ४ ) गुरूस तुंगभद्रानदीच्या उगमाजवळ कडूर जिल्ह्यांत सुमारें अर्ध्या लक्षाची इनाम जमीन आहे. तसेंच ते नियमित कालीं दिग्विजयास निघाले ह्मणजे ह्मैसोर प्रांतांतील शिष्यवर्गाकडून त्यांस पुष्कळच पैसा मिळतो. तो ते दानधर्मांत खर्च करतात. पूर्वींचा राजा ह्यांस १००० रुपये प्रतिमासीं देत असे. ( ५ ) गुरु नरसिंहभारती, हे फार पूज्य असून त्यांचें वय ७२ वर्षांचें आहे. ह्यांनीं पुष्कळ प्रवास केलेला आहे. आणि त्यांच्या विद्वत्तेबद्दल फारच लौकिक आहे. त्यांची विशाल बुद्धिमत्ता, परोपकार बुद्धि आणि सदाचरण हीं पाहून लोक त्यांचा फार फार सत्कार करितात. ( ६ ) माझ्यामतें दस्तूरमाफक गुरूस जो सन्मान व संरक्षणार्थ जी शिबंदी तैनातीस द्यावयाची, तींत उणं करण्याचें तर कांहीं कारण दिसत नाहींच, परंतु त्यांच्या तैनातीस कांहीं अधिक शिबंदी असावी अशाबद्दल राणीसरकारास अर्जरूपानें माझा प्रयत्न आहे.

आपला नम्र सेवक

( सही. ) L. Bowring.

**कमिशनर.**

ह्यावर सरकाराकडून कमिशनर साहेबांच्या लिहिण्यास मान्यतेचेंच उत्तर आलें आहे. **पूर्वींच्या ईस्ट इंडिया** सरकारांतूनही असाच मोठा सन्मान करण्यांत आला आहे. त्याचें थोडेंसें स्वरूप समजण्यासाठीं एका ठरावाचें भाषांतर खालीं दाखल केलें आहे.

## ईस्ट इंडिया कंपनीचें दस्तक.

आनरेबल कंपनीसरकारचे अंमलदार, जहागीरदार, जमीनदार, पोलिस अंमलदार, चौकीदार, पहारेकरी, इत्यादि तमाम लोकांस कळावें कीं:—

श्री स्वामी शंकराचार्य, पेशव्यांचे गुरु, मद्रासेहून रामनाद, तिरुपति, कांजी-

वरम, त्रावणकोर, शृंगेरी वगैरे ठिकाणीं जाण्यासाठीं निघाले आहेत. त्यांच्या स्वारीबरोबर हत्ती, घोडे, उंट, ओझ्याचे बैल, आणि हत्यारबंद लोक असतील.

ह्याकरितां हुकूम फर्मावण्यांत येत आहे कीं, आचार्यांस मार्गामध्यें येतांना किंवा जातांना जकातीबद्दल किंवा कोणत्याही हरएक कारणाबद्दल कोणत्याही प्रकारें हरकत करूं नये. त्यांस अथवा त्यांच्या माणसांस कोणत्याही प्रकारें उपद्रव देऊं नेय, एवढेंच नव्हे पण प्रत्येक बाबतींत तुह्मीं त्यांस सन्मान द्यावा; त्यांस मदत करावी; आणि तुमच्यानें होईल तितकी त्यांची **बडदास्त** राखावी. त्यांच्या रखवालीस पाहरेकरी, वगैरे देऊन ते तुमच्या हद्दींतून दुसऱ्याच्या हद्दींत सुखासमाधानांत जाऊन पोंहोंचतील असा बंदोबस्त राखावा. हा हुकूम नीट लक्षांत आणून त्याप्रमाणें वर्तणूक व्हावी. (सही) **अस्पष्ट.**

मद्रास ता० २३ मे सन १८०५

वरील सर्व सनदापत्रांवरून श्रीशृंगेरी मठाची सत्ता, वैभव आणि पूज्यता बरीच लक्षांत येईल.

**४८ शृंगेरीचा मार्ग—श्रीमच्छंकराचार्यांनीं** प्रथमतः चार दिशांला चार मठ स्थापिले. त्यांतील शृंगेरी हा मुख्य होय. आसेतुहिमाचलपर्यंत या मठाचा अधिकार. घोर वादसंग्राम करून पूर्ण पराजित केलेले प्रसिद्ध **मंडनमिश्र** यांस **सुरेश्वराचार्य** असें नामाभिधान देऊन शिष्य स्थापिला तो याच शृंगेरी मठांत. अशी या मठाची महिती आहे. तेव्हां तो मठ कोठें व कसा आहे याची जिज्ञासा वाचकांस होणें साहजिक आहे. ह्यास्तव आह्मी स्वतः जाऊन आलेला मार्गच येथें सांगतों ह्मणजे झालें. **शृंगेरीस** दक्षिणेकडून जाण्याचा रस्ता ह्मटला ह्मणजे बेंगळूरच्या स्टेशनावरून सदर्न मराठा रेल्वेनें **बिरूरच्या** स्टेशनावर जाऊन उतरावें लागतें. आणि तेथून पुढें सुमारें ७२ मैल पायरस्त्यानें जावें लागते. **शृंगेरी** हें संस्थान कर्नाटक प्रांतांत ह्मैसूरच्या राज्याच्या उत्तर सीमेवर असून ह्या प्रांतांत सर्वत्र कानडी भाषा बोलण्याचा प्रघात आहे. **हें** कांहीं निराळें सागणें नकोच. आह्मीं **श्रीजगद्गुरूच्या** दर्शनेच्छेनें **प्रस्थान** काढलें, व फार दिवसांची मनीषा तृप्त करण्यासाठीं मोठ्या उत्कंठेनें **बिरूर-**

**पर्यंत** जाऊन दाखल झालों खरे; परंतु कानडी भाषेचा गंधही नसल्यामुळें, आपलें मार्गांत कसें होईल ह्या संकटांत होतों. व त्यांतून पार पडण्यास श्रीगुरूच्याच चरणस्मरणांवाचून दुसरा मार्ग नव्हता. ह्यास्तव तोच स्वीकारून होतों. परंतु चमत्कार पहा ! **बिरूरच्या** स्टेशनावर पाय ठेवतों न ठेवतों, तोंच श्री**जगद्गुरूंच्या** कृपेंतील रा० रा० **लक्ष्मी नारायणभट्ट** नांवाचा सेवेकरी ह्मैसूरास गेलेला त्याच गाडींतून खालीं उतरला. आणि त्यानें आपणहून येऊन हिंदुस्थानी भाषेंत प्रश्न केला, कीं आपणांस कोठें जावयाचें आहे ? आह्मी **शृंगेरीस श्रीजगद्गुरू** महाराजांच्या दर्शनास जावयाचें आहे. असें सांगतांच एकमेकांचें वृत्त एकमेकांस समजल्यावर परस्परांस किती आनंद झाला असेल, हें सांगणें नकोच. त्यांतून आमच्या आनंदास तर पारावाराच नव्हता. कारण. आह्मास तर घरचीच सोबत मिळाली, किंवा प्रत्यक्ष श्रीमठांतच पाऊल ठेवल्याप्रमाणें आनंद झाला. खरोखर त्या दिवशीं हे **लक्ष्मीनारायणभटजी** आह्मास भेटले नसते, किंवा त्यांनीं आपणाहून आमची विचारपूस केली नसती, तर आमच्या फजितीस पारावार नव्हता. आह्मीं रात्रची रात्र स्टेशनावरच राहाण्याचा बेत केला होता. पण स्टेशन होतें लहान आणि त्या दिवशीं त्याच वेळीं बराच पाऊस पडून चिखलाची सारी राड झाली होती. परंतु आमच्या **लक्ष्मीनारायणभटजींनीं** आह्माला सांभाळून धर्मशाळेंत नेलें. संध्याफराळाची चांगली सोय करून देऊन नित्रास आणि निर्मळ अशी जागा दिली. एकदंरींत रा० **लक्ष्मीनारायणभटजींनीं** आह्मांवर मार्गामध्यें जे अनेक उपकार केले ते आमच्यानें फिटावयाचे नाहींत. तसेंच त्यांच्या सुशील आणि परोपकारी स्वभावाचें आह्मीं या प्रसंगीं जर दिग्दर्शन केलें नाहीं, तर खचित कृतघ्नतेच्या दोषास पात्र होऊं. आमच्या संकटसमयीं तार पाठवून स्वागताची तजवीज केल्याप्रमाणें **श्रींचा** साक्षात् सेवक यावा, हा श्रीजगद्गुरूंचा साक्षात्कार नव्हे असें कोण बरें ह्मणेल ? ह्या साक्षात्कारापासून आमच्या मनांत सदरहू मठाधिपतींबद्दल जो अतुल पूज्य भाव उत्पन्न झाला आहे, त्याची स्मृति आजन्मपर्यंत राहील. असो. स्टेशनापासून **बिरूर** गांव सुमारें अर्ध मैल आहे. गांव लहानच असून त्याच्या दक्षण

टोंकांस सुंदर धर्मशाळा बांधलेली आहे. जवळच विहिर असून तिचें पाणी चांगलें गोडें असतें. ब्राह्मणाची खाणावळही जवळच आहे. मात्र कानडी भाषेशिवाय जरा पंचाईत. धर्मशाळेच्या बाहेर गाडी, घोडे बांधण्याजोगें पटांगण आहे. आंतील बाजूस अनेक दालनें, अनेक खोल्या वगैरे स्वयंपाक करण्यास पुष्कळ सोयी आहेत. मध्यभागीं एक विस्तीर्ण चौसोपी असून आंगणांत सुंदर फुलझाडांची बाग केलेली आहे. धर्मशाळेचें काम नवेंच असून चांगलें मजबूत आहे. उत्तरेच्या सोप्यांत कृष्णंभट नांवाचे कुलीन वैदिक ब्राह्मण राहतात. त्यांनींच ही धर्मशाळा खटपटीनें बांधली आहे. हे गृहस्थ हल्लींच्या श्रृंगेरी मठाधिपतींचेच पूर्वाश्रमींचे कोणी नातलग आहेत, असें त्यांच्याच मुखानें समजलें. थोड्या दिवसांपूर्वीं म्हैसूरचे दिवाणसाहेब ह्या धर्मशाळेंत उतरण्यास आले होते, त्यांजकडून दररोज बारा ब्राह्मणांची भोजनाची सोय होण्यासारखी तजवीज सदरहू भटजी यांनीं करून घेतली, व त्याप्रमाणें हल्लीं क्रम सुरू आहे. रा० कृष्णंभटजी यांस मराठी भाषा चांगली बोलतां येते. तिरपतीस जाणाऱ्या येणाऱ्या यात्रेकरूंची ह्या धर्मशाळेंत बहुतकरून नेहमीं गर्दी असते. तथापि सर्व जागा निर्मल ठेवण्याविषयीं व्यवस्थापक सदा तत्पर असतात, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. धर्मशाळेच्या मालकांनीं आम्हांस भोजनोत्तर जाण्याविषयीं बहुत आग्रह केला. परंतु आम्हांस पुढें जाण्याची त्वरा असल्यामुळें तसें करितां आलें नाहीं. कर्नाटक प्रांतीं मोठमोठ्या गांवांतून अनेक श्रीमान् गृहस्थ अन्नदातृत्वाविषयीं प्रसिद्ध आहेत. बिरूरास ‘ सिधाप्पा ’ नांवाचे कुलीन गृहस्थ असेच थोर असून अन्नदानाविषयीं त्यांची प्रसिद्धी आहे. त्या सर्वांचीं नांवें व कीर्ति आम्हांस मद्रास, व बेंगळूर येथेंच श्रुत झाली होती. बिरूरापासून श्रृंगेरीपर्यंत गाडीरस्ता बराच आहे. परंतु मध्यंतरीं नद्यांस पूल वगैरे नसल्याकारणानें पर्जन्यकाळांत मोठी अडचण होते. आम्ही सकाळींच गाडी करून निघालों ते बारा मैलांवर तरीकेरी गांव लागला. हा गांव चांगला मोठा असून तेथें सरकारी सुंदर इमारती अनेक आहेत. एक दोन विहिरीही सुरेख बांधलेल्या असून भोंवतीं कितीएक रमणीय बागा आहेत. त्यांत

उत्तम व ताजी फळफळावळ स्वस्ती मिळते. गांवाच्या मध्यभागीं, एक विस्तीर्ण चौसोपी धर्मशाळा आहे. **कर्नाटक** प्रांतीं धर्मशाळेस **'छत्र'** असें ह्मणतात. आह्मी कोण ? कोठील ? ह्याची कितीएक ग्रामस्थांनीं चौकशी केल्यानंतर एका सुखवस्तु गृहस्थाकडून मोठ्या आदराचीं आह्मांस आमंत्रणें आलीं. ते दिवशीं नागपंचमीचा सण असल्याकारणानें आह्मांस कर्नाटकांतील सणाच्या भोजनाचा अनायासें थाट पहावयास मिळाला. त्या प्रांतांतील भोजनपद्धतींतील एक दोन रीती ध्यानांत ठेवल्या पाहिजेत. पहिली रीत ही कीं, महाराष्ट्र देशांत यतीस पुढीस बोलाविलें ह्मणजे त्यांना मात्र हस्तोदक घालतात. किंवा पिंडप्रदानाचें श्राद्ध असेल तर क्षणाच्या ब्राह्मणांस मात्र हस्तोदक घालण्याची चाल आहे. एरवीं कोणास हस्तोदक घालीत नाहींत. परंतु कर्नाटकांत प्रत्यहीं ब्राह्मणांस हस्तोदक घालतात, व एक संध्येची पळी उदकानें भरून तें उदक पानापुढें टाकतात. ब्राह्मणानें प्राणाहुती घेतल्यानंतर त्या भूमीवरील उदकास स्पर्श करून नेत्र-स्पर्श करण्याची चाल आहे. तसेंच साधारण प्रचारांत महाराष्ट्र देशांत अक्षतेची विशेष आवश्यकता दिसत नाहीं. परंतु कर्नाटकांत प्रत्यहीं अक्षत लावलीच पाहिजे. उपोषणाच्या दिवशीं मात्र नुसतें भस्म. ही रीती माहीत नसली, तर त्या प्रांतीं आर्षपणा पदरीं येतो. कर्नाटकांतील अन्नांत किंवा पक्कान्नांत विशेष भेद आहे असें नाहीं. तेथील भोजनांतील पदार्थ कांहीं मलबारी व कांहीं मराठी दोन्ही मिश्र असतात. अप्पे, पायस, मुळीक वगैरे पदार्थ मलबारासारखे; व वरण भाज्या, कढी, पुरणपोळ्या, कडबू, तेलच्या वगैरे पदार्थ महाराष्ट्रासारखे असतात. तद्देशांतील मुख्य पदार्थ सार. तें फारच स्वादिष्ट आणि रुचकर असें करतात. अस्तु. आह्मीं रात्रौ तरीकेरीमध्यें विश्रांती घेऊन सकाळीं पुढें निघालों. ते दोन प्रहरीं पंधरा मैलांवर **लाखोली** नांवाचा **तुंगभद्रेच्या** कांठीं गांव आहे, तेथें दाखल झालों. हा गांव लहानच आहे, तरी टुमदार आहे. येथें रा० **रामाप्पा** ह्या नांवाचे श्रीमान् गृहस्थ राहतात. ह्यांची अन्नदानाविषयीं फारच कीर्ति आहे. हे गृहस्थ फार सज्जन आणि सुस्वभावी आहेत. आह्मी वे० रा० **सुरेश्वर** जोशी नांवाच्या ओळखीच्या गृहस्थाच्या घरीं उतरलों. ह्यांचें घर तुंगभद्रेच्या अगदीं

किनाऱ्यास आहे. स्नानाच्या संबंधानें कर्नाटक प्रांतीं बहुतकरून एक उत्तम सोय केलेली असते. ती अशी कीं, एक स्नानगृह चांगलें मजबूत एका बाजूस बांधून त्यांत एका मोठ्या चुलीवर एक किंवा दोन हांडे भले मोठे मोठे सदा तापत असतात. ह्यामुळें हवें तितकें मनमुराद पाणी घेऊन स्वस्थपणें निर्मल स्नान करावयास सांपडतें. जोशी यांच्या घरीं त्या दिवशीं माहेरवाशिणींनीं व मुलांनीं करण्याची पूजा होती. कोंकणांत कुकोबाची ह्मणून पूजा करतात, तीच ही असावी असा आमचा अदमास आहे. भोजनाचा बेत चांगला होता. भोजनोत्तर आह्मी पुढें निघालों. मैल अर्ध मैल गेलों तों डोंगरकटार लागून येवढें मोठें भयंकर जंगल लागलें कीं, तें पाहून भयानें आमची गाळण झाली. त्यांत सायंकाळाचा समय झालेला! मग काय विचारावें? हें असें घोर जंगल किती लांबपर्यंत आहे ह्मणून चौकशी करितां जंगल हें शृंगेरीपर्यंत असेंच आहे. परंतु नदीपलीकडे हिंस्र पशु वगैरे नाहींत ह्मणून समजलें. ह्मणजे हें घोर जंगल सुमारें बारा मैल आहे. आह्मीं जंगलाच्या मध्यभागीं ह्मैसूर सरकारची फारेस्ट खात्याची चौकी आहे, तेथें मुक्कामास जाण्याचा बेत केला होता. सूर्यास्त होतांच त्या चौकीकडे आमचे डोळे लागून राहिले. ही चौकी **तुंगभद्रेच्या** कांठींच असून सरकारांनीं लागवड केलेल्या सागवानी जंगलाच्या मध्यमार्गीं आहे. तेथें सुमारें सात वाजतां पोंचलों. रखवालदारानें चौकींत उतरण्यास जागा, शेकोटीस लांकडें वगैरे देऊन यथाशक्त्या आदरआतिथ्य चांगलें केलें. तेथील दफेदार मोठा मनमिळाऊ होता. ह्या जंगलांतील हा मधला टापू ह्मैसूर सरकारानें सागवान लावून राखून ठेवला आहे. सुमारें दहाहजार उभे साग विक्रीस तयार झालेले होते. ह्याचा सरासरी घेर दीड हाताचा असून उंची सरासरी चाळीस फूट होती! असे ते गगनचुंबित सरळ आणि घनदाट वृक्ष हारीनें लागलेले पाहून चित्तास मोठा आनंद वाटला. त्यांत त्यास ठाईं ठाईं पुष्प-गुच्छ गजबरलेले असल्यामुळें फारच शोभा आली होती. हे तयार झालेले वृक्ष घेण्यासाठीं तेथें प्रतिवर्षी व्यापारी लोक येतात आणि खरेदी करून तोडून त्याचे ताफे बांधून **तुंगभद्रेतून बल्लारीकडे** घेऊन जातात. ज्या ठिकाणचे

वृक्ष तोडतात, त्या ठिकाणीं पुन्हा लगेच नवी लागवड करतात. ह्याप्रमाणें फेरफारानें लागवड केल्यामुळें प्रतिवर्षास नवे सागवान विक्रीस तयार असतात. आणि ते अगदीं निकोप असतात. ह्या सर्व निबिड अरण्यांत मनुष्यवस्तीचा टापू काय तो येवढाच. ह्मणजे चौकी मात्र काय ती. बाकी सर्व गगनचुंबित किर्र झाडी. हिंसक पशूंचें तर वसतिस्थानच तें. रानहत्ती तर दिवसा ढवळ्या 'ओ' ह्मणून तयार असतात. ह्मैसूर ग्याझिटमध्यें दोन महिन्यांनीं तीन महिन्यांनीं एक दोन तरी सांपळ्यांत सांपडलेले जंगली हत्ती विक्रीस तयार असतातच. तेथें वाघ, अस्वलें, तर आहेतच, पण सिंह सुद्धां आहेत ह्मणतात. सर्वांत जंगली हत्तींचा उपद्रव फार. आज काय रस्ता अडविला; आज काय गाडीवान चिरला; आज काय वृक्ष मोडून घातला; अशी रोज ओरड ऐकूं येते. ह्याच चौकीवरील एक दफेदार आह्मी जाण्याच्या पूर्वीं आठ पंधरा दिवस एका जंगली हत्तीनें सोंडेनें पाय धरून फाडून टाकला होता! एक हत्ती लवणांत स्वस्थ बसला असतां संध्याकाळीं एक मनुष्य तें काय आहे तें न समजून त्याच्याच आंगावर गेला. त्यास त्यानें चिरडून टाकलें! चार पांच दिवसांपूर्वीं एका साहेबाचा तांगा रानहत्तींनीं रस्ता अडवून तीन दिवस जंगलांतच अडकवून ठेवला होता; इत्यादि त्या चौकीदाराच्या तोंडच्या अनेक गोष्टी ऐकून आमची अगदीं गाळण झाली. व दुसऱ्या दिवशीं चांगलें उजाडल्यावांचून पुढें निघावयाचें नाहीं असा आह्मीं निश्चय केला. दुसऱ्या दिवशीं आह्मीं त्या भल्या चौकीदाराचा निरोप घेऊन निघालों. तों पुढें जंगल अधिक अधिकच भयप्रद दिसूं लागलें. सूर्यदर्शन तर लांबच, पण वर आकाश आहे कीं नाहीं याचाच वानवा. मधून मधून रात्रौ हत्तींनीं लहान लहान वृक्ष व फांद्या मोडून घातलेल्या गाडीस बराच अडथळा करीत. परंतु दैवयोगानें मोठा एखादा वृक्ष कोठें आडवा पडलेला नव्हता. सुमारें बारा वाजतां तुंगभद्रेच्या उतारावर गेलों. परंतु पाणी फार. नौकेंतून गाडी जाईना. सबब एक दिवस मुक्काम करावा लागला. दुसरे दिवशीं अंमळ पाणी ओसरलें तेव्हां निघून **यडहळ्ळीस** गेलों.

'**यडहळ्ळी**' हा गांव बराच मोठा आहे. मुनसफ कोर्टाची एक भव्य

इमारत आहे. बाजार बराच मोठा असून गांवाची रचना बहुतेक दुतर्फा आहे. येथे धारवाडाहून शेंपन्नास वर्षां पूर्वी येऊन राहिलेले मराठे लोक बरेच आहेत. ते थोडथोडी अशुद्ध मराठी भाषा बोलतात. येडहळ्ळीहून कोप्पा. पंधरा मैल आहे. सायंकाळीं आह्मी कोप्पास गेलों. कोप्पा येथें शिनाप्पा या नांवाचे एक सुशील व उदार गृहस्थ राहतात. ह्यांच्या घरीं कितीही ब्राह्मण जावोत, भोजनास नाहीं ह्मणून ह्मणावयाचें नाहीं असें ह्यांचें व्रत आहे.

हा गांव लहानसरच आहे. तथापि येथें सरकारी तारआफीस आणि पोष्ट ऑफिस आहे. तें शिनाप्पा ह्यांचेच घरीं आहे. शृंगेरीस तार जाणें येणें तर ह्याच स्टेशनावरून जाते येते. कोप्पास तारआफीस ठेवण्याचें कारण, तेथच्या आसपासच्या डोंगरांत काफीची लागवड फार आहे. त्या जमीनदारांस व्यापाराच्या संबंधानें तारेचेंच कारण फार पडतें. हे जमीनदार बहुतेक युरोपियनच आहेत.

कोप्पाहून निघालें ह्मणजे पुन्हां पांच सहा मैलांवर तुंगभद्रा पार व्हावें लागतें. ह्याचें कारण ती त्या डोंगरांतून फार वळशावळशानें आली आहे. तेव्हां दोनदां उतरणें भाग पडतें. कोप्पापासून शृंगेरीपर्यंत भारी दाट जंगल आणि पर्वत आहेत. त्यावर काफीची आणि सुपारीची लागवड फार. कोप्पापासून शृंगेरीपर्यंत एकसारखी डोंगराळ जमीन आहे हा डोंगर ओलंडला ह्मणजे दुसरा; ह्याप्रमाणें वळणांवळणानें रस्ता गेला आहे. तो संपतां संपत नाहीं. जातां जातां नाकीं नऊ येतात. आह्मी सायंकाळचे पांच वाजतां शृंगेरीस जाऊन दाखल झालों.

**४९ दानशूर भिडे**—आह्मीं प्रत्यक्ष शृंगेरीस जाऊन शृंगेरीचें इत्थंभूत वर्णन कोकिळांतून पूर्वींच प्रसिद्ध केलें आहे. पण त्यांत एक उणीव राहिली होती. व ती भरून काढण्याचा योगायोग आजपर्यंत आला नाहीं हेंही मनाला डांचत होतें. तो योग आज आला, ही मोठ्या सुदैवाची गोष्ट होय. ही गोष्ट ह्मणजे शृंगेरी येथील सुखवस्तु राहणारे गृहस्थ वे० शा० **रामभट्टजी भिडे** ह्या गृहस्थांचें दानशूरत्व हें होय. अन्नदान करणारे गृहस्थ, ब्राह्मण, भाट्ये, गुजराथी वगैरे जातींतही अनेक आहेत. तथापि रामभटजी ह्यांचें उदाहरण निदान आह्मीं पाहिलें त्यांत तरी लोक-

विलक्षण आहे ह्यांत शंका नाहीं. ह्यांच्या इतका अतिथीचा झीज सोसणारा गृहस्थ परम दुर्मिळ होय. हें ह्मणणें केवळ अतिशयोक्तीचें असें मुळींच नव्हे; असें आह्मी जें खालीं लिहिलेलें प्रत्यक्ष पाहिलेलें उदाहरण देत आहों, त्यावरून सर्वांची खात्री होईल ह्याबद्दल तिळमात्र शंका नाहीं. शृंगेरीच्या मार्गांत रात्रौ पर्जन्य केवळ मी मी ह्मणत असतां व कर्नाटक भाषेचा आमच्या ठिकाणीं अभाव असतां श्रीमज्जगद्गुरूंच्याच कृपाप्रसादानें अकस्मात् कोणी मुद्दाम सांगून ठेवल्याप्रमाणें लक्ष्मीनारायण भट्टजींची कशी गांठ पडली, व त्यांनीं आह्मांस किती साह्य केलें वगैरे वृत्तांत पूर्वींच्या शृंगेरीवर्णनांत येऊन गेलाच आहे. पुढें मार्गांमध्यें तुंगभद्रानदीस पूर येऊन आमची गाडी अडकून राहिली, व लक्ष्मीनारायणभटजींच्या घरीं श्राद्ध असल्यामुळें एक मुक्कामावरून पुढें ते शृंगेरीस निघून गेले, व आह्मांस मागाहून एक दिवसानें जावें लागलें. आमची शृंगेरीस कोणाचीच ओळख नसल्यामुळें जाऊन उतरावें कोठें ह्या विवंचनेंत आह्मी होतों. लक्ष्मीनारायण-भटजीनीं प्रथम सांगितलें कीं, तुह्मीं मठामध्येंच उतरावयास यावें. 'परंतु प्रथमच जाऊन मठामध्यें बिऱ्हाड देणें प्रशस्त वाटत नाहीं. असें आह्मीं ह्मटल्यावरून लक्ष्मीनारायणभटजी ह्मणाले "तर मग तुह्मी भिड्यांच्याच घरीं जा. तेथें हरहमेश हवेतेवढे लोक येतात व तेथें तुमची बरदास्त उत्तम राहील." पण आपण अशा परक्या गृहस्थाच्या येथें तरीं काय ह्मणून जावें? ह्मणून आह्मांसही प्रथम संकोच वाटत होता. पण अखेर आह्मीं त्यांच्याच घरीं जाण्याचा निश्चय केला. नदीचें पाणी उतरल्यानंतर आमची गाडी पुढें निघाली. पाऊस मनस्वी असल्यामुळें चिखलतर काय अगदीं मी मी ह्मणत होता. एक पाय काढावा व एक पाय घालावा अशी स्थिति होती. बैल तर थकल्यामुळें पाय उचलतां उचलीनात. अखेर आह्मीं खालीं उतरून पुढें चालावें व गाडी केव्हां येते ह्मणून वाट पाहत बसावें, ह्याप्रमाणें कोप्पाहून शृंगेरीस जावयास सांयकाळचे पांच वाजले. तोंपर्यंत स्नान सुद्धां नाहीं मग जेवणखाण कोठचें? पावसानें भिजून सारे कपडे चिंब झाले होते. अशा स्थितींत आह्मी भिड्यांचें घर विचारित त्यांच्या घरासमोर, गाडी नेऊन एकदांची उभी केली, व आंत पाकिट

वगैरे तसेंच ठेऊन, सोय वगैरे कशी काय होते तें पाहण्यासाठीं घरांत शिरलों. घर सडकेवरच असून पूर्वाभिमुख होतें. शृंगेरी हा गांव डोंगराच्या अगदीं पायथ्याला व खोऱ्यांतच असल्याकारणानें भिड्यांच्या घराची मागची बाजू अगदीं डोंगरास लागून होती, व पुढील दरवाजापुढें पुष्कळ उंच सोपा असून त्यांत बसण्यासवरण्याला जागा होती. पण ही जागा अगदीं बाहेरचीच होय. आह्मी पायऱ्या चढून वर गेलों तों आंत चौसोपी व चांगला प्रशस्त वाडा असून ओसरीवरच बैठक वगैरे घातलेली होती. व तेथें एक वृद्ध गृहस्थ बसलेले होते. त्यांस जाऊन आह्मीं नमस्कार केला व रामभटजी आपणच काय ? ह्मणून प्रश्न केला. त्यांनीं सांगितलें रामभटजी घरांत पूजा करीत आहेत. तेव्हां आह्मीं विचारलें कीं, आतां आज सांयकाळींचशी पूजा कां ? त्या गृहस्थानें सांगितलें कीं त्यांचा रोजचाच नियम आहे कीं, दुपारीं तीनवाजल्यानंतर स्नान करावयाचें व ५।६ वाजेपर्यंत स्नान, संध्या, पूजा नैवेद्य वैश्वदेव करून कोणी आला गेला असल्यास पाहून नंतर रात्रौ भोजनास बसतात. असा नित्याचाच सांप्रदाय आहे. हें ऐकून आह्मांस मोठें आश्चर्य वाटलें.

इकडे आमचें हें बोलणें चाललें आहे तोंच त्यांच्या एका मुलानें गाडीपाशीं जाऊन आमचें सर्व सामान उतरून आंत आणून ठेवलें, व बैलांस निवाऱ्याची जागा वगैरे देऊन पुढें वैरण वगैरे टाकून तिकडील सर्व व्यवस्था केली. आपण कोण ? कोठील ? कोणीकडून आलांत ? ह्याची चौकशी कोणींच केली नाहीं. आह्मी बसून क्षणभर गेला न गेला तों, एक पोक्त वयाच्या आंगावर चांगले दागदागिने घातलेल्या बाई आंतील दाराशीं आल्या व आह्मांस स्नानाची तयारी आहे ह्मणून कानडी भाषेंत सांगूं लागल्या. त्यावरून त्या खुद्द यजमानीनबाई असाव्यात असा सहज तर्क झाला. आह्मीं त्यांस विनयपूर्वक ह्मटलें कीं, मला कानडी भाषा येत नाहीं याबद्दल वाईट वाटतें. तेव्हां बाई ह्मणाल्या "आंत सर्व स्नानाची तयारी आहे लौकरच चला." तेव्हां "ठीक आहे. मीं पंचा धोतर सोवळें वगैरे काढून येतों" असें आह्मीं ह्मणतांच बाई ह्मणाल्या "आतांच कांहीं एक काढावयास नको. सर्व कांहीं आंत ठेवलें आहे.

नैवेद्य वैश्वदेव होत आला. आपण लौकर चलावें." हें ऐकून आह्मांस फार आश्चर्य वाटलें. कारण, मी कोठील कोण वगैरेची कांहीं एक चौकशी न करितां इतकी तरतूद ठेवणें ह्मणजे कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. असो. आह्मी बाईबरोबर आंत स्नानगृहांत गेलों. तेथें एका मोठ्या चरावर मोठमोठाले पाण्याचे तीन हांडे तापत होते. एकांत अतिशय कढत, एकांत सोमळ, व एकांत बरेंच थंड पाणी तयार असून जवळच एक तांब्याची डोणी; खुंटीवर पंचा; सोवळें एक; खोबरेल तेल भरलेलें भांडें; व एक हळदीचें भांडें. इतकी तयारी होती. इतकी तयारी कर्नाटकांत बहुतेक घरीं असते. कारण तिकडे स्नानाचा विधि फारच मोठा असतो. ह्याशिवाय तेथें दगडाची सुंदर न्हाणी बांधलेली असून वरती फिरकी फिरविल्याबरोबर कारंजा सुटून शावरबाथ होण्यासारखी तजवीज केलेली होती. आह्मीं आधींच भिजून दमून व मळक्या कपड्यांनीं गेलेलों असल्यामुळें ती व्यवस्था पाहातांच फार आनंद झाला. आतां स्नानास बसणार; तोंच एक ठेंगणेसे वृद्ध गृहस्थ गळ्यांत सोन्यांत मढवलेली रुद्राक्षांची माळा घातलेले, कपाळास भस्म वगैरे लावून थोडेसे वांकलेले असे तोंडानें स्तोत्र वगैरे ह्मणत मजकडे आले. तेव्हां हेच रामभटजी असावेत असा तर्क करून त्यांस आह्मीं नमस्कार केला. त्यावर ते ह्मणाले "हें पहा, नमस्कार चमत्कार आतां कांहीं नको. तो सावकाशपणें करूं. मीं इतकेंच सांगण्यासाठीं आलों आहे कीं, येथें पाणी, सोवळें वगैरे सर्व तयारी आहे. आपण पाहिजे तितकें पाणी घेऊन यथेच्छ स्नान करावें. कोणत्याही प्रकारचा संकोच धरूं नये. मी वैश्वदेव करितों. आपली संध्या आटोपली कीं भोजनास बसावयाचें." इतकें सांगून ते गृहस्थ आंत गेले, व आह्मींही स्नान करून त्यांच्या बरोबर भोजनास बसलों. जेवतांना मी कोण? व कोठून आलों वगैरे सांगावयास लागलों. त्यावर रामभटजी ह्मणाले "आपण कोणीही असा; व कोठूनही या. तें आपल्याला सांगावयाला व मला ऐकावयाला आणखी पुष्कळ वेळ आहे. आपण वाटेच्या श्रमानें थकलां आहां. तेव्हां स्वस्थपणानें भोजन करा. ह्यांत आतां व्यत्यय कशाला?" तेव्हां आह्मीं ती गोष्ट सोडून दिली. नंतर आपण प्रत्यहीं इतक्या उशिरानें भोजन करण्याचें कारण काय? ह्मणून प्रश्न केला.

रामभटजी ह्मणाले "आमच्याकडे असेच कोणी येणारे जाणारे चार चौघे रोज असतात. असा बऱ्याच दिवसांपासून क्रम चालू आहे. असें असतां एके दिवशीं सर्व जेवणें खाणें उरकल्यानंतर एक संन्यासी आला. त्यांची पुढी वगैरे झालेली नव्हती. सबब आह्मी किंवा बायकांनीं स्नान करून स्वयंपाक केला तर चालेल काय ? ह्मणून त्यांस विचारलें. परंतु त्यांनीं सांगितलें कीं भोजनें झाल्यानंतर कोणीही स्वयंपाक केला तरी मला चालणार नाहीं. यामुळें नाइलाज झाला. त्यांना त्या दिवशीं माझ्या घरीं येऊन उपोषण पडलें, ह्मणून मला फार वाईट वाटलें. आणि त्या दिवसापासून असाच क्रम ठेविला आहे कीं, बाकीच्यांची भोजनें रोजच्याप्रमाणें दुपारीं होऊं द्यावयाचीं व आपण स्वतः मात्र तीन चार वाजतां स्नान करावयाचें, व सहा वाजेपर्यंत संध्या, पूजा, नैवेद्य वैश्वदेव करून सांयकालपर्यंत कोणी आला गेला तर पहावयाचा व दिवेलावणीला जेवावयास बसावयाचें. हें ऐकून व आमचा स्वतःचा योगायोगही तसाच आलेला पाहून आह्मांस त्या गोष्टीचें मोठेंच आश्चर्य वाटलें. भोजनोत्तर आह्मी उभयतांही ओटीवरील बैठकीवर येऊन बसलों व पानसुपारी झाल्यानंतर रामभटजीही आपला विडा खलबत्त्यांत घालून कुटूं लागले. हा त्यांचा कारखाना बहुधा दिवसभर चालत असे. हें पाहून आह्मीं आपलें नांव गांव सांगूं लागलों. पण तेव्हांही त्यांनीं तें ऐकावयाचें नाकारलें. ते ह्मणाले " आपण दमून आलां आहांत. वर अंथरुणें घातलेलीं आहेत; आतां आपण जाऊन स्वस्थ निजा. उद्यां सावकाशपणें बोलूं व स्वामी महाराजांचें दर्शन वगैरे उदईक सहज होईल. काळजी नसावी." नंतर आह्मीं उठून माडीवर दाखविलेल्या ठिकाणीं निजावयास गेलों. आमच्या बरोबर भोजनास ५।६ मंडळी होती. तितक्यांचे बिछाने सुरेख रीतीनें वर घातलेले होते. तिकडे थंडी मनस्वी; ह्यासाठीं गादी वगैरे ऊबदार असुन शिवाय मोठमोठीं लोंकरीचीं गेटमें प्रत्येकास ठेवलेली होतीं. इतकेंच नव्हे, तर प्रत्येकाच्या उशाशीं एक एक शेगडी, थोड्याश्या ढलप्या, व एक एक आगपेटी ठेवलेली असे. अनोळखी मनुष्याची तबयत इतकी सांभाळणें ह्मणजे कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. याकरितां त्याचें साद्यंत वर्णन खालीं देतों, ह्मणजे त्यांच्या

**लोकविलक्षण दानशूरपणाची** कल्पना वाचकांच्या लक्षांत येईल. वेदशास्त्र-संपन्न रामभटजी भिडे हे पूर्वीचे महाराष्ट्रांतीलच एक चितपावन ब्राह्मण असून त्यांचें सर्व आयुष्य शृंगेरीसच गेलें. अर्थात् त्यांचे शरीरसंबंधही तिकडचेच झाल्यानें त्यांच्या घरांतील सर्व भाषा कानडीच झालेली आहे. तथापि घरांतील बहुतेक सर्व मनुष्यांस मराठी बोलतां येतें. रामभटजी मोठे सत्वस्थ वृत्तीचे गृहस्थ असून ते वेदशास्त्रांतही चांगले प्रवीण आहेत. हल्लीं जे शृंगेरीचे मठाधिपति आहेत, त्यांच्या गुरुस्वामींच्या कारकीर्दींत ह्यांनीं मठाच्या कारभाऱ्याचें काम केलेलें होतें, व त्यांत त्यांनीं चांगली संपत्ति मिळविली. एवढेंच नव्हे, तर त्यांच्याकडून धन्यवाद घेतला. नंतर सर्वोपरी कृतकार्य होऊन ते आपलें शेवटचें आयुष्य आनंदानें अन्नदानांत खर्च करीत स्वस्थ राहिले होते. त्यांनीं तुंगभद्रा नदीच्या पलीकडे एक सुमारें पन्नास हजारांची जमीन खरेदी घेऊन ठेवली आहे. व तींतून अन्नदानाचा खर्च चालावा अशी कायमची योजना करून ठेविली आहे. त्या जमिनीमध्यें निर्वाहाचे झाडून सारे जिन्नस पिकतात. फक्त विकत घ्यावें लागतें असें मीठच. तेवढ्याकरितां जमिनीच्या एका निराळ्या तुकड्याची योजना करून ठेविली आहे. राजश्री भिडे ह्यांच्या सारखा गृहस्थ अन्नदान करणारा व अतिथीची झीज सोसणारा हल्लींच्या काळांत अत्यंत दुर्मिळ आहे. पूर्वींचीं उदाहरणें झालीं किंवा हल्लीं कदाचित् असलीं तरीं तीं राजे लोकांचीं असतील. सामान्य गृहस्थाकडून एवढें अन्नदानाचें पुण्य घडणें ह्मणजे परम आश्चर्याची गोष्ट आहे. **रामभटजीं**च्या घरीं कोणीही जावो, कितीही जावोत; व कितीही दिवस राहोत. त्यांची बरदास्त स्वतःच्या घराहून अधिक राहते. ह्यांच्या घरीं केवळ पाहुणे व अतिथीच येतात व जेवतात असें नाहीं; तर तेथील पोलीसचे शिपाई, पोलीस अम्मलदार, मोजणीदार वगैरे मंडळी आली, तरी सुद्धां उतरावयाची भिड्यांच्या येथें. हें तर काय, पण मठामध्यें नवरात्रींचा उत्साह मोठ्या कडाक्याचा होतो, व नऊ दिवस हजारों पान जेवतें. ह्या वेळेस जे लोक परगांवाहून येतात त्यांस मठामध्यें दुपारीं प्रसाद मिळतो. पण सकाळ संध्याकाळ फराळास सारी मंडळी भिड्यांकडे ! बरें; भोजनाचा एक राडा असेल तर असो;

तो नित्याचाच आहे. पण जे कोणी तेथें जेवणार नसतील त्यांस सकाळीं भिड्यां-कडून शिधा मिळतो. उजाडलें कीं त्यांच्या घरांतील एखादी सून त्याच कामा-वर बसते, व जे कोणी जेवणार नसतील त्यांस तांदूळ, डाळ, मीठ, मिरची, भाजीची एक फांक व दोन पैसे ह्याप्रमाणें प्रत्येकीं देण्याचें काम चालतें. इतकेंच नव्हे तर, आज फराळाचें कोण काय; त्याची चौकशी होऊन त्याप्रमाणें सर्व व्यवस्था घरामध्यें होत असते. धान्यफराळ वेगळा, निरशन वेगळें, जेवणारे मंडळीची पंगत वेगळी. ह्याशिवाय असे कांहीं अतिथी किंवा विरक्त भेटतात कीं ते शिध्यालाही यावयाचे नाहींत व जेवावयालाही यावयाचे नाहींत. अशांना त्यांचें ताट वाढून पोंचतें करावयाचें! आह्मी गेलों त्या वेळीं एक ब्रह्मचारी बावा शृंगेरीच्या एका देवालयांत उतरले होते. त्यांची वृत्ति अशा प्रकारची होती. ते मोठे तामसी असत. ते जेवावयाला कांहीं येत नसत, व शिधाही घेत नसत. इतकेंच नव्हे, तर जणूं काय रामभटजींचें सत्व पाहण्याकरितांच त्यांनीं अवतार घेतला होता ह्मटलें तरी चालेल. कारण, त्यांस रामभटजींचे चिरंजीव प्रत्यहीं भोजनाच्या समयीं ते असतील तेथें ताट वाढून नेत. पण त्यांनीं कधीं एक दिवस सुखासमाधानानें भोजन केलें नाहीं. ते त्या अन्नाला कांहींतरीं नांवें ठेवीत; फुगून बसत; किंवा ताट वाट्या फेंकून देत. पण ब्रह्मचारी बोवांची समजी होऊन जेवल्याची वर्दी आल्याशिवाय रामभटजी स्वतः कधीं जेवावयाला बसत नसत, असा त्यांचा बाणा असे. इतका त्रास केवळ परोपकारार्थ सोसणारा एकतरी प्राणी भिड्यांवांचून जगांत असेल काय? इतकेंच नव्हे, तर कोणी आजारी असलातर त्यांस घरच्या पेक्षांही अधिक काळजीनें औषधपाणी द्यावयाचें! त्या वेळीं तेथील कडक थंडीमुळें आमच्या मनस्वी पोटांत दुखत असे. तर रात्रौ भटजींनीं ३।४ वेळ चौकशी करावयाची व पोटांतलें थांबलें कां? असें विचारावयाचें. नाहीं असें ह्मटलें तर रात्रीं उठून आपल्या कुटुंबाकडून लगेच दुसरें औषध तयार करून द्याव-याचें! बरें ही इतकी झीज एकएकट्याकरितां सोसलीतर असो एक. परंतु कधीं कधींतर रामभटजींच्या घरीं सहकुटुंब सहपरिवार मंडळी येऊन राहतात. आणि त्यांची सुद्धां तरतूद अगदीं नेहमींप्रमाणें होते. आह्मी शृंगेरीस जाण्याच्या पूर्वीं

नुकतेंच तेथें सरवेचें काम चालू असतांना ३०।४० मोजणीदार सहकुटुंब तेथें ३।४ महिने राहिले होते! आणि ते सर्व आपल्या मुलांबाळांसह भिड्यांचे येथेंच जेवणखाण करीत होते. त्यांची सर्व बरदास्त भिड्यांकडून नित्यक्रमाप्रमाणें होई. त्यांतील एकानेंही ३।४ महिन्यांत चूल ह्मणून कधीं पेटविली नाहीं! ही किती आश्चर्याची गोष्ट आहे? आपल्यास एक पाहुणा आला व तो दोन दिवस अधिक राहिला, तर किती अडचण वाटते व केवढें जड पडतें हें तुटपुंजा संसारिक मनुष्याचा अनुभवांतीलच आहे. असें असतां कुटुंबेंच्या कुटुंबें कैक महिने शांतपणानें आणि उत्सुकतेनें पोसणें ही पुण्याई केवढी जबरदस्त! आणि ह्यावरून **'परोपकाराय सतां विभूतयः'** हें वाक्य भिड्यांच्या संबंधानें अगदीं बरोबर लागू पडतें. घरांतील मुख्य यजमानाला एखादी गोष्ट आवडणें साहाजिकच आहे. पण अशी सर्वांच्या व रोज रोज नव्या लोकांच्या उठाठेवीची घरांतील इतर मनुष्यांस कां आवड असावी? त्यांच्या तरी कपाळास आठ्या कां पडूं नयेत? परंतु चमत्कार हा कीं, **"यथा बीजं तथांकुरः"** ह्या संस्कृत ह्मणीप्रमाणें रामभटजींच्या घरांतील प्रत्येक मनुष्यास अतिथीचा आदरसत्कार करण्यांत मोठें भूषण, आनंद व उत्सुकता वाटते. त्यांचीं चाकरमाणसेंही बरींच आहेत, तथापि त्यांपैकीं बहुतेक नदीच्या पलीकडे जें त्यांचें घर व शेती आहे तिकडेच गुंतलेलीं असतात. घरांत गडी एखाद दुसराच असतो. तो एवढ्या रामरगाड्यांत कोठें कोठें ह्मणून पुरणार? ह्यास्तव हांतरुणें घालणें औषधपाणी देणें वगैरें कामें सुद्धां त्यांच्या लेंकी व सुनांवर पडतें. पण तीं तीं सर्व कामें अगदीं आपल्या एखाद्या घरच्या माणसांप्रमाणें करीत असत. फार काय सांगावें! रामभटजींच्या घरांतील प्रत्येक मनुष्य केवळ सात्विक व मधुर भाषण करणारें आहे. ह्यावरून खरोखर **"धन्यो गृहस्थाश्रमः"** असा एक त्याच महात्म्याचा! कोणी मनुष्य कितीही दिवस राहो; त्यास आपण कधीं जाणार? कां किती दिवस राहणार? हा प्रश्नच कधीं व्हावयाचा नाहीं. इतकेंच नव्हे, तर उलट तो निघाला ह्मणजे भिड्यांच्या घरांतील प्रत्येक मनुष्यास, आपल्याच घरांतील एक मनुष्य जाऊं लागल्या प्रमाणें वाईट वाटतें. इतकीं त्या कुटुंबांतील प्रत्येक मनुष्याचीं मनें तयार झालेलीं आहेत.

फार दिवस कोणी राहिला व जातांना त्यांस प्रत्यक्षच नव्हे, पण इतर रूपानें कांहीं देऊं लागला तर, त्यांच्या घरांतील कोणी लहान मूलसुद्धां त्यास शिवणार नाहीं. मग तुह्मी त्यांस पाहिजे तितका आग्रह करा कीं काय पाहिजे तें करा. आह्मी सुमारें महिना दीड महिना त्यांच्या घरांत मोठ्या आनंदानें होतों, व निघालों तेव्हां रामभटजींनीं स्वतः असे उद्गार काढले कीं येतांनां गाडी भाड्याची असल्यामुळें तुमचे पावसांत फार हाल झाले. याकरितां आज भाड्याची गाडी करूं नये. तर मी आपली घरची गाडी देतों, व आमचा मुलगा स्टेशनपर्यंत पोंचविण्यास देतों. असें ह्मणून आह्मी नको नको ह्मणत असतांही त्यानीं आपले घरचे हत्तीसारखे बैल जोडलेली गाडी व धाकटा मुलगा राजश्री सुब्राव भटजी यांस बरोबर देऊन दोन दिवसांच्या वाटेवर असलेल्या बिरूर स्टेशनांत पोंचतें केलें. केवढा हा परोपकार; केवढी सदयता आणि दुसऱ्याकरितां झीज सोसण्याची किती हौस ! धन्य धन्य त्या पुरुषाची ? भिड्यांच्या घरांतील मनुष्यें सर्व कानडी भाषाच बोलणारीं आहेत. त्यांना मराठी भाषा तितकीशी चांगली येत नाहीं. परंतु रामभटजी स्वतः मराठी भाषेंत फारच निष्णात आहेत. आपल्या महाराष्ट्रांतील सातारा जिल्ह्यापैकीं मायणी येथील श्रीमान् गृहस्थ भाऊसाहेब गरवारे ह्यांच्यावर सुमारें ४०।४५ वर्षा पूर्वीं एक धर्मसंबंधी मोठा खटला झाला होता. व कित्येक दिवस त्याचा न्याय कऱ्हाड मुक्कामीं **श्रीमज्जगद्गुरू** करवीरस्थ स्वामींपुढें चालला होता. ही गोष्ट पुष्कळांच्या पाहाण्यांतली व निदान ऐकण्यांतली तरी असेलच. त्याचें मूळ असें होतें कीं, भाऊसाहेब गरवारे यांस बहुत दिवस संतती नव्हती व ते बरेच चांगले श्रीमान् होते. "ह्यास्तव त्यांच्या कुटुंबानें पोटावर चिंध्या वगैरे घालून गरोदरपणाचें ढोंग करून कऱ्हाडाशेजारीं **सैदापूर** ह्मणून एक गांव आहे, तेथील एका पाटलाचा मुलगा उपजतांच तो आणून आपला ह्मणून वाढविला. ह्यास्तव तो मुलगा शूद्राचा असतां घरीं वाढविला. हा त्यांच्याकडून मोठा अधर्म घडला." असा त्यांच्यावर आरोप होता. व फिर्यादीतर्फेकडे प्रसिद्ध राजश्री श्रीमंत पंतप्रतिनिधी श्रीनिवासराव हे प्रमुख होते. त्यामुळें ह्या खटल्याला फारच मोठें स्वरूप आलें, व कऱ्हाड येथें फिर्या-

दीतर्फे ह्मणून जे कोणी साक्षीदार ह्मणून पुढें येत त्यांस श्रीमंतांकडून तूप-साखरेचा शिधा मिळत असे असें सांगतात. पण ह्या खटल्यांतील एक चमत्कार ध्यांनांत ठेवण्यासारखा होता. तो हा कीं, हा मुलगा मोठा झाला होता; त्याची मुंज झाली होती; इतकेंच नव्हेतर त्याचें लग्नही झालें होतें. असें असतां इतके दिवस ही सर्व मंडळी स्वस्थ होती. आणि इतकें झाल्यानंतर खटला उपस्थित करण्याचें सुचलें. असो. अशा प्रकारें हा खटला धुमसून धुमसून **करवीर** किंवा **संकेश्वर** मठाधिपतींनीं **गरवारे** ह्यांच्या विरुद्ध निकाल दिला आणि भाऊसाहेब गरवारे ह्यांस सहकुटुंब ब्राह्मणजातींतून काढून टाकल्याचें प्रसिद्ध आज्ञापत्र दिलें. तेव्हां भाऊसाहेब हे शृंगेरी मठाधिपतीकडे गेले. त्या वेळीं शृंगेरीचे मठाधिपति हल्लींचे स्वामी नसून त्यांचे गुरुस्वामी होते. व त्या वेळेस वेदशा० सं० राजश्री रामभटजी भिडे हे त्यांचे कारभारी होते. ह्यास्तव त्या खटल्याची शृंगेरीस पुन्हां तपासणी झाली, व पूर्वींच्या ठरावांतील सर्व कागदपत्र पाहून फिर्यादीतर्फेच्या साक्षी केवळ द्वेषमूलक आहेत व त्यांच्या बोलण्यास पूर्वापार संबंध नाहीं इत्यादि निकाल करून अखेर श्रींनीं मुलगा प्रत्यक्ष पाहतां पितृमुखी असल्याची खात्री झाल्यावरून त्यांस दोषरूप प्रायश्चित्त देऊन ब्राह्मणज्ञातींत कायम ठेवल्याचें आज्ञापत्र दिलें. एका कुटुंबास वंशपरंपरेनें ब्राह्मणज्ञातीस मुकविल्याचें श्रेय घेण्यापेक्षां त्यास ब्राह्मणज्ञातींत घेण्याचें पुण्य केवढें मोठें आहे, हें सांगणें नकोच. तेव्हां यांत अधिक दूरदर्शीपणा कोणता ह्याचा विचार वाचकांनींच करावा. हा जो शृंगेरीचा ठराव आहे, तो सर्व महाराष्ट्र भाषेंतच असून त्याचें बरेंच मोठें पुस्तक झालें आहे. त्यांत साधकबाधक प्रमाणें फार मार्मिकपणानें दिलेलीं आहेत. हा सर्व ठराव राजश्री रामभटजी भिडे ह्यांनी स्वतः लिहिलेला आहे. तो वाचला ह्मणजे रा० भिडे ह्यांच्या मराठी भाषेच्या मार्मिकपणाची व न्याय करण्याच्या हातोटीची उत्तम साक्ष पटते. अस्तु. अशा स्नानसंध्याशीळ, सत्वस्थ, व परोपकारी गृहस्थाचा महिना दीडमहिना सहवास झाल्यानंतर आह्मीं श्रीकडून मिळालेल्या महावस्त्राचा वगैरे प्रसाद घेऊन निघालों. व भिडे ह्यांस विनयपूर्वक सद्गदित अंतःकरणानें ह्मटलें कीं "महाराज!

आपण थोर महात्मे आहांत. आपलें वर्णन आपल्या तोंडावर मी काय करूं? माझ्या अंत:करणास जें काय वाटतें आहे तें मला व्यक्त करण्याचें सामर्थ्य नाहीं. आपले मजवर एवढे उपकार झाले आहेत कीं त्यांची फेड होणें शक्य नाहीं. पण त्याची अल्प स्वल्प फेड होण्याचा जरी प्रसंग आला, तरी माझ्या जन्माचें मोठें सार्थक झालें असें मी समजेन." त्यावर रामभटजी ह्मणाले कीं " कृष्णराव! ह्यांत उपकार कसले? ईश्वरकृपेनें चार लोक मजकडे येतात तसे आपणही आलांत. मीं आपल्यासाठीं अधिक तें काय केलें? आतां जर कांहीं आपल्यास माझे उपकार झाले असेंच वाटत असेल, तर माझी एक थोडीशी कामगिरी आपल्याकडे आहे. ती आपण कराल तर मजवर आपलेही उपकार होतील." तेव्हां आह्मी मोठ्या आनंदानें सांगितलें कीं "अवश्य करीन. आपण सांगावें." त्यावर रामभटजी ह्मणाले आपण महाराष्ट्रांत राहतां. तेव्हां आपण तिकडील लोकांस माझी अशी विनंती कळवावी कीं, "मी एक भट भिक्षुक महाराष्ट्रांत राहणारा असून सांप्रत कर्नाटकी बनलों आहें. तिकडे माझी फारशी कोणाशीं ओळख नाहीं. याकरितां कधीं कोणास शृंगेरीस यावयाचें झालें तर, माझ्या घरीं येऊन असेल तो मीठभात खाऊन चार दिवस राहून माझें घर पुनीत करावें. एवढा निरोप आपण आपल्या महाराष्ट्रीयांस कळवावा. ह्मणजे झालें." हा निरोप ऐकून आमचें अंतःकरण किती सद्गदित झालें असेल त्याची कल्पना वाचकांनींच करावी. कारण तें सर्व शब्दांनीं सांगणें केवळ अशक्य होय. रामभटजींस त्यांच्या मागें वे० शा० राजश्री **नागभूषणभट्ट** व **सुब्रायभट्ट** असे दोन चिरंजीव आहेत व तेही मोठे सुशील आहेत. बहुत दिवसांत तिकडील समाचार कळला नसल्यामुळें आतां त्यांचें कसें काय आहे, हें समजण्यास मार्ग नाहीं. तथापि रामभटजींस पुढें कांहीं दिवसांनीं अर्धांगवायु झाल्याचें आह्मांस समजलें. अशा पुण्यवान् महात्म्यालाही दैवयोगानें सोडूं नये, ही मोठी शोचनीय गोष्ट होय.

५० **श्रीशिवगंगामठाचे अधिपति**—पद्मपाद तीर्थयात्रेस निघाले असतां, त्यांस मध्यंतरीं कर्नाटक प्रांतांत 'पुंडरीकपुरी' ह्मणून शहर लागल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे व तेथील शिवगंगा तीर्थाचें थोडेसें माहात्म्यही वर्णन केलेलें आहे.

तेथेंच आचार्यांच्या श्रीशिवगंगामठाची स्थापना केलेली आहे. ही स्थापना मूळ शंकराचार्यांची नसावी असें वाटतें. सुरेश्वराचार्य, किंवा त्यांच्या मागून स्थानापन्न झालेले त्यांचे शिष्य, ह्यांच्या पैकीं कोणीतरी केलेली असावी. श्रीशिवगंगामठ ही शृंगेरीमठाची शाखा होय. शृंगेरीमठांतील स्वामीपाशीं जे शिष्य लहानपणापासून विरक्त होऊन अध्यापन करीत असतात त्यांपैकींच एखादा शिष्य ह्या मठांतील अधिकारी होत असतो. हल्लींच्या श्रीशिवगंगा मठाधिपतीचें नांव " **श्रीसुब्रह्मण्याभिनवसच्चिदानंदभारतीस्वामी** " असें आहे. आह्मी श्रीशृंगेरीस श्रीच्या दर्शनास गेलों होतों, तेव्हां हे अगदीं बालवयाचे असून गुरूस्वामीपाशीं पढत होते. व तेच पुढें संन्यास दीक्षा घेऊन श्रीशिवगंगामठाचे अधिपति झाले. ह्या मठाधिपतींची स्वारी देशसंचार करित करित श्रीमहायात्रेस जाऊन तेथून फिरत फिरत श्रीक्षेत्र नासिक वगैरे करून मुंबईहून पनवेलीस येऊन आह्मां सर्वांस दर्शनाचा व प्रसादाचा लाभ मिळाला होता. ह्यांचें वय पस्तिसीचे सुमाराचें असून त्यांची वैराग्यनिष्ठा, विद्वत्ता, वक्तृत्वशक्ति, व वेदांताचें अंग हीं फारच प्रशंसनीय आहेत. ह्यांचा स्वभावही अत्यंत गंभीर, शांत, असा त्या श्रेष्ठ स्थानास शोभेसा आहे. ह्यांची संस्कृत भाषा उत्तम आहे. मराठी भाषाही चांगली येते. त्यांनीं या प्रांतांत जें प्रवचन केलें तें मराठी भाषेंतच केलें. पण क्वचित् स्थळीं त्यांस मराठी शब्द नडे. पण ते तत्काल हिंदुस्थानी शब्द घालून लोकांस नीट समजावून देत. त्यांची वाणी अगदीं अस्खलित होती. त्यांनीं निरनिराळ्या सिद्धांतांवर केलेलीं प्रवचनें, व उपदेश केरळकोकिळमधून २०।२१व्या वर्षामध्यें सारांशरूपानें दिलाच आहे. श्रींना मराठी भाषा समजते तर उत्तमच. आह्मीं लिहिलेलें श्रीसमर्थ रामदासस्वामींचें चरित्र त्यांना फार आवडलें. श्रीची स्वारी पनवेली मुक्कामीं असतांना तें चरित्र आमच्याकडून त्यांनीं मुद्दाम वाचविलें; इतकेंच नव्हे, तर आपल्या वडिलांकडून त्यांनीं त्याचें कानडी भाषांतर करून तें हल्लीं छापत आहे. ह्याशिवाय, आमची सार्थ व सटीप ज्ञानेश्वरी, सार्थ सटीप दासबोध, गीतापद्यमुक्ताहार वगैरे ग्रंथही त्यांनीं फार लक्ष्यपूर्वक श्रवण केले. व श्रीची स्वारी पनवेलीहून जातांना त्यांनीं आमचे परम

मित्र प्रसिद्ध **वे. रा. रा. विष्णु कृष्ण पुराणिक** श्रीधूतपापेश्वर आरोग्य-मंदिराचे प्रतिनिधि **पनवेल** ह्यांस "**भिषग्वर्यचूडामणी**" व आह्मांस "**महाराष्ट्रभाषाचित्रमयूर**" ह्या पदवीदर्शक अनुग्रहपत्रिका प्रसाद ह्मणून सभेमध्यें सादर केल्या. त्यांची नक्कल या पुस्तकास जोडली आहे.

श्रीची स्वारी पनवेलीहून निघाल्यानंतर देशसंचार करित करित श्रीरामेश्वरीं जाऊन तेथून दक्षिणहैद्राबादेस गेली व पहिली चातुर्मास्यदीक्षा तेथें घेतली व तसाच देशसंचार आद्याप चालू आहे. श्रीची स्वारी श्रीशिवगंगामठास अद्याप गेली नाहीं. यंदांची चातुर्मास्यदीक्षा **पांडेचरी-फ्रेंच इंडिया** येथेंच होती. आमच्यावर श्रीची फार कृपा आहे. त्यामुळें स्मरणपूर्वक वेळोवेळां अनुज्ञापत्र येत असतें. त्याप्रमाणें नुकतेंच आलेलें अनुग्रहपत्र येथें दाखल करितों. ह्मणजे त्यावरून श्रीचें अंतःकरण किती सदय आहे त्याची कल्पना होईल.

| | | |
|---|---|---|
| क्रमांक<br>३४९ | संस्थानाचा शिक्का. | श्रीसंस्थानाचा मुक्काम<br>**पांडेचरी फ्रेंच इंडिया.** |

मिति निज श्रावण शु॥ १ सोमवार
शके १८३१.

**श्रीमत्परमहंसपरिव्राजचार्य** इ. इ. इ. इ. इ.

अस्मदत्यंतप्रिय मुख्यशिष्य रा. रा. **कृष्णाजी नारायण आठल्ये "महाराष्ट्रभाषाचित्रमयूर" पनवेल** विषये:—श्रीस्वारीसंचारक्रमेण श्रीमहाक्षेत्र रामेश्वर, कुंभकोण कमलालया चिंदबरेत्यादि यात्रा आटपून पूर्व समुद्रतीरीं असणाऱ्या पांडीचरी येथें एतद्वार्षिक चातुर्मास्यदीक्षासंकल्प करून श्रीशारदाचंद्रमौळीश्वरनिकट आपली श्रेयःप्रार्थना करित निरंतर तपोनिरत आहे. तरी तत्रस्थ कुशल कळवून स्वकीय लेखनीं मानस संतोषवित असलें पाहिजे. याविषयीं

आपणासारख्या मठाभिमानी भक्तिश्रद्धाळु सत्पुरुषास विशेष लिहिणें तें काय इत्येषा प्रेमपूर्वीका नारायणस्मृतिः—



( सही )
शिक्का.

ह्या मठाधिपतीवर म्हैसूरचे श्रीमन्महाराज यांचाही फार लोभ आहे. यांचे मठांत स्थापन करण्याकरितां त्यांनीं मुद्दाम जयपूरच्या एका उत्तम कारागिराकडून **'श्रीशारदाअंबेची'** संगमरवरी पाषाणाची मूर्ति तयार करविली आहे. तिचा फोटो महाराजांकडून श्रीकडे पनवेलीसच येऊन पोंहचला होता. त्यावरून ती मूर्ति फारच रमणीय झाली असल्याचें दिसून येतें. श्रीची स्वारी शिवगंगामठास पोहोंचतांच तेथें श्रीशारदाअंबेच्या प्रतिष्ठापनेचा मोठा समारंभ होणार आहे. व त्यास येण्याबद्दल श्रींनीं आह्मांस आग्रहपूर्वक आज्ञा केली आहे. असो. काय योगायोग असेल तो खरा.

५१ **कुडलगी मठाचा इतिहास**—कुडलगी व संकेश्वर हे दोन्ही मठ मूळ आचार्यांनीं स्थापन केलेले नव्हते. मागून झालेल्या शृंगेरीमठाधिपतींनींच ते स्थापन केले आहेत. त्याचा वृत्तांत असा. आद्य श्रीमच्छंकराचार्यांनीं शृंगेरी मठावर पहिली नेमणूक मंडणपंडितांनां दीक्षा दिल्यानंतर **सुरेश्वराचार्य** ह्यानांवानें केली होती. त्यानंतर त्यांच्या पाठीमागून अनेक शिष्य झाले. त्या परंपरेंत एक **विश्वरूपाचार्य** म्हणून होते; त्यांनीं आपल्या पश्चात् एका शिष्यास **शंकरभारती** किंवा **शंकरतनय** हें नांव देऊन त्या मठाचे आधिपति केलें. ह्यांनां 'देवगोसावी' असेंही म्हणत असत. हे शके १४४२ च्या सुमारास **श्रीक्षेत्रकाशीयात्रेला** निघाले. व आद्य श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य ह्यांचे गुरु **गोविंदभगवत्पादपूज्य** ह्यांची गुहा पाहण्यासाठीं **हिमालय** पर्वतावर गेले. व बरोबरचे हत्ती, घोडे, शिष्य वगैरे सर्व सरंजाम हिमालयाच्या पायथ्याशींच ठेवून आपल्या कारभारी वगैरे मंडळीस आज्ञा केली कीं, मी आमुक एक दिवसांत परत येईन; न आल्यास आपण सर्वांनीं [illegible] शिष्यांपैकीं [illegible] करून शृंगेरीला निघून जावें. ह्या गुरूंच्या आ-

ज्ञेप्रमाणें कारभाऱ्यांनीं व शिष्यांनीं त्यांची वाट पाहिली, परंतु निश्चित केलेल्या अवधींत स्वारी कांहीं परत आली नाहीं. तेव्हां त्यांच्या आज्ञेप्रमाणें त्यांनीं त्यांच्याच शिष्यांपैकीं एका शिष्यास गुरूचा अधिकार देऊन शृंगेरीला जाण्याकरितां निघाले. ते फिरत फिरत कुडलगीस येऊन राहिले. व आतां शृंगेरीस जाण्याकरीतां निघणार, इतक्यांत शंकरभारतिस्वामी ही मागांहून येऊन त्यांस मिळाले. व आपणही शृंगेरीस येतों असें म्हणूं लागले. परंतु कारभारी लोकांनीं त्यांस सांगितलें कीं, एक गुरु हयात असतां दुसरा गुरु करावयाचा नाहीं; असा ह्या मठाचा सांप्रदाय असून आपण त्या नियमाच्या विरुद्ध वागलां. ह्याकरितां आपल्यास आम्हीं शृंगेरीस येऊं देणार नाहीं. असें सांगून त्यांनीं स्थापन केलेल्या शिष्यांसह सर्व लवाजमा घेऊन ते शृंगेरीस निघून गेले. तेव्हां शंकरभारती स्वामी कुडलगीस राहून तेथेंच त्यांनीं एक नवीन मठ स्थापन केला. व तेथें एक नवीच गादी स्थापन करून तिच्यार एक नव्याच शिष्याची नेमणूक केली व निजामच्या मुलखांतून कांहीं गांवें इनाम मिळवून तीं त्या मठाच्या ताब्यांत दिलीं. हीच कुडलगीमठाची परंपरा होय.

५२ **संकेश्वरमठाची स्थापना**—कुडलगी मठाची स्थापना केल्यानंतर शंकरभारती स्वामी पुन्हां महायात्रेला निघाले, ते मार्गामध्यें संकेश्वराचे उत्तरेस वल्लभमड ह्मणून एक किल्ला आहे, तेथील हरिद्रानामक देवीच्या दर्शनास गेले. तेव्हां तेथें स्वामींस असा दृष्टांत झाला कीं, तुह्मीं संकेश्वरीं जाऊन शंकराची पूजा करावी. त्याप्रमाणें ते आचार्य संकेश्वरीं गेले व तेथें हिरण्यकेशी नदींतील शुक्रतीर्थामध्यें स्नान करून तेथील शंकराची पूजा करित असत. त्या काळीं विजापूरच्या बादशाहाचा वजीर हजरत इब्राईम क्यादल ह्याचा सरदार रणदुल्लाखान हा वाटेनें जात असतां ह्या स्वामींच्या दर्शनास गेला. व त्यांची वृत्ति पाहून त्यांचा तीर्थप्रसाद घेऊन त्यांस कांहीं गावें इनाम दिलीं, त्यामुळें तेथें संकेश्वरमठाची स्थापना झाली व पुढें त्याच मठाला कोल्हापूरसरकारनेंही कांहीं गांवें दिलीं; ह्मणून त्याच मठाला करवीरमठ असेंही ह्मणूं लागले. अशा रीतीनें शंकरभारतीस्वामी ह्यांनीं त्या कालच्या राजाच्या आश्रयानें मलप्रभेच्या उत्तरेपासून तों तहत काशीपर्यंत

आपला शिष्यसंबंधी सर्व हक्क चालू केला. ह्या गादीवर शिष्य बसावयाचा तो शंकरभारती स्वामींना ब्रह्मचारी कोणी मिळाला नाहीं ह्मणून त्यांनीं पूर्वीं गृहस्थाश्रम केलेला शिष्यच त्या गादीवर बसविला. त्यामुळें ह्या मठाची परंपरा अशीच चालत आहे. ह्मणजे पूर्वीं संसार करित असलेलाच एखादा विद्वान् व सदाचारी गृहस्थ ह्या गादीचे मठाधिपति करण्याची वहिवाट आहे. त्या गादीवर आजपर्यंत बहुतेक भिलवडीकर गृहस्थ बसत असत. परंतु हल्लीं मात्र ती वहिवाट बरीच मोडल्याचें दिसतें. कारण सन १९०० सालच्या सुमारापासून ह्या मठांत फुटाफुट होऊन दोन मठ झाल्यासारखें झालें आहे. संकेश्वरमठाचे पूर्वींचे अधिपति वृद्ध झाल्यामुळें त्यांनीं ब्रह्मनाळकर ह्मणून जे प्रसिद्ध हरिदास विद्वान् होते त्यांस शिष्य केलें व सर्व अधिकार त्यांच्या स्वाधीन केले. व ते देशसंचारार्थ निघाले. ह्याच वेळीं कोल्हापुरास वेदोक्ताचा वाद उपस्थित झाला होता. ह्मणजे मराठे वगैरे मंडळीचा आग्रह होता कीं आपल्या घरीं जीं जीं कर्मे ब्राह्मणांनीं करावयाचीं तीं वेदोक्त मंत्रांनीं करावींत, व तेथील राजोपाध्ये वगैरे ब्रह्मवृंदाचें असें मत होतें कीं तसें करण्याला शास्त्राधारहि नाहीं व आजपर्यंत वहिवाटही नाहीं. ह्यावरून कोल्हापुरचे महाराज वगैरे मराठी मंडळी फार हट्टास पेटली होती, व त्यांनीं राजोपाध्यायाची पूर्वींची चालत असलेली जहागीर जप्त केली, इतकेंच नव्हे, तर संकेश्वरमठाची इष्टेटही जप्तींत ठेविली. ती सुटावी ह्मणून ह्मणा किंवा अन्य कांहीं कारणांनीं ह्मणा हे संकेश्वरमठाचे नवीन स्वामी जे ब्रह्मनाळकर, त्यांनीं मराठ्यांच्या येथें वेदोक्त कर्म करण्यास हरकत नाहीं असें आज्ञापत्र काढलें, पण तें गुरुस्वामींच्या मनाविरुद्ध होतें. ह्यास्तव गुरुस्वामींनीं ह्या शिष्यस्वामीचा त्या कामीं अगदीं धिक्कार केला, इतकेंच नव्हे, तर संस्थानचा सर्व अधिकार काढून घेतल्याबद्दल आज्ञापत्रही काढलें. तेव्हां कोल्हापूर सरकारनें ब्रह्मनाळकर स्वामींचा पक्ष उचलून कोल्हापुरचें उत्पन्न त्यांजकडे दिलें, व तें हल्लीं त्याच गादीकडे चालत आहे. ब्रह्मनाळकर स्वामी समाधिस्थ झाले व त्यांनींही आपल्या गादीवर दुसरे शिष्य बसविले आहेत. संकेश्वर मठाचे पूर्वींचे अधिपति किंवा गुरुस्वामी ज्यांस नांव पडलें होतें त्यांनीं आपल्या पश्चात् मिरजकर ह्मणून दुसरे शिष्य

मठाधिपति केले. व तेही समाधिस्थ झाले. पण ह्या दुफळीमुळें आतां संकेश्वरमठ व करवीरमठ असे दोन मठ व दोन अधिपति झाले आहेत. ब्रह्मनाळकर स्वामीही मोठे योग्य, सदाचारी व विद्वान् असे होते. त्यांची स्वारी पुण्यास आली त्या वेळीं लोकमान्य टिळक वगैरेंनीं त्यांचा चांगला सत्कार केला. परंतु त्यांनीं वेदोक्ताचा पक्ष उचलल्यामुळें अखेर बहुजनसमाज त्यांच्या विरुद्ध झाला त्यास उपाय नाहीं. ह्या स्वामींचे पूर्वाश्रमींचे वडील चिरंजीव वेदशास्त्रसं० रा० रा० धोंडु अण्णा ऊर्फ धोंडशास्त्री हे फारच विद्वान् असून त्यांची संस्कृत भाषा केवळ करतलामलवत् आहे. ह्यांचा विद्याव्यासंग फारच दांडगा आहे. अलंकार वगैरे षट्शास्त्रांचें अध्ययन पुरें होत आलें आहे. त्यांच्या मनांतून मुंबईसारख्या ठिकाणीं एक संस्कृत शास्त्रशाळा काढावयाची आहे, व तींत षट्शास्त्रांचा अभ्यास किंवा निदान मूलतत्वें तरी तीन वर्षांत पुरीं करून द्यावयाचीं असा त्यांचा हेतु आहे. तेणेंकरून आतां जें प्रत्येक शास्त्र शिकण्यासाठीं निरनिराळ्या शास्त्र्याकडे अध्ययनास जावें लागतें, ती अडचण दूर होईल. असो. एकंदरींत संकेश्वरमठामध्यें दुफळी होऊन दोन विभाग झाले हें चांगलें झालें नाहीं; पण त्यास इलाज नाहीं. ईश्वरी इच्छा.

**५३ जगन्नाथाचा मठ**—ह्या मठाची हकिगत आह्मांस फारशी उपलब्ध नाहीं तथापि ऐकण्यांत असें आहे कीं तेथील मठाधिपतीच्या जाग्यावर कऱ्हाड्या ब्राह्मणाचीच नेमणूक होते, व असा जो कोणी पांथस्थ किंवा उतारू येईल त्यासच एकदम ती गादी देण्यांत येते.

**५४ द्वारकामठ**— हल्लींचे द्वारकामठाचे अधिपतिही अत्यंत योग्य असून जनहिताकडे त्यांचा अतिशय ओढा आहे. पंचांगसंशोधनासाठीं त्यांनीं पुष्कळच परिश्रम केले आहेत. ह्यांचें वास्तव्य मुंबापुरीमध्यें बरेच दिवस असून ते विद्वानांचेही फार चहाते आहेत.

**५५ बदरिकाश्रममठ**—हा हिमालयांत असल्यामुळें तेथील मठाधिपतीविषयीं तर आह्मांस माहिती मिळणें परम दुर्मिळ आहे. सदरहु मठाची माहिती कोणीं आह्मांस लिहून पाठविल्यास अत्यंत आभारपूर्वक पुढील आवृत्तींत दाखल करूं.

ह्याप्रमाणें आचार्यांनीं मूळ चार दिशेला चार मठ स्थापन केले. १ पहिला दक्षिणेस–**शृंगेरी**–ह्यावर सुरेश्वराचार्यांची नेमणूक केली. २ दुसरा पूर्वेस–**जगन्नाथ**–ह्यावर पद्मपादांची नेमणूक केली. ३ तिसरा पश्चिमेस–**द्वारका**–ह्यावर हस्तामलकांची नेमणूक केली. व ४ चवथा उत्तरेस–**बदरिकाश्रम**–ह्यावर तोटकाचार्यांची नेमणूक केली.

हे चार मठ मुख्य होत. ह्याशिवाय तीर्थ, आश्रम, वन, अरण्य, गिरि, पर्वत, सागर, सरस्वती, भारति, पुरी असे मठ पर्यायेंकरून ते चार मठांना वांटून दिले. ते असेः–

**शृंगेरीमठाला**–सरस्वति, भारति, आणि पुरी.

**जगन्नाथमठाला**–वन आणि अरण्य.

**द्वारकामठाला**–तीर्थ आणि आश्रम.

**बदरिकाश्रममठाला**–गिरी, पर्वत आणि सागर.

ह्याप्रमाणें अद्याप वहिवाट चालू आहे. ह्या संज्ञा त्या त्या मठाचे जे अधिपति होतात, त्यांच्या नांवापुढें लागतात. ह्या सर्व संज्ञा स्थानबोधक असल्यामुळें त्या त्या स्थानाचा अधिकार त्या त्या संज्ञा धारण करणारांनीं चालवावा असें अनुमान निघतें.

५६ **आनंदगिरीवर प्रसाद**—आचार्यांजवळ बहुत शिष्य जमले होते. त्यांत एक गिरी म्हणून शिष्य होता. तो नेहमीं आचार्यांच्या सन्निध राहून त्यांची सेवा करित असे. त्यांना स्नानाला उदक देणें, त्यांच्या छाट्या धुणें, त्यांची पूजेची तयारी करणें वगैरे त्यांचीं स्वतःचीं कामें तो करित असे. त्यामुळें त्याची भक्ति पाहून आचार्यांचीही त्याच्यावर मोठी कृपा असे. एके वेळेस पद्मपाद आदिकरून सर्व शिष्य पाठ घेण्याकरितां बसले असतां, तो गिरीनामक शिष्य आचार्यांची छाटी धुण्याकरितां नदीवर गेला होता. त्याला थोडा उशिर लागला. तेव्हां आचार्य बोलले कीं, "जरा थांबा. इतक्यांत गिरी येईल." तेव्हां पद्मपाद म्हणाले "तो कशाला ? त्याला काय समजतें आहे ? तो असला काय आणि नसला काय सारखाच." तेव्हां आचार्यांनीं विचार केला कीं, ह्यांना आपल्या

ज्ञानाचा गर्व झालेला आहे; तो दूर केला पाहिजे. असें मनांत जाणून तो नदीवरून परत आल्यानंतर त्याला मनानेंच उपदेश केला व कृपा करितांच त्याला सर्व विद्या लागल्याच अवगत झाल्या. नंतर त्यानें आचार्यांची धुऊन आणलेली छाटी नेमलेल्या ठिकाणीं वाळत घालून तो आचार्य बसले होते त्यांच्या सन्निध येऊन त्यानें त्यांस वंदन केलें. आणि तोटकवृत्तानें आचार्यांचा स्तव करून सर्व उपनिषद्भागाचें प्रतिपादन केलें तें असेंः—

भगवन्नुदधौ मृतिजन्मजले सुखदुःखझषे पतितं व्यथितं ॥
कृपया शरणागतमुद्धर मामनुशाध्युपसन्नमनन्यगतिम् ॥ १ ॥
विनिवर्त्य रतिं विषये विषमां परिमुच्य शरीरनिबद्धमतिम् ॥
परमात्मपदे भव नित्यरतो जहि मोहमयं भ्रममात्ममते ॥ २ ॥
विसृजान्नमयादिषु पञ्चसु तामयमस्मि ममेति मतिं सततम् ॥
दृशिरूपमनन्तमजं विगुणं हृदयस्थमवेहि सदाहमिति ॥ ३ ॥
जलभेदकृता बहुतेव रवेर्घटिकादिगता नभसोऽपि यथा ॥
मतिभेदकृता नु तथा बहुता तव बुद्धिदृशो विकृतस्य सदा ॥ ४ ॥
दिनकृत्प्रभया सदृशेन सदा जनवित्तगतं सकलं स्वचिता ॥
विदितं भवता विकृतेन सदा यत एव मतोसि सदेव सदा ॥ ५ ॥

अर्थ—ज्यामध्यें सुखदुःखरूप मत्स्य भरलेले आहेत, अशा जन्ममरणरूप समुद्रामध्यें पडून कुचमणारा जो मी, तो अनन्यगतिक असून आपल्या सन्निध आपल्यास शरण आलों आहें; तरी आपण कृपा करून उपदेशानें माझा उद्धार करावा. १ हे आत्मबुद्धे! विषयाच्या ठिकाणीं असलेलें माझें प्रेम दूर करून देह-बुद्धिचा नाश कर. तूं परमपदाच्या ठिकाणीं रममाण होऊन मोहमय भ्रम लयास ने. २ अन्नमयादि पंच कोशांमध्यें जी अहंबुद्धि आहे, ती सोडून हृदयस्थ जें षड्गुणैश्वर्य निर्गुण परब्रह्म तोच मी हें ध्यानांत धर. ३ जलामध्यें प्रतिबिंबित झालेल्या सूर्याचें अनेकत्व जसें मिथ्या, किंवा घटाकाश व मठाकाश हीं जरीं भिन्न अशीं भासलीं तरी एकरूपच; त्याचप्रमाणें चैतन्यामध्यें जो भेद दिसतो तोही मिथ्या होय. ४ सूर्यप्रकाशाप्रमाणें जनाच्या सर्वस्वास व्यापणारें आपल्या चैतन्यानें सर्वांस प्रकाशित करणारें, जें सत्ब्रह्म, तेंच सदा सर्वकाल तूं आहेस हें लक्ष्यांत ठेव. ५

गिरीचें हें काव्य ऐकून सर्व शिष्यांना अतिशयच विस्मय वाटला. कारण, ज्याला कांहींएक समजत नव्हतें, त्यानें उपनिषद्भागाच्या अर्थाचें प्रतिपादन करणें ह्मणजे केवळ गुरुकृपाच समजली पाहिजे. त्याची ती प्रसादवाणी श्रवण करून पद्मपाद आदिकरून शिष्यांना जो गर्व झाला होता, तो आपोआप नष्ट झाला. नंतर तोटकवृत्तानें आत्मवृत्त कथन केल्यामुळें पुढें त्याचें नांव **'तोटकाचार्य'** असेंच प्रसिद्ध होऊन आचार्यांच्या मुख्य शिष्यांत त्याची गणना झाली.

**५७ आचार्यांचें शिष्यचतुष्टय**—आचार्यांचे शिष्य अनेक होते. पण त्यांत चारच प्रमुख असत. ते पद्मपाद, सुरेश्वराचार्य, हस्तामलक आणि तोटकाचार्य. हे शिष्य इतके विद्वान्, इतके बुद्धिवान् व इतके भक्तिमान् होते कीं, सारे लोक त्यांस हे चार शिष्य ह्मणजे धर्म, अर्थ, काम व मोक्षच आहेत असें ह्मणत. किंवा हे ऋक्, यजुः, साम, अथर्व, असे चार वेद आहेत; किंवा सलोकता, समीपता, सरूपता, व सायुज्यता ह्या चार मुक्तिच आहेत कीं काय ? अथवा हीं चार ब्रह्मदेवाचीं मुखेंच आहेत कीं काय ? असें ह्मणत असत. अशा प्रकारच्या त्या चार शिष्यांसह आचार्य तेथें ब्रह्मविद्येचा उपदेश करित आनंदानें राहिले.

**५८ सुरेश्वराचार्यास वार्तिकें करण्याची आज्ञा**—एकदां आचार्य एकांतस्थलीं बसले असतां, सुरेश्वराचार्य बोलले कीं, "महाराज ! अधिकारानुरूप ह्या शिष्याला कांहीं आज्ञा व्हावी. कारण, शिष्यानें गुरुभक्ति केली तरच त्याच्या जन्माचें सार्थक; नाहींतर त्याचें जीवित केवळ व्यर्थ होय. ह्याप्रमाणें भाषण श्रवण करून आचार्य बोलले कीं; "माझ्या भाष्यावर 'वार्तिक' ( टीकारूप व्याख्यान ) करावें." तेव्हां सुरेश्वराचार्य बोलले कीं, "महाराज ! अनेक तर्कांनीं युक्त असें जें आपलें भाष्य, तें केवळ अवलोकन करण्यासही मी समर्थ नाहीं, मग त्यावर वार्तिक करणें तर दूरच आहे. तथापि आपल्या कृपाकटाक्षानें यथामति निबंधन करितों." ह्याप्रमाणें गुरूची आज्ञा सिरसा मान्य करून तेथून उठून आपल्या स्थानीं गेले.

**५९ इतर शिष्यांचे आक्षेप**—आचार्यांनीं आपल्या भाष्यावर वार्तिक करण्याविषयीं सुरेश्वराचार्यांना आज्ञा केली, हें वर्तमान इतर शिष्यांस कळतांच पद्मपाद

आदीकरून शिष्य आचार्योंकडे येऊन त्यांनीं प्रार्थना केली कीं, "महाराज! आपण सुरेश्वराला आपल्या भाष्यावर वार्तिक करण्याविषयीं आज्ञा केली खरी; परंतु तेणेंकरून आपला हेतु तडीस न जातां उलट तें सर्वांस बाधक मात्र होईल. कारण, हा पूर्वींचा कर्ममार्गी मंडणपंडित ह्या नांवानें जगजाहिर होता. सांप्रत आपण त्यास जिंकल्यामुळेंच तो आपला शिष्य होऊन अद्वैतमार्गी बनला आहे. ह्याकरितां त्यानें जर वार्तिक केलें, तर तो कर्ममार्गाकडे वळेल. कारण आजन्म त्यानें कर्मच केलेलें आहे. तेव्हां "जित्याचा स्वभाव मेल्याशिवाय जावयाचा नाहीं" अशी ह्मणच आहे; आणि तसें झालें ह्मणजे आपला सिद्धांत एका बाजूसच राहील. ह्मणून त्याच्याकडून आपण वार्तिक करवूं नये. तर ह्या पद्मपादाकडून तें काम करवावें. तो त्यास योग्य आहे. कारण, त्यानें ब्रह्मचर्य धारण करून बाल्यदशेंतच अद्वैत सिद्धांताचें ज्ञान करून घेतलें आणि तेव्हां-पासूनच आपलें शिष्यत्व पतकरलें आहे, आपल्या ठिकाणीं त्याची परिपूर्ण भक्ति आहे; आणि त्यास आपलें सान्निध्य बहुत घडलें असल्यामुळें, आपल्या सिद्धांताचें रहस्य त्याला फार उत्कृष्ट अवगत आहे. शिवाय, आपण एकदां गंगेच्या पलीकडे जाऊन सर्व शिष्यांस बोलाविलें. तेव्हां आह्मी बाकीचे शिष्य पलीकडे जाण्याकरितां नौकादिक साधनें शोधूं लागलों. परंतु पद्मपादानें तसें न करितां गुरूच्या चरणीं एकनिष्ठा ठेऊन तो तसाच समोर गंगेंतून निघाला. तेव्हां तो जेथें पाय ठेवी, तेथें तेथं सुवर्णाचें कमल उत्पन्न होऊन गंगा उतरून पार निघून गेला. तेव्हां आपण कृपाळु होऊन त्याचें नांव सनंदन असतां पद्मपाद असें ठेविलें. इतका तो समर्थ आहे. तेव्हां आपल्या कृपेनें वार्तिक करण्याविषयीं हाच योग्य होईल. किंवा आनंदगिरीही निबंधन करूं शकेल. कारण, त्यांच्या तपोबलानें त्यांना साक्षात् श्रीसरस्वति प्रसन्न आहे. व तिनें आपल्या अभिप्राया-प्रमाणें व्याख्यान करण्याविषयीं वरही दिलेला आहे. तेव्हां कर्मच करणारा जो विश्वरूप ह्मणजे सुरेश्वराचार्य, त्याजकडून वार्तिक न करवितां तें पद्मपादा-कडून किंवा आनंदगिरीकडून करवावें. असें सर्व बोलत आहेत तों पद्मपाद ह्मणाले, " नाहींतर, महाराज! हा हस्तामलकही आपल्या भाष्यावर वार्तिक

करूं शकेल. कारण, त्याच्या हातामध्यें आमली फलाप्रमाणें अद्वैत सिद्धांतांचें तत्त्व असल्यामुळेंच आपण त्याचें नांव हस्तामलक असें ठेविलें आहे. त्यास आज्ञा व्हावी. ”

या प्रकारें शिष्यांचीं भाषणें ऐकून आचार्य बोलले कीं, “ ह्या हस्तामलका-प्रमाणें दुसरा कोणी निपुण नाहीं ही गोष्ट खरी आहे. तथापि ह्याला बाह्य-प्रवृत्ति माहित नाहींत. ह्यानें वेदपठण केलेलें नाहीं. गुरूनें उपनयन मात्र केलें. पण पुढें वेदाचें अध्ययन झालेलें नाहीं. हा कोणाबरोबर खेळेना; कोणाशीं बोलेना; ह्मणून ह्याला ह्याच्या बापानें माझ्याकडे आणिलें. आह्माला पाहतांच हा नमस्कार करून पुढें उभा राहिला. हा चमत्कारिक मुलगा पाहून तेथील सार्‍याच लोकांना आश्चर्य वाटलें. नंतर मी ह्याला “ तूं कोण आहेस ?” असा प्रश्न करितांच “ मी सच्चिदानंदघनस्वरूपी आहें. ” असें ह्यानें उत्तर दिलें. तेव्हां ती पुत्राची अपूर्व वाणी श्रवण करून ह्याच्या बापासही फार आनंद झाला. आणि तो मला ह्मणाला “ महाराज! तर मग हा कोणी तरी ज्ञानी असून आपलाच शिष्य आहे असें वाटतें. ह्याकरितां त्याला आपल्या बरोबरच न्यावा. ” ह्मणून ह्याला मी बरोबर घेतला व तेव्हांपासून हा माझ्या जवळच आहे. आतां तो जरी सर्व शास्त्रांत निष्णात आहे, तरी त्याला बाह्यवृत्तीचें ज्ञान नाहीं. कारण, लहानपणापासून जो आत्मतत्वामध्यें निमग्न झाला, त्यास बाह्यवृत्तीचें ज्ञान कसें होईल ?”

६० **हस्तामलकाची पूर्वकथा**—हें ऐकून शिष्यांनीं विचारलें कीं, “महा-राज ! ह्याला असें ज्ञान कसें प्राप्त झालें ? तें कृपा करून सांगून आमच्या संशयाची निवृत्ति करावी. तेव्हां आचार्य बोलले कीं, “पूर्वीं यमुनेचे कांठीं संसारापासून निवृत्त झालेला व योगाभ्यासानें युक्त असा एक सिद्ध रहात होता. त्याचें आसन अगदीं नदीप्रवाहावरच होतें. एके दिवशीं त्याच गांवांत रहाणारी एका ब्राह्मणाची कन्या, यमुनास्नानाकरितां नदीवर आली आणि त्या सिद्धापुढें आपलें मूल ठेवून त्यास ह्मणाली कीं, “ महाराज ! हें येथें लहान मूल जरा ठेवून मी घांटावर पलीकडे स्नानास जातें. आपण जरा ह्याच्यावर

नजर ठेवावी. त्या सिद्धांनीं मान डोलविली. तेव्हां ती स्नानाकरितां अंमळ दूर गेली. पण इकडे त्या सिद्धाला ध्यानस्थवृत्तिमध्यें समाधि लागली असतां तें मूल लोळत लोळत उदकामध्यें पडून गतप्राण झालें. त्या सिद्धाला कांहीं एक कळलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर तें मूल तसेंच प्रवाहाबरोबर वहात वहात ती बाई ज्या ठिकाणीं स्नान करित होती, तेथपर्यंत गेलें ! तें पाहिल्यावर त्या माउलीचें दुःख काय विचारावें? त्या बाईनें दुःखसंतापानें त्या मुलाचें प्रेत तसेंच आणून त्या सिद्धापुढें ठेविलें आणि मोठा आक्रोश मांडला. तिनें रडून, ओरडून, वक्षस्थळ पिटून व शिव्याशाप देऊन दहाही दिशा दणाणून सोडिल्या. तेव्हां तो योगी अत्यंत खिन्न होऊन योगबलानें त्यानें त्या मुलाचे देहांत प्रवेश केला. तोच हा हस्तामलक होय. ह्मणून ह्याला उपदेशावांचून सर्व ज्ञान झालें आहे."

६१ **सर्वांची प्रतिकूलता**—तेव्हां सर्व शिष्य आचार्यांस ह्मणाले "असें जर आहे तर मग आपण हस्तमलकांसच वार्तिक करण्यास आज्ञा करावी." आचार्य बोलले "हें सारें खरें; तरी ह्याला बाह्य प्रवृत्तीचें ज्ञान मुळींच नसल्यानें वार्तिक करण्याला हा उपयोगी नाहीं. तें करण्याकरितां सुरेश्वराचार्यच योग्य आहे. कारण, सरस्वतीच्या संगतीनें त्याला सर्व ज्ञान झालेलें आहे. आणि खरोखर विचार केला तर, त्याच्यासारखा अनुभवी दुसरा कोणीही दिसत नाहीं. पण तुह्मां सर्वांना जर तें इष्ट वाटत नाहीं, तर तसें करण्याला मीही आग्रह करित नाहीं. कारण, एका कार्यांत जर अनेकांची प्रतिकूलता दिसली, तर तें कार्य करूं नये, हा लौकिक न्याय आहे. ह्मणून मलाही आतां त्याबद्दल संशय उत्पन्न झाला आहे". हें आचार्यांचें भाषण श्रवण करून शिष्य बोलले "महाराज ! आपली इच्छा हे पद्मपाद पूर्ण करतील. करितां त्यांना वार्तिक करण्याविषयीं आज्ञा असावी," त्यावर आचार्य बोलले "हा पद्मपाद भाष्यावर एखादा निबंध लिहील. पण वार्तिक करणें त्याच्या हातून होणार नाहीं. कारण, तें भाष्य परप्रतिज्ञ आहे; व ती प्रतिज्ञा सुरेश्वराचार्य दीक्षित असल्यामुळें त्याला ज्ञात आहे." इतकें सांगून आचार्य एकांतांत निघून गेले व शिष्यमंडळी आपआपल्या उद्योगास लागली.

**६२ सुरेश्वराचार्यांचें ग्रंथकर्तृत्व व शाप**—हा सर्व शिष्यांचा दुराग्रह पाहून आचार्यांच्या अंतःकरणाला उदासीनता प्राप्त झाली व त्यांनीं एकांतीं सुरेश्वराचार्यांस हाक मारून सांगितलें कीं, तूं माझ्या भाष्यांवर वार्तिक करूं नकोस. कारण, हे बाकीचे शिष्य मूर्ख आहेत. त्यांना तें सहन होत नाहीं. ते ह्मणतात कीं, "तूं गृहस्थाश्रम केलेला होतास तेव्हां त्यांतील धर्मांचा अभिनिवेश त्यांत होईल. आतां तसें होणार नाहीं अशी माझी जरी खात्री आहे तरी त्या सर्वांचीच जर समजूत होत नाहीं, तर मीं तरी काय करावें? ह्याकरितां आतां तूं एखादा निबंधच करून मला दाखीव ह्मणजे ह्या शिष्यांचीही खात्री होईल." असें बोलून आतां आपल्या भाष्यावर वार्तिक होत नाहीं ह्मणून आचार्यांस किंचित् खेदही उत्पन्न झाला. नंतर गुरूच्या आज्ञेप्रमाणें थोड्याच कालांत "**नैष्कर्म्यसिद्धि**" ह्मणून एक ग्रंथ सुरेश्वराचार्यांनीं तयार करून तो आचार्यांस दाखविला. तो ग्रंथ पाहून आचार्यांस फार संतोष झाला आणि आचार्यांनीं मोठ्या उत्सुकतेनें बाकीच्या सर्व शिष्यांस बोलावून आणून तो ग्रंथ त्यांना दाखविला. तेव्हां सुरेश्वराचार्यांच्या ज्ञानाबद्दल सर्वांची खात्री होऊन त्यांच्याबद्दल जे कुतर्क होते, ते सर्व नष्ट झाले. हा ग्रंथ अद्यापही लोकमान्य आहे. ह्या ग्रंथांत नैष्कर्म्य ह्मणजे मोक्ष ह्याची सिद्धि केलेली आहे. तो ग्रंथ सर्वांनीं साग्र वाचून पाहिल्यानंतर सुरेश्वराचार्य रागानें बोलले कीं, "मी वार्तिक करण्याविषयीं गुरूच्या आज्ञेनें प्रवृत्त झालों असतां इतर शिष्यांनीं ज्या अर्थी त्या कृत्याला विघ्न केलें, त्या अर्थी ह्या भाष्यावर कोणीही वार्तिक केलें, तरि तें लोकांमध्यें चालणार नाहीं." असा शाप देऊन आचार्यांना ह्मणाले "महाराज! हा निबंध मी आपल्याला अर्पण केला आहे. ह्यापासून माझी कीर्ति व्हावी किंवा कांहीं लाभ व्हावा, असा माझा मुळींच उद्देश नाहीं. तर आपल्या आज्ञेचा भंग होऊं नये व तो झाला असतां गुरुशिष्यभाव राहणार नाहीं. करितां हा ग्रंथ अल्प मतीनें केला आहे. आतां गृहस्थाश्रम केला ह्मणून त्याचा अभिनिवेश वार्तिकांत होईल असें जें ह्यांचें ह्मणणें आहे तें बरोबर नाहीं. कारण, आश्रमांतर झालें आहे. बालपणांतील बुद्धि जशी तारुण्यावस्थेंत राहत

नाहीं; व तारुण्यांतील बुद्धि वृद्धावस्थेंत राहत नाहीं; त्याप्रमाणें त्या कालच्या बुद्धींत व आतांच्या बुद्धींत अंतर हें असणारच. आतां पूर्वाश्रमीं आपण मजकडे आलां, तेव्हां माझ्या घरांत प्रवेश झाला नाहीं, असा जो ह्यांचा आक्षेप आहे, तोही व्यर्थ होय. कारण, आपण माझ्या घरीं येऊन भिक्षाही घेतली हे आपल्यासही विदित आहे. मी पूर्वाश्रमीं भाष्यावर वगैरे अनेक ग्रंथ केलेले आहेत; परंतु आतां मात्र आपल्या चरणसेवेव्यतिरिक्त कांहीं इच्छा राहिली नाहीं. पण आपल्यासारख्यांची सेवा करण्यापुरतें सामर्थ्य अंगीं येणें ही गोष्ट परम दुर्घटच आहे, तथापि आपल्या कृपेंकरून त्याची मी दृढतर इच्छा तरी धारण केली आहे." ह्यावर आचार्य बोलले कीं, "माझी शाखा जी '**तैत्तिरीय**' तिच्यावर मीं भाष्य केलें आहे; व तुझी शाखा जी '**काण्व**' तिजवरही माझें भाष्य आहे. करितां ह्या दोन भाष्यांवर वार्तिकें करावींत ह्मणजे तेणेंकरून लोकांना फार उपयोग होईल. कारण "**परोपकाराय सतां विभूतयः**" परोपकाराकरितांच साधूंची प्रवृत्ति आहे." ह्याप्रमाणें आचार्यांनीं केलेली आज्ञा शिरसावंद्य करून सुरेश्वराचार्यांनीं त्या दोन्हीं भाष्यांवर सुंदर वार्तिकें तयार करून तीं आचार्यांना भक्तिपूर्वक अर्पण केलीं. गुरूची आज्ञा झाल्यानंतर त्याप्रमाणें करणें हेंच शिष्याचें कर्तव्य आहे, त्याबद्दल विचार किंवा अवधि कामाची नाहीं. असें करील तोच खरा शिष्य ह्मणावा; नाहीं तर उदरभरणाकरितां राहिलेले शिष्य शेंकडों असतात. त्यांचा उपयोग काय ?

**६३ इतर शिष्यांचे ग्रंथ**—नंतर आचार्यांनीं पद्मपादांसही एखादा ग्रंथ करण्याविषयीं आज्ञा केली, तेव्हां त्यांनींही आचार्यांचे आज्ञेप्रमाणें सूत्रभाष्यांवर टीका केली आणि ती गुरुदक्षिणा ह्मणून आचार्यांस अर्पण केली. परंतु भाष्यावरील टीका प्रसिद्ध होणार नाहीं असा सुरेश्वराचार्यांनीं शाप दिला होता, ह्मणून आचार्यांनीं त्यांच्या शापाचें महत्त्व राखण्याकरितां सुरेश्वराचार्यांनां सांगितलें कीं, ह्या टीकेंत पांच भाग आहेत खरे; पण तूं शाप दिल्यामुळें चारच भाग प्रसिद्ध होतील. पांचवा भाग प्रसिद्ध होणार नाहीं. असें सांगून त्यांचें समाधान केलें, आणि आचार्यांनीं सुरेश्वराचा-

यांना सांगितलें कीं, तूं ह्या जन्मसमाप्तीनंतर प्रारब्धवशेंकरून पुढच्या जन्मीं '**वाचस्पति**' ह्या नामेंकरून उत्पन्न होशील; व माझ्या भाष्यावर उत्तम टीका करशील; आणि ती '**यावच्चंद्रदिवाकरौ**' कायम राहील. नंतर आचार्यांनीं आनंदगिरी आदीकरून जे मोठ मोठे शिष्य होते; त्यांस बोलावून आणून सांगितलें कीं, तुह्मी अद्वैतसिद्धांतावर निबंध करा. तेव्हां त्या सर्वांनींही गुरूच्या आज्ञेप्रमाणें यथामति निबंध करून आत्मतत्त्वरूपी कमलाला सूर्याप्रमाणें प्रकाशक असे अनेक निबंध केले. ते अद्याप प्रसिद्ध आहेत. आणि त्यावरूनच ब्रह्मविद्या अद्याप अस्तित्वांत राहिली आहे असें ह्मटलें तरी चालेल. हे उपकार कांहीं थोडे नव्हत.

**६४ पद्मपादांस तीर्थयात्रेस जाण्याची अनुज्ञा**—एकदां पद्मपादांच्या मनांत तीर्थयात्रा करावी असें आल्यावरून त्यांनीं आचार्यांस विनंती केली कीं, " माझ्या मनांतून तीर्थाटन करावें असें आलें आहे. ह्याकरितां आज्ञा असावी." तेव्हां आचार्य ह्मणाले " गुरूजवळ राहणें हाच क्षेत्रवास आहे; शिष्यानें निरंतर गुरुसेवा करूनच रहावें, ह्मणजे त्याला तीर्थयात्रेचें फल प्राप्त होतें. शिवाय, तीर्थयात्रेंत अधिक तें काय ? मार्गामध्यें संन्यासधर्मही नीट चालत नाहीं; त्यांत विक्षेप येतो. कारण, मार्ग चालून चालून श्रमानें निद्रा येते, त्यामुळें इतर विचारांत विघ्न होतें. ब्रह्मचिंतनही यथास्थित होत नाहीं. संन्यास दोन प्रकारचा आहे; एक '**विद्वत्**' संन्यास; ह्मणजे तत्त्वज्ञान झालें असून तें नाश होऊं न देतां जीवन्मुक्ति सुखाकरितां यत्न करणें. आणि दुसरा '**विविदिषा**' संन्यास. ह्मणजे तत्त्व जाणण्याकरितां '**तत् आणि त्वं**' या दोन पदांच्या अर्थाचा विचार करणें. त्यांत तूं दुसरा संन्यास घेतला आहेस; ह्याकरितां '**तत्त्व**' पदार्थ अवश्य जाणला पाहिजे. तो तीर्थयात्रा केल्यानें घडणार नाहीं. याचें कारण, पूर्वीं सांगितलेंच. शिवाय, यात्रा करणाऱ्याला कसकशीं दुःखें भोगावीं लागतात तींही सांगतों. ऐक. कोठें पाणी असतें, कोठें असत नाहीं. कोठें निद्रा करावयास मिळते, कोठें मिळत नाहीं. कोठें अन्न मिळतें, तर कोठें उपास पडतो. ह्यामुळें सुखप्राप्ती अशी कोठेंच होत नाहीं. बरें; एकाद्या ठिकाणीं ज्वर आला, किंवा दुसरा कांहीं रोग

किंवा व्याधी उत्पन्न झाली तर उपाय करण्यास कांहीं साधन नसतें. त्यामुळें पुढेंही जातां येत नाहीं आणि मागेंही येतां येत नाहीं, अशीं अनेक दुःखें व अनेक अडचणी असतात."

तेव्हां पद्मपाद बोलले "महाराज! आपल्या आज्ञेविरुद्ध माझ्या सारख्या शिष्यानें कांहीं बोलूं नये, हें खरें. तथापि आपण क्षमा करण्याविषयीं समर्थ आहां, ह्मणून यथामति बोलतों. शिष्यांनीं गुरुसन्निध वास करावा ह्मणून सांगितलें तें योग्यच आहे. परंतु जे पुराणप्रसिद्ध साधुसंत आहेत, त्यांचीं दर्शनें घेतल्याशिवाय माझें मन स्वस्थ होणार नाहीं. शिवाय, तीर्थाटन केलें तरी मन गुरुचरणीं ठेविलें ह्मणजे झालें. गुरुसन्निध राहून जर मन स्थिर नाहीं, तर मग समीप राहण्याचा तरी उपयोग काय? आतां कोठें पाणी मिळणार नाहीं, कोठें स्थळ मिळणार नाहीं, कोठें अन्न मिळणार नाहीं, कोठें मार्ग मिळणार नाहीं, तेव्हां दुःख होईल ह्मणून आज्ञा झाली. तर दुःखावांचून पुण्यप्राप्ती नाहीं. दुःख भोगावें तेव्हांच सुख प्राप्त होणार. आतां रोगादिक पीडा होईल असें आपलें ह्मणणें आहे, पण रोग होणें हें प्रारब्धाधीन आहे, त्याबद्दल मुळींच वाद नाहीं. बरें; होणारा रोग मी येथें असलों काय, आणि परदेशांत गेलों काय, तो होणारच. कारण '**प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः**' ह्मणजे प्रारब्धकर्म भोगल्यावांचून त्याला क्षयच नाहीं. मृत्यूची गोष्ट ह्मटली तर आयुर्मर्यादा संपल्यानंतर कोठेंही असलों तरी तो प्राप्त होणारच, त्याविषयीं काळजी करणेंही योग्य नाहीं. आतां आचाराविषयीं पाहिलें तर मनु आदिकरून जे धर्मशास्त्रवेत्ते होऊन गेले, त्यांनीं देशकालवर्तमान पाहून करावा असें सांगून ठेविलें आहे. तेव्हां प्रवासांत आपत्कालीं जर कदाचित् यथास्थित आचार घडला नाहीं, तरी अशुचित्व येऊं शकत नाहीं. दैव अनुकूल असेल तर अन्नप्राप्ती कोठें तरी होईलच. मार्गांतील श्रम झाल्यावर निद्रादिक दोषांनीं युक्त होऊन ब्रह्मचिंतन घडावें तसें घडत नाहीं, असें आपलें ह्मणणें आहे; परंतु चित्ताची एकाग्रता झाल्यानंतर कोठेंही ब्रह्मध्यान करण्यास हरकत येईल असें वाटत नाहीं." ह्याप्रमाणें पद्मपादांचें भाषण ऐकून व त्यांचा

तीर्थयात्रेस जाण्याचा निश्चय पाहून आचार्यांनीं त्यांस जाण्याविषयीं आज्ञा दिली आणि प्रवासांत कसें रहावें, त्याबद्दल उपदेश केला.

६५ **उपदेश**—आचार्य ह्मणाले "प्रवासामध्यें साधूंचीच संगति करावी ह्मणजे त्यापासून सुख होतें. दुष्टांची संगति दुःखाला कारण होते, ह्याकरितां ती कधींही करूं नये. मार्ग चालत असतां एकाच ठिकाणीं फार दिवस राहूं नये. कोणताही संग्रह करूं नये. कारण, त्यापासून सर्वस्व जाण्याचा प्रसंग येतो, आणि प्रवास करण्यास अनेक विघ्नें उत्पन्न होतात. इष्ट देश असेल तेथेंच वास करावा, मध्यंतरीं वास केल्यानें कार्यसिद्धि होत नाहीं. मार्गामध्यें गुप्त चोर असतात, ते बाहेरून मोठे सभ्य दिसतात, पण त्यांची कृति फार वाईट असते. ह्याकरितां मोठ्या सावधगिरीनें वागावें. कारण, ते दुष्ट चोर, प्रथम वस्त्रें, पुस्तकें, इत्यादि वस्तु पाहण्याच्या इच्छेनें विश्वास दाखवून अखेरीस सर्वस्व हरण करतात. मार्ग चालत असतां आसपास जे कोणी साधुसंत असतील, त्यांचीं दर्शनें घेऊन त्यांची पूजा करून नंतर पुढें जावें. कारण, ते इच्छित कार्यसिद्धि करून देण्याविषयीं समर्थ असतात." ह्याप्रमाणें गुरूपदेश श्रवण करून पद्मपाद यांस फार आनंद झाला. नंतर आचार्यांनीं पद्मपादांची तीर्थयात्रेसाठीं रवानगी करून आपण सुरेश्वर आदिकरून शिष्यांसह ऋष्यश्रृंग पर्वतावर ह्मणजे शृंगेरींत जाऊन कांहीं कालपर्यंत वास केला.

६६ **मातोश्रीचा अंत्यविधी**—शृंगेरी येथें आचार्य एक वेळ ध्यानस्थ असतां त्यांच्या ध्यानांत आलें कीं आपली माता अगदीं आसन्नमरण झाली असून आपला सारखा ध्यास करित आहे. हें मनांत येतांच ध्यानाचें विसर्जन करून आकाशमार्गानें आपले मातेजवळ जाऊन तीस वंदन केलें, आणि प्रार्थना केली कीं, "आपण स्मरण केल्याप्रमाणें मी आलों आहें. तर जी आज्ञा करणें ती करावी." तेव्हां मातोश्रीच्या नेत्रांत आनंदाश्रु आले व त्यांना अगदीं बोलवत नव्हतें तरी त्या वेळेस शक्ति येऊन त्या ह्मणाल्या "मला आतां हें जीर्ण शरीर नकोसें वाटूं लागलें आहे तर माझा संस्कार करून मला उत्तम अशा पुण्यलोकाला पाठीव." तेव्हां आचार्यांनीं आपल्या मातोश्रीला ब्रह्मानंदाची प्राप्ती व्हावी ह्मणून

ब्रह्मोपदेश केला. पण ब्रह्मज्ञान आकलन करण्याइतकी शक्ति त्या बिचारीच्या आंगांत कोठून येणार? त्या ह्मणाल्या "बाबारे! हें तुझें ब्रह्म निर्गुण निराकार आहे; त्यामुळें तें मला समजत नाहीं, व त्याचा बोधही पण होत नाहीं. ह्या-करितां मला सगुण परब्रह्माचा उपदेश करून तें माझ्या हृदयांत ठसेल असें कर, त्याप्रमाणें आचार्यांनीं श्रीशंकराचा स्तव केला. तेव्हां शंकरांनीं तिला नेण्याकरितां आपले दूत पाठविले. तें पाहून आचार्यांनीं आईस सांगितलें कीं, हे शंकरांनीं दूत पाठविले आहेत, तर विमानांत बसून जावें, ह्मणजे शंकराचें प्रत्यक्ष दर्शन होऊन त्यांची मूर्ति तुझ्या हृदयांत ठसेल." तेव्हां ती ह्मणाली "मी ह्या दूतांबरोबर जात नाहीं. कारण, शंकर हें दैवत तमोगुणी आहे." हें ऐकून आचार्यांनीं त्या दूतांना परत जाण्यास सांगून सत्वगुणसंपन्न जे विष्णु त्यांचा स्तव केला. तेव्हां महाविष्णु प्रसन्न होऊन त्यांनीं आपले दूत पाठविले. इतकेंच नव्हे, तर स्वतः आपणही आले. तेव्हां तें विमान पाहून आचार्यांच्या मातुश्रीस आनंद झाला व त्या विमानांत बसून श्रीविष्णूचें ध्यान करित व अनेक लोक अवलो-कन करित वैकुंठास गेल्या. आणि त्यांचा मृत देह भूमीवर पडला. तेव्हां आचार्यांनीं आपल्या आईचें और्ध्वदेहिककर्म करण्याकरितां सर्व बांधवजनांस बोलावून आणून सांगितलें कीं, "मीं जरी संन्यास धर्म स्वीकारला आहे, तरी मातेपाशीं मी प्रतिज्ञा केल्याप्रमाणें तिचें सर्व संस्कार मी स्वतः करणार." तेव्हां जमलेल्या बांधवजनांपैकीं कित्येक ह्मणाले कीं, "संन्यास घेतल्यानंतर हा अधिकार राहत नाहीं. हा धर्म पूर्वाश्रमांतील आहे. तेव्हां ह्या आश्रमांत करणें ह्मणजे शास्त्रविरुद्ध होईल." परंतु ह्या त्यांच्या बोलण्याकडे लक्ष न देतां मातेस सांगितल्याप्रमाणें स्वतः संस्कार करण्यासाठीं आचार्य प्रवृत्त झाले. तेव्हां त्यांना त्यांचेच बांधवजन विरुद्ध झाले. ते इतके कीं, त्यांच्या मातोश्रीचे प्रेतास खांदा देण्यास येईनात, येवढेंच नव्हे, तर त्यांस विस्तव सुद्धां देईनात. तेव्हां आचार्यांना क्रोध येऊन त्यांनीं त्यांस शाप दिला कीं, आजपासून तुह्मी वेदभ्रष्ट व्हाल व तुमच्या घरीं कोणत्याही यतीची भिक्षा होणार नाहीं. असें सांगून आचार्यांनीं स्वतःच काष्ठें जमा केलीं आणि मातेच्या दक्षिण बाहूचें मंथन करून त्यापासून

अग्नि उत्पन्न केला आणि त्या अग्नीनें आपल्या गृहाजवळच परसांतील आवारांत मातेचें दहन केलें! त्याप्रमाणें हल्लीं त्या देशांत ही चाल चालू आहे. ह्मणजे नंबुरी ब्राह्मणांचीं प्रेतें त्यांच्या घराच्या परसांतच जाळतात. त्यांच्याकडे कोणी संन्यासी भिक्षेस येत नाहीं व ते ब्राह्मण वेदभ्रष्ट आहेत असें ह्मणतात. पण ह्याबद्दल आह्मांला बराच संशय आहे. कारण, आह्मी तेथें असतांना नंबुरी ब्राह्मण वेद वगैरे ह्मणतांना पाहिलेले आहेत, तेव्हां हें कसें? ह्याचा उलगडा होत नाहीं. असो. तात्पर्य काय कीं, कोणत्याही महात्म्याचा छल करूं नये, अपराध करूं नये. कारण, तो संतप्त झाला, किंवा त्याचा आत्मा तळमळला तरी सुद्धां शासन व्हावयाला वेळ लागत नाहीं. अशांचा शाप हटकून लागतो. चंदन वृक्ष स्वभावानें शांत आहे; पण त्याच्यापासून अग्नि उत्पन्न झाला तर तो मात्र फार प्रखर असतो. ह्याकरितां सत्पुरुषांच्या विरुद्ध कधींही न जाण्याविषयीं सावध असावें. अस्तु. आचार्यांनीं आपल्या हेतूप्रमाणें मातोश्रींचे सर्व अंत्य संस्कार करून कांहीं दिवस तेथेंच वास्तव्य करून राहिले.

६७ **पद्मपादांच्या ग्रंथाचें दहन**—इकडे पद्मपाद आचार्यांचे आज्ञेनुरूप तीर्थयात्रा करीत निघाले ते दक्षिण दिशेला जाऊन अनेक तीर्थांचीं व देवतांचीं दर्शनें घेत घेत श्रीकालहस्तीश्वराचें दर्शन घेऊन पुढें **पुंडरीक** ह्मणून एक नगर आहे तेथें गेले. त्या नगरामध्यें शंकर निरंतर वास करतात अशी आख्यायिका आहे. तेथील भिक्षुकांना पद्मपादांनीं विचारिलें कीं, "हें तीर्थ कोण आहे?" तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, ह्या तीर्थाला 'शिवगंगा' असें ह्मणतात. एक वेळ महादेवांनीं येथें गंगेचें स्मरण केलें, तेव्हां गंगा प्राप्त होऊन ती शिवाच्या आज्ञेनें येथें वाहते. कोणी कोणी ही गंगा नृत्य करतांना शंकराच्या जटेंतून निघाली असेंही ह्मणतात. येथें स्नान केलें असतां प्राणी सर्व पातकांपासून मुक्त होतो. ह्या तीर्थाचा महिमा इतका मोठा आहे कीं, तो श्रीशंकरावांचून दुसरा कोणीही सांगण्यास समर्थ नाहीं. ह्याप्रमाणें त्या तीर्थाचा महिमा श्रवण करून पद्मपादांनीं त्या तीर्थांत यथाविधी स्नान केलें आणि पुढें रामेश्वरीं जाण्यास निघाले. ते मार्गामध्यें कावेरी नदी लागली तेथें आले, आणि तिचें स्नान करून भगवत्पादांबुजाचें ध्यान

करून पुढें अभिरुचित स्थळीं जाण्याकरितां निघाले. तों वाटेंत त्यांच्या मामाचें घर होतें, व त्यांस भेटूनही फार दिवस झाले होते, ह्मणून ते सहजीं त्यांस भेटण्यासाठीं ह्मणून त्यांच्या घरीं गेले. फार दिवस आपला विरक्त परंतु ज्ञानवान् झालेला भाचा आलेला पाहून त्या मामालाही अत्यंत संतोष झाला. त्यानें त्याचा आदरसत्कार फार उत्तमरीतीनें केला. बहुत दिवसांनीं गांठी पडल्यामुळें उभयतांसही फार आनंद झाला. नंतर पद्मपादांनीं त्यांस लहानपणापासून घडलेला सर्व वृत्तांत निवेदन केला. एक दिवस राहून ते पुढें जाण्याविषयीं मामाचा निरोप मागूं लागले. परंतु "तूं फार दिवसांनीं आला आहेस; व वाटेचेही श्रम झाले आहेत तर तूं चार दिवस राहून मग जा." असा मामाचा फारच आग्रह पडल्यावरून पद्मपाद बरोबरच्या शिष्यांसह थोडे दिवस मामाच्या घरीं राहिले. तेव्हां दररोज उभयतांमध्यें वेदांतासंबंधानें बरीच चर्चा चालत असे. पद्मपादांनीं गृहस्थाश्रमाची थोरवी सांगून तोच नीट रीतीनें चालविल्यास अत्यंत श्रेयस्कर होतो. हा विषय त्यांच्या मनांत ठसवून दिला, आणि मग पुढें रामेश्वरास जाण्यास निघाले व जातांना ते आपल्या मामास ह्मणाले कीं, "माझ्या बरोबर बरींच पुस्तकें आहेत. तीं सर्व बरोबर वागवितांना बरेंच ओझें होऊन अडचण सोसावी लागते, ह्याकरितां त्यांपैकीं कांहीं पुस्तकें मी परत येईपर्यंत आपल्यापाशीं ठेवावींत. मी आमचे गुरु आचार्य ह्यांच्या भाष्यावर टीका केलेली आहे. तीही येथेंच आपल्यापाशीं ठेवतों ती जपून ठेवावी." मामांनीं तें सर्व कबूल केलें, व तूं केलेली टीका कशी काय आहे ती मला दाखीव ह्मणून मोठ्या उत्कंठेनें विचारलें, तेव्हां पद्मपादांनीं तो ग्रंथ काढून त्यांस वाचून दाखविला. पण पद्मपादांचा मामा स्वतः द्वैतवादी असल्यामुळें, व ह्या टीकेंत प्रभाकर आदिकरून पूर्वमीमांसकांचें खंडण असल्यामुळें ती टीका त्याला फारच झोंबली. ती ऐकून त्याला आनंद तर वाटला नाहींच, पण मनांतल्या मनांत अगदीं चरफडत राहिला. तरी पण त्यानें त्यापैकीं कोणतेंही चिन्ह बाहेर न दाखवितां ती टीका मुकाट्यानें ऐकून घेतली व "ठीक आहे ठेव येथें. कांहीं हरकत नाहीं." ह्मणून सांगितलें. त्यावरून पद्मपादांनीं ती टीका व कांहीं पुस्तकें मामापाशीं ठेवून ते पुढें तीर्थयात्रेस निघाले.

तेव्हां त्यांना भावी नाशसूचक असे बरेच अपशकुन होऊं लागले. पण त्यांची विशेष क्षिति न बाळगितां ते तसेच निघून फिरत फिरत रामेश्वरास जाऊन पोंहचले. इकडे पद्मपाद निघून गेल्यावर त्यांच्या मामानें विचार केला कीं, ही आमच्या भाचाची टीका जर लोकांमध्यें प्रसिद्ध झाली, तर आपल्या मताला विरोध येईल, व आमची जिकडे तिकडे नाचक्की उडेल. हें बरें नाहीं, ह्याकरितां कसेंही करून ह्याच्या टीकेचा नाश केला पाहिजे. पण तो करावा कसा? बरें, तेवढेंच पुस्तक नाहींसें केलें तर मुद्दाम नाहींसें केलें असा आरोप येईल. तेव्हां याला उपाय काय करावा? ह्मणून तो रात्रंदिवस काळजींत असे. एके दिवशीं त्यास कल्पना सुचली कीं, आपल्या घरालाच आग लावून द्यावी ह्मणजे त्यांत ही टीका सहजच जळून जाईल, व त्याबद्दल मग कोणासही संशय येणार नाहीं. घर गेलें तरी बेहेत्तर! तें पुन्हा बांधतां येईल. आणि माझें घरच गेलें मग तुझ्या पुस्तकाची कथा काय! असें सांगण्यासही ठीक पडेल. असें मनांत आणून त्या मत्सरी मनुष्यानें त्याप्रमाणें खरोखरच एके दिवशीं आपल्या घरास आग लावून दिली. आणि त्यांत ती पद्मपादांचीं सारीं पुस्तकें, व इतके परिश्रम सोडून लिहिलेली टीका जाळून भस्म करून टाकली. ह्यावरून दुष्ट आणि मत्सरी लोक काय करतील याचा नेम नाहीं.

**६८ आचार्यांनीं ती टीका पुन्हा सांगितली**—इकडे पद्मपाद रामेश्वरची यात्रा करून पुन्हां परत मामाच्या घरीं आले. तों काय? मामांनीं आधींच "आपलें घरदार सारें जळून फस्त झाल्यामुळें मी केवळ उघडा पडलों आहे" हें गाऱ्हाणें पुढें काढलें. "आपलें नाक कापावयाचें आणि दुसऱ्यास अपशकुन करायाचा" हें दुष्टांचें कुलव्रतच आहे. ही रडकथा ऐकल्यावर पद्मपाद तरी पुढें काय बोलणार? आपल्या टीकेचें व इतर पुस्तकांचें काय झालें हें उघडच दिसून आलें. तीं जळून गेल्याबद्दल त्यांचे मामाही वरकरणी दुःख करूं लागले. इतके परिश्रम सोसून केलेल्या ग्रंथाची राखरांगोळी झालेली ऐकल्यावर पद्मपादांस काय बरें वाटावें? "बरींच वर्षें श्रम करून लिहिलेला ग्रंथ त्याच्या आवडत्या कुत्र्यानें कोलीत टाकून जळालेला पाहून ज्याप्रमाणें 'न्यूटन'ला वाईट वाटलें

असेल, ” तितकें त्यांसही वाटलें असलें पाहिजे ! त्यांचा धीर अगदीं खचून गेला, व ते उदास झाले. तथापि त्यांनीं मनाला धीर देऊन ती टीका कांहीं दिवस मामाच्या घरींच राहून पुन्हां लिहावी असा विचार केला; आणि त्याप्रमाणें ते तेथें राहून पुन्हां ती टीका लिहिण्यास त्यांनीं प्रारंभही केला. तेव्हां त्यांची बुद्धि पाहून मामाला फारच धाक पडला व त्याचें धाबें दणाणलें. कारण, त्यास असें वाटलें कीं, आतां जर ह्यानें पुन्हां ही टीका जशीच्या तशीच लिहिली, आणि तो कुशाग्रबुद्धीचा असल्यामुळें लिहील यांत शंका नाहीं, तर मग आपण इतकें करूनही सर्व व्यर्थ झालें! माझें घर मी आपल्या हातानें जाळलें तें गेलेंच आणि त्याची टीका आपली पुन्हां जशीच्या तशी तयार! ह्मणजे आटोपलें. आतां ह्याला तोड काय ? ह्मणून तो मनामध्यें रात्रंदिवस झुरूं लागला. पण दुष्ट असतात ते गप्प बसणार थोडेच. “ लाक्षागृहांत पांडव जळाले नाहींत, तर भीमास विष घाला!” हे दुर्योधनाचें व्रत त्यांना पाठच असतें. त्याप्रमाणें त्या पद्मपादांच्या मामानें त्यांस विषारी पदार्थ घालून त्यांच्या मेंदूला मंदत्व आणण्याची युक्ति काढली आणि एके दिवशीं त्यांनीं पद्मपादाच्या भोजनांत विषारी पदार्थ घातला. त्यामुळें पद्मपादांच्या बुद्धीला मंदत्व येऊन ती पूर्वीप्रमाणें चालेनाशी झाली. आणि त्यांनीं चालविलेला उद्योग, नाइलाजास्तव त्यांना सोडून द्यावा लागला. ते तसेच उदासीन अंतःकरणानें तेथून पुढें तीर्थयात्रा करित निघाले. इतक्यांत त्यांस बातमी लागली कीं, आचार्य हे मातोश्रीच्या अंत्य विधीकरितां केरळ देशांतच आले आहेत. तेव्हां गुरुदर्शनासही फार दिवस झाल्यानें त्यांनाही उत्कंठा लागलीच होती. त्यांत श्रीगुरुही जवळच आहेत असें समजतांच ते लागलेच निघून केरळ देशांत आचार्यांच्या ‘ **कालडि** ’ गांवांत जाऊन दाखल झाले, व आचार्यांचें दर्शन होतांच त्यांस साष्टांग वंदन करून हात जोडून पुढें उभे राहिले. उभयतांसही प्रेमानंद उचंबळून आला. नंतर आचार्यांनीं कुशल प्रश्न विचारल्यावरून पद्मपादांनीं प्रवासांतील वृत्तांत सांगण्यास प्रारंभ केला. ते ह्मणाले “ महाराज ! मी तीर्थें करित करित पूर्वाश्रमांतील मातुलगृहीं गेलों होतों. आणि पूर्वाश्रमींच्या मामाला मीं आपली टीका वाचून दाखविली. तेव्हां

त्याचा व माझा वाद होऊन अखेर मीं त्यांस जिंकून आपलें अद्वैत मत स्थापन केलें. पण त्यानें इतका जरी त्याचा पराभव झाला, तरी त्यानें त्याबद्दल बाह्यात्कारी यत्किंचितही वाईट वाटलेलें दाखविलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्या माझ्या टीकेचें मोठें कौतुक करून त्यानें माझा असा कांहीं सत्कार केला कीं कांहीं विचारूं नये. त्यामुळें माझा त्याच्यावर पूर्ण विश्वास बसून मी ती टीका परत येईपर्यंत त्याच्या स्वाधीन करून रामेश्वरीं गेलों. पण तिकडून परत आल्यावर पाहतों तों मामाचें घरच जळून गेल्यामुळें माझें पुस्तकही जळून गेलें! बरें; तशीच टीका पुन्हां करावी ह्मणून यत्न केला, पण आतां पूर्वीप्रमाणें माझी बुद्धि चालत नाहीं. तेव्हां आतां ह्या दुःखांतून मला आपल्यावांचून कोणीही तारण्यास समर्थ नाहीं. आपण कृपासागर आहां व मी आपला दीन शिष्य आहें. असें पद्मपादांचें भाषण श्रवण करून आचार्य बोलले कीं, "बरें; झालें तें झालें; आतां गत गोष्टीचा शोक करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हा मोहपाश मोठा दुर्धर आहे. व कर्माची गति मोठी कठीण आहे. हें मीं पूर्वींच सुरेश्वरास सांगितलें होतें. असो. ती टीका तूं मला येथें असतांना एकदां वाचून दाखविली होतीस, ती माझ्या ध्यानांत आहे. ह्याकरितां तूं आतां लिहिण्यास आरंभ कर. मी ती तुला तोंडानें सांगतों." असें ह्मणून त्यांच्याकडून ती टीका पुन्हां पूर्ववत् लिहवून त्यांना त्यांच्या दुःखापासून मुक्त केलें. किती विलक्षण सामर्थ्य हें! ह्याच्या पुढें एकपाठी काय होत?

६९ **तीन नाटकें तोंडानें सांगितलीं**—पद्मपादांची टीका अक्षरशः तोंडानें सांगितली ही विलक्षण कीर्ति छपून राहणार थोडीच. ती हां हां ह्मणतां सर्वतोमुखी झाली, व ती केरळ देशच्या राजाचेही कानीं गेली. तेव्हां त्या राजानें आचार्यांचें दर्शन घेऊन विनंती केली कीं "महाराज! मीं कांहीं वर्षांपूर्वीं तीन नाटकें रचून तीं मीं गुरु महाराजांना समक्ष येऊन वाचून दाखविलीं होतीं. परंतु तीं कांहीं कारणानें अग्नीनें दग्ध झालीं. तरी कृपा करून तीं आपण मला पुन्हा सांगितल्यास मोठे उपकार होतील, व मला उतरून घेण्यास मिळतील." अशी राजाची प्रार्थना ऐकून आचार्यांनीं तें मान्य केलें आणि तीं कैक वर्षांपूर्वीं

राजानें वाचून दाखविलेलीं नाटकें अक्षरशः सांगितलीं व राजानें तीं उतरून घेतलीं. आणि मोठ्या आनंदानें दंडवत प्रणाम करून प्रार्थना केली कीं, "सेवकास जी आज्ञा असेल ती सांगावी." तेव्हां आचार्य बोलले "ह्या '**कालडि**' गांवांत राहणारे ब्राह्मण ज्यांस तूं हा गांव अग्रहार दिला आहेस, त्यांना द्विज कर्मापासून मीं भ्रष्ट केले आहे. तेव्हां तूंही त्यांना तसेंच मान." ती गोष्ट राजानें मान्य केली, आणि आचार्यांचा आशीर्वाद घेऊन तो आपल्या नगरास गेला. नंतर आचार्यही सर्व शिष्यांसह देशोदेशच्या अद्वैतविरुद्ध मताचें खंडण करण्याकरितां निघाले.

७० **मध्यार्जुनांतील साक्षात्कार**—नंतर आचार्यांनीं आतां दिग्विजय करावा असें मनांत आणून पद्मपादादि एक हजार शिष्य बरोबर घेऊन निघाले ते प्रथम सेतुबंध रामेश्वरीं जाण्याचा संकेत केला आणि जाऊं लागले. तों मार्गामध्यें मध्यार्जुन ह्मणून एक प्रसिद्ध शिवस्थान आहे तेथें जाऊन श्रीशंकराची पूजा करून प्रार्थना केली कीं "हे शंभो! आपण सर्व उपनिषदार्थ जाणतां व सर्वज्ञही आहां; ह्याकरितां वेदार्थावरून द्वैतमत सत्य किंवा अद्वैत मत सत्य असा जो संशय आहे, त्याचा निर्णय सर्वांसमक्ष आपण करावा. ह्मणजे कोणाची शंका राहणार नाहीं." अशी प्रार्थना करितांच त्या लिंगांतून सावयव मूर्ति निघून तिनें मेघाप्रमाणें गंभीर वाणीनें उजवा हात वर करून सांगितलें कीं "**सत्यमद्वैतं, सत्यमद्वैतं, सत्यमद्वैतं.**" अद्वैतच सत्य आहे. असें त्रिवार सांगून ती मूर्ति त्या लिंगामध्येंच अदृश्य झाली. तेव्हां तेथें जे जे प्रेक्षक आले होते, त्यांस अत्यंत आश्चर्य वाटलें, व तेथें जे कोणी तद्देशीय लोक शंकरभक्त होते, त्यांनीं आचार्य हेच साक्षात् शंकराचे अवतार आहेत, असें समजून त्यांनांच गुरु केलें. आणि त्यांचे आज्ञेनें गणपति, दुर्गा, सूर्य, शंकर आणि अच्युत इत्यादि पंचायतनाची पूजा करून अद्वैतमार्गास लागले. ह्याप्रमाणें तद्देशीयांना अद्वैतमार्गी करून सर्व शिष्यांसह आचार्यांची स्वारी श्रीसेतुबंध रामेश्वरीं गेली, आणि तेथील सागराचें स्नान करून व श्रीरामेश्वराची पूजा करून कांहीं दिवस तेथें वास्तव्य केलें.

७१ **शाक्तांचें खंडण**—आचार्यांची स्वारी रामेश्वरीं असतां शाक्तपंथी लोक

ह्मणजे देवीचे उपासक येऊन आचार्यांस वंदन करून ह्मणूं लागले कीं, "हे यतिवर्य ! आमचें मत ऐकावें. ज्या मताचें अवलंबन केलें असतां सौख्य भोगावयास मिळून शेवटीं मोक्ष प्राप्त होतो तें मत असें. जिला 'आद्यशक्ति' असें ह्मणतात, जी सत्व, रज, तम या गुणांहून अलिप्त असून जिच्यापासून मायेच्या साह्यानें महदहंकारपूर्वक संपूर्ण जगत् उत्पन्न झालें; भवानी आदिकरून देवता तिच्याच शक्तीपासून उत्पन्न झाल्या. ह्याकरितां तिची सेवा करणेंच योग्य आहे. ह्मणून तिच्या सुवर्णाच्या पादुका करून त्या बाहूंच्या ठिकाणीं धारण केल्यानें आह्मी जीवन्मुक्त असे कृतार्थ आहों. ह्मणून देवीची सेवा करणें ह्यांतच मुक्ति आहे. तेव्हां आपणही तिचींच चिन्हें धारण करून तिची उपासना करावी. असें त्यांचें मत ऐकून आचार्य बोलले कीं, " तुह्मी ह्मणतां हें खरें आहे. तथापि श्रेष्ठ जो पुरुष, त्याच्या ज्ञानानेंच मुक्ति होते, असें सर्व शास्त्रांत सांगितलें आहे. आत्म्यानें आत्म्याचें ध्यान करूनच प्राणी मुक्त होतो; अन्यथा होत नाहीं. ह्याला " **तमेव विदित्वामृतत्वमानशुः** " त्यालाच जाणून मोक्षाला पावेल इत्यादि कोट्यवधि वाक्यें प्रमाण आहेत. सांख्यांनींही प्रकृतीहून श्रेष्ठ जो ईश्वर, सुखच आहे स्थान ज्याचें, त्याच्या ज्ञानानें मुक्ति सांगितली आहे. तेव्हां ज्ञानावांचून मुक्ति नाहीं आणि ज्ञानाचें व ब्रह्माचें ऐक्य सांगितलें आहे. ह्याकरितां तुह्मींही तें ज्ञान साधण्याविषयींच खटपट करा, ह्मणजे तीच विद्या अद्वैताचा बोध करणारी आहे. तिच्याच सेवनानें तुमच्या मनाची शुद्धि होईल." असें आचार्यांचें तें सप्रमाण भाषण ऐकून त्यांना आपलें मत अगदीं मिथ्या आहे असें वाटून त्यांनीं तत्काल ते कुंकुमाचे ऊर्ध्व पुंड् व बाहूचे ठिकाणीं धारण केलेलीं तीं चिन्हें, ह्यांचा परित्याग करून आचार्यांना गुरु केले, व त्यांच्या आज्ञेनें स्नानसंध्यादिक वैदिक कर्में व पंचोपासना स्वीकारून व शुद्ध अद्वैत मार्गावर श्रद्धा ठेवून आचार्यांचे शिष्य झाले.

**७२ लक्ष्मीभक्तांचें खंडण**—नंतर लक्ष्मीचे भक्त येऊन आचार्यांना वंदन करून बोलले कीं, "सर्व फल देण्याविषयीं लक्ष्मीच समर्थ आहे. तिलाच परमपुरुषाची प्रकृति असें वेदांनीं ह्मटलें आहे. ब्रह्मादि देव तिच्याचपासून उत्पन्न

झाले. ह्याकरितां मुमुक्षूंनीं तिचेंच सेवन करणें योग्य आहे. तिचें जे आराधन करितात; पद्माक्षांची माळा आदिकरून तिचींच चिन्हें जे कोणी धारण करितात; बाहूवर कमल व कपाळावर कुंकुम धारण करणारे जे कोणी आहेत, त्यांच्याच हातांत मोक्ष आहे. करितां तुह्मींही तिची सेवा करावी." हें सर्व भाषण ऐकून घेऊन आचार्यांनीं उत्तर दिलें "बाबांनो! परमात्म्यावांचून दुसरा कोणी श्रेष्ठ नाहीं. तोच ब्रह्मस्वरूपी, अद्वितीय, आनंदरूपी असा आहे. ह्याकरितां त्याच्या आधीन असणारी प्रकृति तिला मुक्त करण्याचें सामर्थ्य नाहीं. तेव्हां आपण जें ह्मणतां त्या मताची संगती बरोबर लागत नाहीं. आतां **'अहं ब्रह्मोस्मि'**–ब्रह्म तें मीच आहें. असें जो ध्यान करितो तोच ब्रह्मस्वरूप होतो. आणि त्यालाच मुक्ति मिळते. लक्ष्मीची उपासना करणाऱ्याला अनित्य लोकच प्राप्त होणार. ह्याकरितां तुह्मीं हीं सर्व चिन्हें टाकून देऊन शुद्ध अद्वैतविद्येचा आश्रय करून मुक्त व्हावें. हें आचार्यांचें भाषण श्रवण करून त्यांनीं तत्काल आपल्या चिन्हांचा त्याग करून शुद्ध अद्वैत मार्ग स्वीकारून ते आचार्यांचे शिष्य झाले.

**७३ शारदोपासकांचें खंडण**—नंतर पुस्तक व पुंड्रकादि चिन्हें धारण करणारे शारदोपासक येऊन आचार्यांना वंदन करून बोलले कीं, वेदाला नित्यत्व आहे. ह्याकरितां तत्स्वरूपी जी शारदा तिलाही नित्यत्व आहे. सर्व लोकांना कारण, जगत्कर्त्री, नित्य, असें वाणीचें स्वरुप वेदामध्येंही सांगितलें आहे. ब्रह्मा, विष्णु आदिकरून जीं जीं नांवें आहेत, तीं सर्व तिचींच वाचक आहेत. सत्व, रज व तम ह्या तिन्ही गुणांहून ती निराळी आहे. ह्याकरितां मोक्षाची इच्छा करणारांनीं तिचीच उपासना करावी. त्यावर आचार्यांनीं उत्तर दिलें "वेद हा शब्दस्वरूपी आहे. कंठ व तालुस्थान ह्यांपासून त्याची उत्पत्ति आहे. त्याला नित्यत्व कसें येईल? कारण सर्वांचा लय होतो, तेव्हां वर्णांचाही लय होतो. शिवाय **'यस्य निःश्वसितं वेदाः'** ह्या वाक्यानें परमात्म्याचा जो निश्वास त्यासच वेद ह्मटलें आहे. तेव्हां परमात्मा हाच वेदाचा जनक होय. वेद हा जन्य आहे. आणि **'यज्जन्यं तदनित्यं'** ह्मणजे ज्याला जन्म आहे तें अनित्य असल्याचें सिद्ध आहे. कल्पकालीं वेद हे आपल्या अंगांनीं युक्त असे लीन

होतात असें सूर्यानें ऋषींना कथन केलें आहे. अशी कथा सूर्यसिद्धांतांत वर्णिलेली आहे. आतां वेदांना जरी अनित्यत्व असलें तरी ब्रह्म हें नित्यच आहे. ह्याकरितां वाणीहून पर असें 'सत्' आदिकरून शब्दांनीं वाच्य जें ब्रह्म, तें जाणण्याविषयींच यत्न करावा. तें जाणलें असतां तत्काळ मुक्ति प्राप्त होते. त्यावांचून दुसरें साधन नाहीं, असें वेदामध्यें सांगितलें आहे." ह्याप्रमाणें आचार्यांचें भाषण व युक्तिवाद श्रवण करून ते शारदोपासक शुद्ध अद्वैत मताचें अवलंबन करून आचार्यांचे शिष्य झाले.

**७४ विद्योपासकांचें खंडण**—पुढें वामाचारसंपन्न विद्योपासक असे कांहीं पंडित येऊन आचार्यांना वंदन करून बोलले कीं, "आपलें हें अद्वैत मत वंध्यापुत्राप्रमाणें केवळ शून्य आहे. त्याच्यापासून बोध असा कांहींच होत नाहीं, तेव्हां त्याच्या योगानें मुक्ति कशी मिळेल? ह्याकरितां जिच्या योगानें परेश असा जो भगवान् त्याच्या सर्व क्रिया चालतात, जी साक्षात् विद्यास्वरूप आहे, तिच्या ठिकाणीं भक्ति ठेविली असतां मुक्ति हस्तगत होते, त्यावांचून मुक्तीला अन्य साधन नाहीं. भृग्वादि ऋषींलाही जी मान्य झालेली आहे. जिची सेवा करित असतां विधिनिषेधाची प्रवृत्तीच होत नाहीं. ह्यास्तव आपण सर्वांनीं तिचाच आश्रय करून मुक्त व्हावें. तेव्हां आचार्य बोलले "ऐका. आत्म्यावांचून सर्व अनित्य आहे असें वेदांमध्यें सांगितलें आहे, व चिदात्मा प्रकृतीनें पर ह्मणजे भिन्न आहे. निषेधाला बाजूला सारून '**कलंज**' ह्मणजे विषमुख शस्त्रानें मारलेलें जनावर किंवा त्याचें मांस भक्षण केल्यानें व मद्य प्राशन केल्यानें अगोदर तुमचें ब्राह्मणत्व मात्र नष्ट झालें आहे. ह्याकरितां त्याची निवृत्ति झाली पाहिजे. भृगु व अगस्ति, ह्यांचीं उदाहरणें तुह्मांला योग्य नाहींत. कारण भृगूनें विष्णूला लाथ मारली होती व अगस्तीनें समुद्रपान केलें होतें. ती शक्ति कांहीं तुमच्यामध्यें नाहीं. ह्याकरितां अभक्ष भक्षण करून ब्राह्मण जातीपासून भ्रष्ट झाल्याबद्दल तुह्मी आधीं प्रायश्चित् घेऊन शुद्ध अद्वैताचा मार्ग स्वीकारा." अशी आज्ञा होतांच त्याप्रमाणें प्रायश्चित्तें घेऊन विद्योपासक पंडित होते तेही आचार्यांचे शिष्य झाले.

**७५ जंगमांचा पराभव**—ह्याप्रमाणें रामेश्वरामध्यें आचार्यांनीं भिन्न भिन्न

शाक्तमतांचें खंडण करून, श्रीरामेश्वराची पूजा केली आणि तेथून श्रीकांची क्षेत्रीं जाऊन तेथें दोन महिने वास्तव्य केलें. त्या कालांत अद्वैतमताचा द्वेष करणारे आपल्या बाहूवर शिवाचीं चिन्हें धारण करणारे असे जंगम येऊन वाद करूं लागले कीं, "हे आचार्य! सर्व देवतांमध्यें विरूपाक्ष हेंच दैवत श्रेष्ठ असून मुमुक्षूंना शरण जाण्यास तेंच योग्य आहे. शिवाचीं चिन्हें जे कोणी धारण करितात त्यांस शिवलोकाची प्राप्ती होते. जगताला कारण कोण? अशी शंका उत्पन्न झाली, तेव्हां "पुराणा देव तो मीच; माझ्यापासून सर्व उत्पन्न झालें." असें साक्षात् शंकरानें सांगितलें आहे. ह्मणून उत्पत्ति, पालन करणाराही तोच. कारण, "**रुद्राणां शंकरश्चास्मि**" ह्मणजे रुद्रांमध्यें शंकर ही माझी विभूति आहे असें भगवंतानें गीतेमध्यें ह्मटलें आहे. शिवाय दुर्वासांना शंकरानें उपदेश केला त्यांत "**अहमेकाक्षरः कर्ता**" ह्मणजे अक्षर असा मीच एक कर्ता आहें, इत्यादि विशेषणें आहेत. आणखी सर्वांस कारण मीच आहें असा उपदेश करून शेवटीं भस्म रुद्राक्ष धारण करण्यास सांगून महादेवाची पूजा करा असें सांगितलें आहे. आतां "**आसीन्नारायणः नेशानो न विधिस्तथा**" ह्मणजे पूर्वी नारायणच होता, शंकर किंवा ब्रह्मा हे नाहींत. येथें नारायण या शब्दानें शंकरच घेणें उक्त आहे. ह्याकरितां ईश्वराराधना व त्याच्या चिन्हाचें धारण हेंच मुक्तीला कारण आहे." असें ऐकून आचार्य ह्मणाले "तुह्मी जीं चिन्हें धारण करितां त्यांस कांहीं प्रमाण नाहीं. करितां त्यांचा त्याग करावा. कारण, देहावर देवता असतात, असें श्रुतीमध्यें प्रमाण आहे, व तें ब्रह्मदेवानें अरुणकेतूला सांगितलें आहे, ह्मणून त्यांना या चिन्हधारणापासून ताप होतो, व त्या देवता त्यांस शाप देऊन निघून जातात. आणि मग हा देह पतित होऊन काष्ठवत् राहतो. ह्याकरितां विनाकारण देह भाजून चिन्हें धारण करूं नयेत. आणि व्याधीवांचून ब्राह्मणाचे अंगावर चिन्हें पाहिलीं तर त्या दोषपरिहारार्थ सूर्यावलोकन करावें अथवा स्नान करावें असें सांगितलें आहे, ह्मणून सर्वव्यापक सर्वाधीश जो आत्मा, त्याच्या ध्यानानें व ज्ञानानेंच मोक्ष आहे. ह्याकरितां गुरूपासून आत्मविद्या प्राप्त करून घेऊन अभेदरूपानें अमृताच्या पानानें तृप्त व्हावें." असें आचार्यांचें भाषण ऐकून ते तत्काल अद्वैत मताचें अवलंबन करून आचार्यांचे शिष्य बनले.

७६ **शैवांचें खंडण**—नंतर भस्म रुद्राक्ष धारण करणारे व लिंगादि चिन्हें ज्यांनीं धारण केलीं आहेत असे कांहीं शैव आचार्यांकडे येऊन मोठ्या रागानें बोलले कीं, "हे यति ! तूं केवळ काषाय वेष धारण केला आहेस, आणि अज्ञानानें तूं सत्यमतापासून भ्रष्ट करणारा आहेस. तूं आजपर्यंत पुष्कळांस फसविलेंस. पण आज कोठें जातोस पाहूं ! शुष्क मतें जिंकल्यामुळें गर्व करूं नकोस. आतां आमचें मत ऐक. ब्राह्मणांत वैष्णव हे श्रेष्ठ आहेत; आणि त्याहून शैव हे श्रेष्ठ आहेत. असें अज जो विष्णु त्यानें नारदाला सांगितलें आहे. तेव्हां जे त्या शैव पदावर चढले, त्यांस तूं खालीं पाडण्याविषयीं यत्न करितोस हें योग्य नाहीं. **'नमस्ते रुद्र'** इत्यादि वाक्यानें वेदांमध्यें महेश्वर जो शिव, त्याचीच स्तुति आहे, व सर्वभूतीं तोच व्यापलेला आहे. सर्व श्रुतींमध्यें त्यालाच जगत्कारण मानलेलें आहे. ह्मणून त्याचीं चिन्हें व भस्मरुद्राक्ष ह्यांचें धारण तसेंच त्याचें अर्चन, रुद्राध्यायाचा जप हीं केलीं असतां सर्व पापापासून मुक्त होऊन तो प्राणी शिवरूप होतो. असें रुद्रकांडामध्यें उत्तम रीतीनें पतिपादन केलें आहे. सुरादान, ब्रह्महत्या, गुरुस्त्रीशीं गमन, इत्यादि महापातकांनीं जरी युक्त असला, तरी भस्मधारणानें व रुद्राध्यायाच्या जपानें तो सर्व पातकापांसून मुक्त होतो असें शिवगीतेंत सांगितलें आहे. तसेंच पाशुपतदीक्षा धारण करून शिवसहस्रनामाचा जप करील, तर तोही मनुष्य देह सोडून शिवस्वरूप होईल, व पुढें शंकरापासून कैवल्यपदाचीही प्राप्ती होते असें कालाग्निरुद्रोपनिषदांत सांगितलें आहे." असें भाषण ऐकून आचार्य बोलले "तप्त तनु करणें ती अग्निदाहानें करून उपयोगी नाहीं. तर ती कृच्छ्र चांद्रायणादिक तपानें झाली पाहिजे. असा **"अतप्ततनूर्न तदामो अश्नुते"** ह्या श्रुतीचा अर्थ आहे. नाहींतर बृहन्नारदीय पुराणांत निषेध सांगितला आहे त्याला विरोध येईल. कारण, त्यांत लिंगादि चिन्हें धारण करूं नये याविषयीं निषेध सांगितला आहे व मार्तंडपुराणामध्येंही स्पष्ट सांगितलें आहे. ह्मणून लिंगादि चिन्हें धारण न करितां **'यतो वाचो निवर्तन्ते'** इत्यादि श्रुतीनें प्रतिपादन केलेलें जें ब्रह्म, त्याची साक्षात् उपासना आरंभीं करितां येत नाहीं. ह्याकरितां त्याच ब्रह्माचा अवतार जो शिव, त्याची उपासना वेदामध्यें सांगितली

आहे. तिचें निराकरण करण्याविषयीं कोणीही समर्थ नाहीं. तसेंच भस्म व रुद्राक्ष हीं धारण करावींत, परंतु लिंगादि चिन्हें धारण करण्यास प्रमाण नाहीं. ह्याकरितां तीं धारण करणें बरोबर नाहीं." असें आचार्यांचें भाषण ऐकून ती बुद्धि टाकून देऊन अद्वैतमताचा स्वीकार करून तेही आचार्यांचें शिष्य झाले.

**७७ अनंतशयनस्थ वैष्णवांचें खंडण**—नंतर आचार्य सर्व शिष्यांसहवर्तमान अनंतशयनास गेले. हें क्षेत्र त्रावणकोरच्या राज्यांत आहे. ह्यालाच हल्लीं '**त्रिवेंद्रम**' असें ह्मणतात. त्रावणकोरचें राजधानी शहर हेंच होय. येथें भगवंताची मूर्ति शेषावर निजलेली अशी आहे. हिची लांबी तीन खण असून त्या मूर्तीचें दर्शन तीन कमानींतून घ्यावें लागतें. ह्मणून ह्या शहरालाही प्राचीन कालापासून अनंतशयन असेंच नांव आहे. तेथील राजांनीं आपलें सर्व राज्य ह्याच देवाला अर्पण केलेलें आहे, व आपण त्याचे सेवक ह्मणून त्याची वहिवाट करितात. ह्या ठिकाणीं आचार्यांची स्वारी गेली व देवदर्शन वगैरे करून तेथें एक महिनापर्यंत मुक्काम केला. तेव्हां तेथें सहा प्रकारचे वैष्णव[1] येऊन त्यांस भेटले. त्यांना आचार्यांनीं प्रश्न केला कीं, "तुमचें लक्षण काय ?" तेव्हां ते ह्मणाले "ज्या वासुदेवानें रामकृष्णादि अवतार धारण केले, त्याची उपासना केली असतां त्याचे भक्त सलोकता मुक्ति पावतात, असें कौंडिण्य ऋषीचेंही मत आहे. आमचा आचार दोन प्रकारचा आहे. एक क्रिया, आणि दुसरें ज्ञान. त्यांत ब्रह्मगुप्त आदिकरून जे लोक आहेत, ते कर्मठ आहेत, व विष्णुशर्मा आदिकरून जे आह्मी, ते ज्ञानसंपन्न असे येथें राहतों." नंतर विष्णुशर्म्यानें आचाराबद्दल प्रश्न केल्यावरून आचार्य सांगूं लागले कीं "ज्याच्या सत्तेवांचून एक पान सुद्धां हालत नाहीं असा जो ईश, त्यानेंच वैदिक मार्ग उत्पन्न केला. "**जन्मना जायते शूद्रः कर्मणा जायते द्विजः**" या वाक्यावरून ब्राह्मण जन्मास येतो त्या वेळेस शूद्रवत् असतो व नंतर संस्काररूपकर्मानें ब्राह्मणत्व पावतो. ब्राह्मणानें संध्यादिक कर्में केलीं पाहिजेत, नाहींतर तो

१ भक्ता भागवताश्चैव वैष्णवाः पांचरात्रिणः । वैखानसाः कर्महीनाः षड्विधा वैष्णवा मताः ॥१॥ असे सहा प्रकारचे वैष्णव मानलेले आहेत.

दोषी होतो. तसेंच अग्निहोत्रादिक कर्मेंही करावींत ह्मणजे तो सुखी होतो. याविषयीं "**प्रतिरादिषु कालेषु अग्निहोत्रादिकं बुधः कुर्वन्वै ब्राह्मणो विद्वान्सकलं भद्रमश्नुते ॥**" इत्यादि वेदवाक्यें प्रमाणें आहेत. ह्मणून श्रुतीनें सांगितलें आहे कीं, सर्वांनीं कर्में अवश्य केलीं पाहिजेत. जो तसें करित नाहीं, त्याला प्रलयकालपर्यंत नरकवास प्राप्त होतो." इत्यादि आचार्यांचे विचार श्रवण करून विष्णुशर्मा आदिकरून सर्व वैष्णव आचार्यांना शरण येऊन कर्मलोपाबद्दल प्रायश्चित्त घेऊन कर्मनिष्ठ झाले. विष्णुशर्मा स्मार्ताचारसंपन्न होऊन पांचही देवतांची उपासना करूं लागला. नंतर ब्रह्मगुप्तादिक येऊन आचार्यांना वंदन करून त्यांच्यापासून ज्ञानसंपन्न होऊन कृतार्थ होत्साते तेही अद्वैतमताचा स्वीकार करून पंचायतनाचे उपासक बनले. त्याप्रमाणें अन्य जीं कांहीं विष्णु व शिव यांचा भेद करणारीं मतें होतीं त्या सर्वांचें आचार्यांनीं श्रुतिवाक्यप्रमाणानें व युक्तीनें खंडण करून अद्वैतमताचें स्थापन केलें. नंतर हिरण्यगर्भोपासक येऊन ह्मणाले "ब्रह्मदेवच मुख्य आहे." आणि एकदेशीय श्रुतिवाक्यानें तें सिद्ध करूं लागले. तेव्हां त्यांचेंही आचार्यांनीं खंडण करून अद्वैतमताची दीक्षा देऊन त्यांसही आपले शिष्य केले. नंतर कोणी अग्न्युपासक, कोणी सूर्योपासक, असे जे कोणी वादास आले, त्यांचेंही खंडण करून नेहेमींप्रमाणें आपल्या शिष्यवर्गांत सामील केलें.

७८ **गाणपत्य मताचा परिहार**—नंतर आचार्यांची स्वारी सर्व शिष्यसमुदायासह गणवर ह्मणून एक नगर आहे तेथें गेली, व तेथील कौमुदी नदीमध्यें स्नान करून तेथील मुख्य देवता जो गणपति, त्याची पूजा करून तेथें एक महिनापर्यंत वास्तव्य केलें. तेव्हां आचार्यांचा तो थाट व अद्वैत मत प्रतिपादन करण्याची शैली, हीं पाहून तेथील पंडित अगदीं थक्क होऊन गेले. आणि आचार्यांकडे येऊन ह्मणूं लागले कीं, "हें आपलें मत चांगलें नाहीं. कारण ब्रह्म हें मनाला व वाणीला अगोचर आहे; तर तें फलद्रूप कसें होईल ? व अज्ञानांना त्याचा बोध तरी कसा होईल ? ह्याकरितां आमचें गाणपत्य मत आपण स्वीकारावें. आमच्या मताचे सहा भेद आहेत, व ते श्रुतिप्रमाणानें सिद्ध आहेत." असें ह्मणून त्याला ते प्रमाणें वगैरे दाखवूं लागले.

तेव्हां त्यास आचार्य बोलले–" हे मूढ हो ! जो गणपति शिवाचा पुत्र, त्याला जगत्कारण कसें संभवेल ? शिवाय पुत्र पित्याला उत्पन्न करतो असें तरी कसें होईल?" अशा प्रकारें त्यांचें सप्रमाण खंडण करून आचार्यांनीं त्यांसही आपले शिष्य करून अद्वैतमार्गी बनविलें. नंतर हरिद्रा गणपति, उच्छिष्ट गणपति, नवनीत गणपति, वगैरे जे गणपतीचे भेद, त्यांची उपासना करणारे येऊन ती ती देवताच मुख्य आहे असें प्रतिपादन करूं लागले. तेव्हां आचार्यांनीं सर्वांचें समाधान करून ब्रह्म हेंच मुख्य उपासक दैवत आहे. पण त्याची उपासना करितां येणें कठीण, ह्मणून त्याचेच अंश अशीं पांचही दैवतें उपास्य आहेत. ह्याकरितां सर्वांनीं त्यांचीच उपासना करावी. असें सांगून त्यांना अद्वैत-मार्गी केलें. तेव्हां ते पांचही देवांची ह्मणजे पंचायतनाची पूजा करूं लागले.

**७९ शिवगणमतांचें खंडण**—नंतर कुमार, गणपति, भैरव आदीकरून जे शिवाचे गण, त्यांचे पूजक हेरंबसुत इत्यादि होते, ते येऊन आचार्यांना ह्मणाले कीं, "हें संपूर्ण जगत् गणपत्यात्मकच आहे, असें आह्मी समजतों. तेव्हां आपण आह्मांला दोष कसा काय देतां ?" तेव्हां आचार्य ह्मणाले "हे मूढ हो ! तुह्मांला शास्त्रतत्त्व माहित नाहीं. तें सांगतों, ऐका. पुरुषाधिष्ठित जी प्रकृति, तिच्यापासून प्रथम महत्तत्व उत्पन्न झालें. आणि त्यापासून अहंकार उत्पन्न झाला. तो सत्व, रज, तमात्मक असून रुद्र, विष्णु, ब्रह्मा ह्या स्वरूपानें आहे. नंतर रुद्रापासून गणपति, कुमार व भैरव हे उत्पन्न झाले. तेव्हां त्यांची पूजा त्या त्या अधिकारस्थानीं करावी. ते संपूर्ण जगताला कारण नाहींत. जगताला कारण, एक ब्रह्मच आहे. याकरितां पांचही देवतांची पूजा ब्रह्मभावानें करावी. हेंच मुक्तीला साधन आहे." असें आचार्यांचें भाषण ऐकून त्या सर्वांनीं आचार्यांस वंदन केलें, व सर्व चिन्हांचा त्याग करून ते आचार्यांचे शिष्य झाले; व त्या वेळेपासून पंचायतनाची पूजा करूं लागून अद्वैतमती झाले.

**८० शिवकांचीची व विष्णुकांचीची स्थापना**—नंतर जेथं अंबरेश या नामेंकरून मूर्तिमंत शंकर वास करितो, अशा कांची नगरीस आचार्यांची स्वारी शिष्यांसहवर्तमान गेली, व तेथें एक महिनापर्यंत मुक्काम केला. तितक्या

अवकाशांत एक देवाचें उत्तम मंदिर तयार करविलें, व त्यांत शंकराची प्रतिष्ठा केली, आणि त्या नगराला शिवकांची असें नांव दिलें. आणि तेथून जवळच दुसरें एक देवालय बांधून त्यांत विष्णूची स्थापना केली व त्याला विष्णुकांची असें नांव दिलें. आणि ह्या दोन्ही ठिकाणीं पूजा वगैरे करण्याकरितां ब्राह्मणाची व भक्तजनांची नेमणूक करून सर्व व्यवस्था लाऊन दिली. हीं दोन्हींही स्थळें अद्याप प्रसिद्ध आहेत.

८१ **भेदवाद्यांचें खंडण**—तदनंतर त्या देशांतील ताम्रपर्णा नदीतीरीं राहणारे कांहीं भेदवादी येऊन आचार्यांना ह्मणाले कीं, "महाराज! ह्या लोकीं भेदभाव प्रत्यक्ष असून परलोकींही त्या त्या प्रमाणें व त्या त्या देवतेच्या उपासनेनें त्या त्या देवतेच्या लोकांची प्राप्ती होते. असें श्रुति पुराण इत्यादि ग्रंथांकरून सिद्ध आहे. तेव्हां भेद हा सत्य आहे, असें आह्मी ह्मणतों. आणि आपण तर सारा अभेद वर्णन करितां हें कसें?" असा प्रश्न केल्यानंतर आचार्य बोलले कीं, "हें जें तुह्मी ह्मणतां तें वेदांचा अर्थ न समजल्यामुळें ह्मणतां. कारण "**[1]सर्वमात्मैवाभूत्तत्केन संपश्येदिति**" इत्यादि श्रुतींनीं तत्वज्ञान होऊन त्या ज्ञानानें पापपंजर दग्ध झाल्यानंतर मुक्त दशेंत भेदाचा अभावच प्रतिपादन केला आहे. तसेच "**[2]तत्सृष्ट्वा तदेवानु प्राविशत इति**" या वाक्यानें "**[3]अनेन जीवेनात्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणीति**" इत्यादि श्रुतिवाक्यांच्या तात्पर्यांनीं जगत्कर्तृ ब्रह्माचाच जीवरूपानें या जगतामध्यें प्रवेश आहे. तसेंच देव किती आहेत? असा उपक्रम करून अखेर एकच देव अंतर्यामित्वानें आहे, असें श्रुतीनें सांगितलें आहे. व "**[4]बहुस्यां प्रजायेय**" इत्यादि श्रुतींनीं भोक्तृभोग्यात्मक जो सकल प्रपंच, त्याला परमार्थतत्व सांगितलें आहे. ह्याकरितां सर्वज्ञ, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, अशा स्वभावानें युक्त, सर्वांना अधिष्ठानभूत, अशा ब्रह्माचीच मुमुक्षूंनीं उपासना करावी. ह्मणून तुह्मी जीव व परमात्मा ह्यांचा

१ सर्वच जर आत्मस्वरूप आहे, तर कोणीं कोणाला पहावयाचें? २ तें जग, उत्पन्न करून त्यांतच स्वतः प्रवेश करिता झाला. ३ त्या जीवस्वरूपानें आत्म्याशीं प्रवेश करून नामरूप पावला. ४ पुष्कळ प्रकारानें झाला.

भेद व देवतांचा भेद टाकून शुद्ध अद्वैत ब्रह्माच्याच उपसनेनें मुक्त व्हावें." असें सांगितल्यावरून उपरिनिर्दिष्ट कांची, ताम्रपर्णी इत्यादि देशांत राहणारे लोकही शुद्ध अद्वैत मार्गाला लागले.

८२ **ऋकचाचा वध**—नंतर कांहीं आंध्रदेशांतून आलेल्या लोकांनाही ह्याचप्रमाणें उपदेश करून व त्यांना अनुग्रह देऊन आचार्य श्रीव्यंकटेशगिरीला गेले. तेथें त्या देशच्या राजानें आचार्यांचा फार मोटा सत्कार करून पूजा वगैरे केली. नंतर आचार्यांनीं तेथें आपल्या शिष्यांकडून भैरव मतांचें खंडण करवून त्यांना आपलें मत ग्रहण करावयास लावलें. नंतर आचार्य कर्नाटक प्रांतीं जावयास निघाले तेव्हां त्या राजानें विनंती केली कीं, "महाराज ! आतां आपण ज्या प्रांतीं जाण्याची इच्छा करित आहां तिकडे आपल्या कीर्तीचा द्वेष करणारे व भैरवाची उपासना करणारे कापालिक महाक्रूर असे बहुत लोक आहेत. ह्याकरितां तिकडे आपण फार सावध असलें पाहिजे." असें राजाचें भाषण ऐकून आचार्यांच्या शिष्यांमध्यें सुधन्वा राजा होता. तो ह्मणाला "महाराज ! कांहीं चिंता नाहीं. मी बरोबर असतां कोणत्याही प्रकारें काळजी करण्याचें कारण नाहीं. ते कपाली कितीही क्रूर असोत; किंवा कसेही पराक्रमी असोत; माझ्यापुढें त्यांचें कांहीं चालावयाचें नाहीं." ह्याप्रमाणें सांगितल्यानंतर आचार्यांची स्वारी सुधन्वाराजासह व इतर शिष्यांसह कापालिकांस जिंकण्याकरितां उज्जनीला गेली. आचार्यांची स्वारी आली असें ऐकतांच तेथील कापालिकांचा राजा '**ऋकच**' या' नांमेंकरून होता तो आंगास चिताभस्म लावून हातांत नरकपाल ह्मणजे मनुष्याच्या मस्तकाची कवटी घेऊन आचार्यांकडे आला, आणि मोठ्या गर्वानें ह्मणाला "हे संन्याशा ! तूं भस्म वगैरे लावलें आहेस हें ठीक आहे. परंतु हातांत पवित्र नरकपाल घ्यावयाचें सोडून हें भिकार खापर कशाकरितां घेतलें आहेस ? आणि तूं कपाली जो भैरव, त्याची पूजा कां करित नाहींस ? क्षुद्र देवता पूजून काय उपयोग ? अशानें त्या भैरवाचा संतोष कसा होईल ?" अशा प्रकारें त्यानें अद्वातद्वा बडबड चालविली. तेव्हां हा कोणीतरी कुत्सित पुरुष आहे, असें समजून सुधन्वाराजानें त्यास तेथून हांकून लाविलें. तेव्हां त्याला मोठा राग येऊन त्यानें भोंवया चढविल्या व दांत ओंठ खाऊन

डोळे लाल केले. आणि हातांतील शस्त्र वर उचलून आवेशानें ह्मणाला "ठीक आहे. पाहून घेईन. तुमचीं सर्वांचीं मस्तकें या शस्त्रानें जर तोडून टाकलीं नाहींत तर नांवाचा क्रकचच नव्हें." असें बोलून पाय आपटीतच तो निघून गेला. आणि आपली जमात जमवून तीस त्यानें आपला झालेला अपमान सांगून त्यानें त्यांस आचार्यांच्या सर्व मंडळीचा नाश करण्यास पाठवून दिलें. तेव्हां ते कापालिक येऊन आचार्यांच्या शिष्यांना व इतर ब्राह्मणांनाही त्रास देऊं लागले. हें पाहून सुधन्व्यानें युद्धाची तयारी केली. तेव्हां उभयतांत चांगलीच लढाई जुंपली. त्यांत सुधन्व्यानें त्या कापालिकांचा फार नाश केला. पण सुधन्वा इकडे युद्ध करित असतां दुसरे कांहीं कापालिक आचार्यांकडे येऊन त्यांनीं आचार्यांच्या इतर शिष्यांचा नाश करण्यास प्रारंभ केला. तेव्हां आचार्यांचे सर्व शिष्य भयभीत होऊन ते आचार्यांस शरण आले, व आमचें रक्षण करा असें ह्मणूं लागले. तेव्हां आचार्यांनीं तो प्रकार पाहून एका हुंकारानें सर्व कापालिकांचा नाश केला. याप्रमाणें आपल्या सर्व सेनेचा नाश झाला असें पाहून क्रकचाला फारच संताप चढला आणि हातांत मद्यानें पूर्ण भरलेलें नरकपाल घेऊन आचार्यांजवळ आला आणि त्यांतील अर्धें प्राशन करून त्यानें भैरवाचें ध्यान केलें. त्याबरोबर प्रत्यक्ष भैरवाची मूर्ति प्रगट होऊन पुढें उभी राहिली आणि "माझें ध्यान कशाकरितां केलेंस?" ह्मणून त्यानें क्रकचाला विचारलें असतां क्रकच ह्मणाला "महाराज! हा संन्याशी व यांचे लोक हे आपल्या भक्तांचा द्रोह करणारे आहेत तरी त्यांचा वध करावा." हें त्या क्रकचाचें भाषण ऐकून भैरवानें आपले डोळे लाल केले आणि संतप्त होऊन बोलला कीं, "हा संन्याशी दिसतो, पण संन्याशी नव्हे; हा साक्षात् माझाच अवतार आहे. तो मत्स्वरूप आहे; असें असतां तूं त्याचा द्रोह कसा केलास? हा तुझा मोठा अपराध आहे. ह्याकरितां त्याजबद्दल तुलाच शासन केलें पाहिजे". असें बोलून रागारागानें त्या क्रकचाचाच शिरच्छेद केला. तेव्हां आचार्यांनीं भैरवाची स्तुति केली आणि हात जोडून ह्मणाले "महाराज! आपल्या ह्या भक्तांनीं आमचा अपराध केल्यामुळें माझ्या शिष्यांनीं त्यांस ताडण केलें ह्मणून त्यानें आपलें स्मरण केलें. नंतर जें काय झालें तें आपणास विदितच आहे." तेव्हां

भैरव बोलले.–" वितंडवादी, वाममार्गी ब्राह्मणांस दंड करण्याकरितांच आपण अवतार धारण केलेला आहे. आपण साक्षात् शंकर आहां, ह्याकरितां आपण जें काय कराल तें मला मान्य आहे. आतां हे जे अन्य कापालिक माझे भक्त आहेत, त्यांना ब्राह्मणाचारसंपन्न करावेत. मी ह्यांना येऊन जें प्रत्यक्ष दर्शन देत असें, त्याचें कारण, मी मंत्रबद्ध होतों ह्मणून. त्यांच्या आचारानें किंवा भक्तीनें मी कांहीं त्यांना वश होत नाहीं." असें सांगून भैरव अतंर्धान पावले. पण हें भाषण जेव्हां इतर कापालिकांनीं ऐकलें तेव्हां भयानें त्यांची अगदीं गाळण होऊन गेली, व ते आचार्यांना शरण जाऊन त्यांनीं त्यांची प्रार्थना केली कीं " महाराज ! आह्मी मूढ आहोंत. आह्माला कांहीं कळत नाहीं. ह्याकरितां आतां आपण आमचें रक्षण करावें. कारण आपण " **कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं** " समर्थ आहां. आह्मी आपल्यास शरण आहों." अशी त्यांची प्रार्थना ऐकून आचार्यांनीं कृपाळु होऊन आपल्या शिष्यांना त्यांस शुद्ध करून घेण्याविषयीं आज्ञा केली. तेव्हां पद्मपादादि शिष्यांनीं त्यांना ब्रह्मकर्माचा मार्ग सांगून पांचही देवांची उपासना सांगितली. नंतर ते परम गुरूचा आश्रय करून पंच महायज्ञ करणारे असे आचार्यांचे शिष्य बनले.

**८३ चार्वाक मताचें खंडण**—नंतर नास्तिकमताग्रणी जो चार्वाक, तो सभेमध्यें येऊन बोलला कीं आपण वेद प्रमाण मानतां, हें ठीक नाहीं, व त्यांतील तात्पर्यही चुकीचें आहे. देह व आत्मा हा भेद चुकीचा आहे. देहाचा लय होणें हाच मोक्ष होय. यापेक्षां निराळा आणखी कांहीं मोक्ष आहे ह्मणतात, ते मूर्ख होत. तें त्यांचें ह्मणणें खोटें आहे. जो मृत होतो त्याला पुन्हा जन्म नाहीं. कारण, समुद्रांत गेलेलें नदीचें पाणी जसें पुन्हां परत येत नाहीं, त्याचप्रमाणें प्राणी एकदा मरण पावला असतां पुन्हां जन्माला येत नाहीं. ह्मणून देहाचा लय हाच मोक्ष होय. आतां मृताचें श्राद्ध केलें असतां मृत झालेल्याची तृप्ती होते, असें वेद ह्मणतो, त्यांत अर्थ कोणता ? खालच्या मजल्यावरचें जेवण जर संकल्पानें वरच्या मजल्यावर जात नाहीं, घरीं जेवल्यानें जर प्रवासांतील भूक थांबत नाहीं, तर त्यांत तथ्यांश तो काय ? शिवाय स्वर्ग आहे, नरक आहे, पुण्यानें स्वर्ग मिळतो;

पापानें नरक प्राप्त होतो, असें ह्मणणेंही बरोबर नाहीं. कारण, जो सुखाचा भोक्ता आहे, त्याला तो सुखोपभोगच स्वर्ग आहे. दुसऱ्या स्वर्गाचा उपयोग काय? दुःख प्राप्त होणें हाच नरक होय. मिळून जें काय सारें आहे तें ह्याच ठिकाणीं आहे. आणि अनुभवही असाच आहे. ह्मणून प्रत्यक्ष प्रमाण व अनुभव असतां परलोकीं जातो असें ह्मणणें हें निराकार जीवाला संभवतें तरी कसें? खरोखर विचार केला तर परलोक वगैरे कांहीं नाहीं. ह्मणून वेदांतील मत व आपलें मत हीं दोन्हीं सयुक्तिक नव्हेत. ह्मणून मान्य करण्यास योग्य नाहींत." असें भाषण ऐकून आचार्य बोलले कीं, "हें तुझें मत श्रुतिबाह्य आहे. ह्या-करितां प्रमाण धरितां येत नाहीं. आतां माझें मत काय आहे तें ऐक. देहाहून आत्मा भिन्न आहे; व तो मुक्त आहे. त्या आत्म्याच्या ज्ञानानें मुक्ति होते असें श्रुतीनें सांगितलें आहे. "**ज्ञानाग्निदग्धकर्माणो यान्ति ब्रह्म सनातनं**" अशी जी श्रुति आहे, ती जर प्रमाण न मानली, तर तुझें कुत्सित ह्मणणें तरी प्रमाण कसें मानावें? आतां स्थूल देह दग्ध झाला तरी तो लिंग-देहानें परलोकीं गमन करितो, ह्याविषयीं ज्योतिष्टोमादिक वाक्यें प्रमाण आहेत. हा जीव एका देहांतून दुसऱ्या देहांत जातो तो '**जलौके**' प्रमाणें जातो. जलौका ह्मणून एक किडा आहे. तो प्रथम आपलें पुढचें आंग जमिनीवर टेंकतो, आणि मागचें आंग सोडून देतो. त्याप्रमाणें मृताचें प्रेतत्व नाहींसें होण्याकरितां व पुण्यलोकप्राप्तीकरितां पुत्रानें श्राद्धादिक हीं अवश्य केलीं पाहिजेत, व मुक्ति होण्याकरितां गयेमध्यें पिंडदानही करावें. अशीं स्मृति व पुराणें ह्यांतही प्रमाणें आहेत. हीं प्रमाणें जर तुला मान्य नसतील, तर तूं मूढ आहेस. ह्याकरितां निघून जा. कारण, तूं वादालाच योग्य नाहींस." असें आचार्यांचें भाषण ऐकून त्यानें आपला वेष व भाषण ह्यांचा त्याग करून तत्काल आचार्यांचे चरणावर मस्तक ठेऊन त्यांस शरण आला व त्यांचा शिष्य झाला.

**८४ किरकोळ मतें व त्यांचें खंडण**—नंतर सौगत, क्षपण, जैन, बौद्ध इत्यादिक मताभिमानी येऊन त्यांनीं आपआपलीं मतें प्रदर्शित केलीं. तेव्हां आचार्यांनीं त्या सर्वांचें सप्रमाण खंडण करून वेदमार्ग स्थापित केला. आणि शिष्यांसह

स्वारी निघाली ती अनुमल्ल पुरीला गेली. आणि तेथें एक दिवस मुक्काम केला. तेथें मल्हारीचे भक्त येऊन मल्हारी हाच मुख्य दैवत आहे असें ह्मणूं लागले. तेव्हां आचार्यांनीं त्यांचें श्रुतिवाक्यानें खंडण करून प्रायश्चित्त देऊन त्यांसही शुद्ध अद्वैतमार्गी बनविलें. नंतर तेथून पश्चिम दिशेला मरुंथ ह्मणून एक नगर आहे, तेथें गेले. तेथें विष्वक्सेन मताचें खंडण करून त्यांस आपले शिष्य केले. नंतर मन्मथाचे भक्त आले तेही मुख्य मोक्षदाता मन्मथच आहे असा वाद करूं लागले. तेव्हां आचार्य बोलले कीं " हें तुमचें मत अगदीं वाईट आहे. कारण, अंगहीन जो मदन, त्याला मोक्ष देण्याविषयीं शक्ति कशी संभवेल ? शिवाय शंकरांनीं ज्याला जाळून टाकलें, त्याला मुख्यत्व तरी कसें येईल ?" असें ऐकून त्यांनींही आपलें मत सोडून देऊन आचार्यांचे शिष्य झाले.

नंतर आचार्य तेथून निघून मागधपुराला गेले व तेथें कुबेर मताचें व इंद्रमताचें खंडण केलें, व तेथून यमप्रस्थाला जाऊन याम्यमताचें खंडण करून आचार्यांची स्वारी सर्व शिष्यांसह श्रीप्रयागाला आली व तेथें त्यांनीं कांहीं दिवस वास केला. तेव्हां वरुणाचे भक्त येऊन वरुण हाच काय तो मुक्तिदाता आहे असें कांहीं प्रमाणें देऊन प्रतिपादन करूं लागले. तेव्हां आचार्यांनीं त्यांचें-ही युक्तीनें व श्रुतिप्रमाणानें खंडण करून त्यांसही आपलें शिष्य केलें. नंतर शून्यवादी आले, त्यांनांही वादामध्यें जिंकून ब्रह्मोपासक केलें. नंतर वराहमताचे लोक येऊन ते ह्मणूं लागले कीं, " वराह हीच देवता मुख्य आहे. कारण, तोच सर्वांस धारण करितो." इत्यादि प्रतिपादन करूं लागले. त्यांस आचार्यांनीं सांगितलें कीं, " वराह हा विष्णूचा अंश आहे. ह्याकरितां तो मुख्य दैवत कसें होईल ?" इत्यादि अनेक प्रकारें खंडण करून त्यांनाही त्यांनीं अद्वैतमार्गी करून सोडलें. कांहीं लोक आले ते तर लोकसंघ हाच मुख्य होय असें ह्मणूं लागले, तर दुसरे कोणी गुणच मुख्य आहेत असें प्रतिपादन करूं लागले. असे अनेक प्रकारचे लोक येऊन आपआपल्या मताची स्थापना करूं लागले. परंतु त्या सर्वांचें आचार्यांनीं यथायोग्य खंडण करून त्यांसही ब्रह्मोपासक करून

आपले शिष्य केले. तदनंतर सांख्य, कपिल, या मताचें खंडण करून आचार्यांची स्वारी श्रीवाराणशी क्षेत्रीं गेली आणि तेथें तीन महिने वास्तव्य केलें. तेव्हां तेथें कर्मवादी येऊन कर्म हेंच मोक्षाला साधन आहे, असा आक्षेप करूं लागले. तेव्हां आचार्यांनीं उत्तर दिलें कीं, "कर्म हें साक्षात् मोक्षाला साधन नसून तें फक्त मनाच्या शुद्धीकरितां आहे." अशाबद्दल अनेक श्रुतिप्रमाणें दाखवून त्यांना ब्रह्मतत्त्व समजवून देऊन शिष्य केले.

नंतर चंद्र, मंगल, इत्यादि नवग्रहाचे व पितर, गंधर्व, भूतें इत्यादिकांचे उपासक येऊन आपआपल्या उपास्य देवताच सर्व देवांमध्यें श्रेष्ठ असून मोक्ष देणारी आहे, असा वाद करूं लागले. पण त्यांचें सर्व प्रतिपादन केवळ एकदेशीय होतें, ह्मणून आचार्यांनीं त्या सर्वांस ईश्वरांवाचून परतंत्रता आहे याबद्दल **"सूर्यस्तपति यद्भयात्"** इत्यादि अनेक श्रुतिप्रमाणें देऊन 'ब्रह्म हेंच श्रेष्ठ असून तेंच खरें उपास्य आहे." असें सांगून त्यांनांही अद्वैतमार्गी करून आपले शिष्य केले. नंतर आचार्य पश्चिम समुद्रीं जाऊन तेथील पाखंड मतांचें खंडण करून तसेच गोकर्ण क्षेत्रास गेले आणि समुद्राचें स्नान करून महाबळेश्वराची पूजा करून त्यांनीं त्याचा स्तव केला आणि तेथें जे कोणी त्यांना शरण आले त्यांस शिष्य करून त्यांना ब्रह्मतत्त्वाचा उपदेश केला.

८५ **नीलकंठाचा पराभव**—हा आचार्यांचा पराक्रम ऐकून तेथें कोणी हरदत्त नामेंकरून एक ब्राह्मण होता त्यानें आपला गुरु जो नीलकंठ त्यास जाऊन बातमी सांगितली कीं, "कोणीएक शंकराचार्य ह्या नांवाचा संन्यासी आलेला आहे. त्यानें मंडण, भट्टपाद आदिकरून मोठमोठ्या पंडितांना जिंकून त्यांना आपले शिष्य केले आहेत. तो आतां आपल्याला जिंकण्याकरितां येथें येऊन शिवमंदिरांत राहिला आहे." तो नीलकंठही कांहीं कमी नव्हता. त्यानें **"अथातो धर्मजिज्ञासा"** ह्या पूर्वमीमांसेवर भाष्य केलें होतें व तो विद्येचा मोठा व्यासंगी असून एकनिष्ठ असा शिवोपासक होता. तो तें आपल्या शिष्याचें भाषण ऐकून थोडेंसें हास्य करून गर्वानें ह्मणाला "ह्या संन्याशानें सारे समुद्र जरी कोरडे केले; किंवा आकाशांतील सूर्य जरी खालीं उतरला; किंवा आकाशाला जरी गवसणी घातली; किंवा अशीं

कितीही जरी अघटित कृत्यें केलीं, तरी सुद्धां तो मला जिंकावयास समर्थ होणार नाहीं. आतां माझे तर्क, कोट्या, व सिद्धांत दुसऱ्याचें मत खंडन करण्यांत किती तयार आहेत तें आजच त्याच्या दृष्टोत्पत्तीस येईल." असें ह्मणून आंगाला भस्म लाऊन कंठामध्यें रुद्राक्षाच्या माळा घालून शैवशास्त्र ज्यांना पूर्ण अवगत आहे, असे हरदत्त आदीकरून अनेक शिष्य बरोबर घेऊन तो नीलकंठ आचार्यांकडे आला. तेव्हां त्यास दुरूनच आचार्यांनीं पाहिलें. नंतर तो आचार्यांजवळ जाऊन त्यांस वंदन वगैरे न करितां ब्रह्मसूत्र होण्याच्या पूर्वीं कपिलादिकांनीं आपलीं शास्त्रें स्थापन केलीं, त्याप्रमाणें तोही आपल्या मतांचा अभिप्राय स्थापना करूं लागला. तेव्हा सुरेश्वराचार्यांनीं आचार्यांना विनंती केली कीं, "आपण स्वस्थ असावें. मी ह्याच्या बरोबर वाद करितों. आपण उभयतांचा संवाद ऐकावा ह्मणजे झालें." असें ह्मणून ते वाद करण्यास तयार झाले. तेव्हा तो नीळकंठ बोलला कीं, "तुझें वाक्पांडित्य मला माहीत आहे. ह्याकरितां ह्यांनींच स्वतः बोलावें." हें ऐकून आचार्य पुढें झाले, व उभयतांचा वाद सुरू झाला. त्यांत आचार्यांनीं रितीप्रमाणें नीलकंठानें स्थापन केलेल्या मताचें खंडण केलें. तो नीलकंठ आपल्या मताला पुष्टी देण्याचें सोडून अद्वैतमताचें खंडण करण्याचा यत्न करूं लागला. तो ह्मणाला "हे स्वामिन्! आपण जो '**तत्त्वमसि**' या उपनिषद्वाक्यानें जीवेश्वरांचा अभेद मानतां, तो बरोबर नाहीं. कारण, प्रकाश आणि अंधकार यांचे धर्म विरुद्ध असल्यामुळें त्यांचें जसें ऐक्य होणें संभवनीय नाहीं, त्याप्रमाणें जीव आणि ईश्वर ह्यांचेही धर्म विरुद्ध असल्यामुळें अभेद असणें संभवनीय नाहीं." याप्रमाणें अनेक उदाहरणें देऊन त्यानें भेद सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां आचार्य ह्मणाले कीं "आपल्याला '**तत्त्वमसि**' या वाक्याचा अर्थ समजला नाहीं. तो सांगतों ऐका. जीव हा कार्योपाधि आहे व ईश्वर हा करणोपाधि आहे. तथापि त्यांचा चिदंश एकच आहे. ह्याकरितां भागलक्षणेनें[1] दोहोंचें ऐक्यच आहे. त्यांत कोणताही विरोध येत नाहीं." ह्याप्रमाणें शेंकडों प्रमाणें देऊन श्रुतीला विरुद्ध असें जें त्याचें मत त्याचें खंडण

१ कांहींचा स्वीकार व कांहींचा त्याग अशी जी जहदजहल्लक्षणा तिच्या योगानें.

करून त्यांनीं आपलें मत स्थापित केलें. तें पाहून तो नीळकंठ अगदीं फिका पडला. त्यानें आपण केलेलें भाष्य, व गर्व हीं सर्व सोडून देऊन हरदत्त आदीकरून सर्व शिष्यांसह आचार्यांना शरण जाऊन तो त्यांचा शिष्य झाला.

८६ **भट्टभास्करांचा पराजय**—नंतर आचार्य सौराष्ट्र आदि करून देशांमध्यें आपल्या भाष्याचा प्रसार करून तद्देशीय पंडितांकडून धन्यवाद घेऊन द्वारकेस गेले व तेथें शंखचक्रादि चिन्हें धारण केलेले, व ऊर्ध्वपुंड्र लावून कर्णामध्यें तुळशीपत्रें घातलेले, पांच प्रकारचा भेद मानणारे वैष्णव होते, त्यांच्या मताचें आचार्यांनीं खंडण करून जीवेश्वरांमधील अभेद स्थापित केला. आणि वैष्णव, शैव, शाक्त, सौर इत्यादि मतांचें खंडण करून ते उज्जनीला गेले. तेथें महाकालेश्वराचें दर्शन घेऊन त्या देवालयाचे मंडपामध्यें थोडीशी विश्रांति घेण्याकरितां बसून आपण आलों आहों हें सांगण्याकरितां त्यांनीं पद्मपादांना भट्टभास्कर यांजकडे पाठविलें. ते जाऊन भट्टपादांस ह्मणाले "हे आर्य, ज्यांची कीर्ति दिगंतीं गेली आहे, ज्यांनीं अद्वैतमत स्थापन करून विरुद्ध मतांचें खंडण केलें आहे, असे जे प्रसिद्ध जगताचे गुरु शंकराचार्य, ते येथें येऊन श्रीशंकराच्या मंदिरांत राहिले आहेत व त्यांनीं आपल्याला असें सांगितलें आहे कीं, "आपलें मत कुत्सित आहे, ह्याकरितां तें टाकून देऊन अद्वैतमताचा स्वीकार करावा. नाहींतर वादास तयार व्हावें." हें ऐकून भट्टभास्कर बोलले कीं, "असे आणखी किती जरी यति आणि संन्यासी आले, तरी माझ्या मताची एक कपर्दिकही हालणार नाहीं. माझ्या वाणीपुढें, कोणाच्याही वाणीचें पांडित्य चालणार नाहीं." त्यावर पद्मपाद ह्मणाले "असें बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण, दगड फोडण्यांत जो समर्थ असतो, तो हिरा फोडील असें मात्र व्हावयाचें नाहीं." असें बोलून ते आपल्या गुरूकडे आले. नंतर थोड्याच वेळानें भट्टभास्करहीं आचार्यांकडे आले व त्या उभयतांचा वाद सुरू झाला. त्यांत भट्टभास्करांनीं जीवेश्वरामध्यें भेद आहे हें सिद्ध करण्याकरितां अनेक युक्ति व श्रुतिप्रमाणें दिलीं. परंतु आचार्यांनीं त्याचें श्रुत्यर्थ यथार्थ रितीनें लावून त्यांच्या मताचें खंडन करून अभेद स्थापित केला; तेव्हां भट्टभास्करही अद्वैतवादी बनले.

८७ **अभिनवगुप्तादिकांचें खंडण**—नंतर आचार्यांची स्वारी सर्व शिष्यांसह बाल्हिक देशांत संचारार्थ निघाली. त्या वेळीं अर्हत संज्ञक जैनधर्मी, यांचा व आचार्यांचा वाद झाला. त्यांत आचार्यांनीं त्यांस युक्तीनेंच जिंकलें. नंतर वारदादिक देश जिंकून आपल्या भाष्याचें खंडण करणारा जो श्रीहर्ष, त्याच्या बरोबर अनेक प्रकारें वाद करून त्याला जिंकलें. नंतर कामरूप देशांत जाऊन अभिनवगुप्त ह्मणून एक मोठा शाक्त भाष्यकार होता, त्यालाही जिंकलें. तेव्हां त्यानें असा विचार केला कीं, मला जिंकण्याकरितां कोणीही समर्थ नसतां जेव्हां ह्यांनीं मला जिंकलें, तेव्हां हे कोणीतरी देवतांश आहेत ह्यांत शंका नाहीं. ह्याकरितां हे समोरासमोर वाद करून जिंकले जाणार नाहींत. तर कांहींतरी कपट करूनच ह्यांचा नाश केला पाहिजे. तेव्हां मंत्रशास्त्राच्या प्रयोगानें ह्यांचा नाश करावा. असा मनांत हेतु धरून त्यानें आपला गर्व, शक्ति व भाष्य ह्या सर्वांचा बाह्यात्कारी परित्याग केल्याचें निमित्त करून तो आचार्यांपाशीं शिष्यत्वाचें ढोंग करून राहिला.

ह्याप्रमाणें आचार्यांनीं उत्तरेकडील देश जिंकून नंतर अंग, वंग, कलिंद इत्यादि देशांत जाऊन तेथील पंडितांस जिंकून ते गौड देशांत गेले. आणि तेथील राहणारे मुरारमिश्र आदिकरून पंडित यांना जिंकून आचार्यांनीं त्या देशांतही आपली कीर्ति सर्वतोमुखी करून सोडली. ह्याप्रमाणें असंख्य मतांचें खंडन करित करित अनेक देशांत संचार करून अद्वैत मताचें स्थापन केलें व सर्वत्र दिग्विजय करून जगामध्यें शुद्ध अद्वैत मताचा झेंडा लावून सर्वांस अद्वैत मार्गास लाविले.

८८ **भगंदर रोगाचें प्राबल्य**—पूर्वीं सांगितलेंच आहे कीं दिग्विजयाचे वेळीं अभिनवगुप्ताला जिंकल्यापासून तो आचार्यांच्या नाशाविषयीं प्रयत्न करित होता, व योग्य संधि पहात होता. त्यानें आपल्या मंत्रसामर्थ्यानें संधि साधून अभिचारकर्मानें आचार्यांस भगंदर नांवाचा रोग उत्पन्न केला. तेव्हां त्या योगानें आचार्यांच्या देहास फार पीडा होऊं लागली, व तो रोग इतका प्रबळ झाला कीं, त्याची चिकित्सा होणेंही कठीण काम झालें. तेव्हां त्याची सर्व

व्यवस्था ह्मणजे नित्य सकाळ संध्याकाळ त्यास धुणें, त्यास कोणी काय उपाय सांगेल तो करणें, हें तोटकाचार्य स्वतः करित असत. त्या रोगाची अशी भयंकर स्थिति पाहून एकदां सर्व शिष्यांनीं आचार्यांची प्रार्थना केली कीं, " महाराज! आतां ह्यापुढें ह्या रोगाची उपेक्षा करणें चांगलें नाहीं. ह्याकरितां एखादा चांगला वद्य आणून त्यावर उपचार करावा. आपली शरीरावर ममता नाहीं, ह्मणून आपण त्या रोगाच्या पीडेची गणना करित नाहीं, हें ठीकच आहे. पण आपण स्वस्थ असलां तर आह्मी सारे स्वस्थ, ह्यास्तव त्याची चिकित्सा करण्याविषयीं आज्ञा व्हावी ह्मणजे कोणीतरी वैद्य बोलावून आणूं."

ह्याप्रमाणें शिष्याचें भाषण ऐकून आचार्य बोलले कीं, " **प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः** " ह्मणजे भोग जो आहे, तो जन्मांतरींच्या पापपुण्यापासून उत्पन्न होतो. तो भोगल्यावांचून सुटत नाहीं. याकरितां त्याची चिकित्सा जरी केली तरी तो पूर्व कर्म क्षीण झाल्यावांचून क्षयाला पावावयाचा नाहीं. कर्माचा क्षय झाला कीं, तो आपोआपच नाहींसा होईल. ह्मणून त्याची चिकित्सा करण्याची मला इच्छा नाहीं. तेव्हां शिष्य बोलले " महाराज ! आपल्या सारखे जे समर्थ आहेत, त्यांची जरी देहावर प्रीति नसली तरी ते दुसऱ्याच्या हिता-करितां देह रक्षण करित असतात." असा शिष्यांचा आग्रह पाहून आचार्य ह्मणाले, "ठीक आहे. तुमच्या इच्छेप्रमाणें कां होईना ? कोणीतरी चांगला वैद्य आणून उपचार करा. कदाचित् कर्माचा क्षय झाला असला तर उपयोग होईल. तेव्हां शिष्यास आनंद होऊन, त्यांनीं शेकडो रोगांचे ज्यानें अनुभव घेतले आहेत; शेंकडो रोग ज्याच्या हातानें बरे झाले आहेत; असे मोटमोठाले राजवैद्य आणिले, परंतु कांहीं गुण ह्मणून पडेना. तेव्हां सर्व शिष्य मंडळी मोठ्या काळजींत पडली. नंतर त्यांनीं चोहोंकडे जारीनें शोध करून एक राजवैद्य असा आणिला, कीं जो केवळ प्रतिधन्वंतरीच किंवा साक्षात् अश्विनीकुमारच ह्मटलें तरी चालेल. तो वैद्य येऊन पोंहचतांच शिष्यांनीं आचार्यांची प्रार्थना केली कीं " महाराज! हे उत्तम राजवैद्य आणिले आहेत. तेव्हां त्यांस जी कांहीं आज्ञा असेल ती करावी." तेव्हां आचार्यांनीं त्या वैद्याचा योग्य आदरसत्कार वगैरे

करून आपला रोग दाखविला आणि चिकित्सा वगैरे करावयास सांगितलें, आणि ह्मणाले "माझ्या मतानें पूर्वकर्माचा क्षय झाल्यावांचून हा रोग कांहीं बरा व्हावयाचा नाहीं. पण शिष्यमंडळीच्या आग्रहास्तव चिकित्सा करावी असें मनांत आणलें आहे. इतक्या दिवस उपेक्षा करण्याचें कारणही तेंच." हें सर्व श्रवण करून वैद्यांनीं चिकित्सा वगैरे करून औषधोपचार सुरू केले. पण गुण ह्मणून नाहीं. ह्याप्रमाणें बरेच दिवस गेले, तेव्हां एके दिवशीं आचार्यांनीं त्या वैद्यांस जवळ बोलावून सांगितलें कीं, "वैद्यराज! आतां आपण आपल्या गांवीं जावें. कारण इकडे येऊन आपणास बरेच दिवस झाले व आपण राजाचे आश्रित आहां. तेव्हां तेथें जर आपली गरज लागली, तर विनाकारण बोभाटा होऊन न जाणों कदाचित् आपला राजाश्रयही नाहींसा होईल. बरें; तिकडे दुर्लक्ष करून येथें राहण्यापासून कांहीं उपयोग होता तर मग चिंता नव्हती. पण तसा उपयोग कांहीं दिसून येत नाहीं. तेव्हां उगाच कालक्षेप करण्यांत अर्थ कोणता?" असें सांगून त्या वैद्यबुवांची यथायोग्य बिदागी करून रवानगी करून दिली. नंतर आचार्यांनीं आपला रोग औषधापासून बरा होत नाहीं असें जाणून शंकराचें स्मरण केलें. तेव्हां शंकरांनीं अश्विनीकुमारांना आज्ञा केल्यावरून ते ब्राह्मणाचा वेष घेऊन आचार्यांकडे आले आणि निदान करून सांगितलें कीं "हे यतिवर्य! हा आपला रोग कोणीतरी अभिचारकर्म करून उत्पन्न केलेला आहे. याकरितां त्याच्यावर औषधोपचार चालावयाचा नाहीं. मंत्रसामर्थ्यानेंच ह्याच्या उलट प्रयोग केला तर या रोगाचा उपशम होईल. दुसरा मार्ग नाहीं." असें सांगून ते स्वस्थानीं गेले. पद्मपादही मंत्रविद्येंत मोठे निष्णात होते. त्यांनीं हें सर्व ऐकतांच अभिनवगुप्ताच्या कृतीचा त्यांस मनस्वी राग आला; त्यांस तें सहन होईना. ह्यास्तव त्यांनीं उलट मंत्रप्रयोग करण्याचें काम सुरू केलें, व आचार्य नको नको ह्मणत असतांही त्यांनीं तो प्रयोग केलाच. तेव्हां त्याच्या योगानें तोच भगंदररोग अभिनवगुप्तास उत्पन्न झाला व आचार्य चांगले खडखडीत बरे झाले! अभिनवगुप्त मात्र त्याच रोगानें कांहीं दिवसांनीं मरण पावला.

**८९ गौडपादांचें दर्शन**— एकदां आचार्य गंगेच्या वाळवटांत प्रवाहावरून येणाऱ्या मंद व शीतल वायूच्या झुळुकीमध्यें ब्रह्मध्यान करित असतां अकस्मात् एका हातांत रुद्राक्षाची माला घेऊन एकसारखा जप चाललेला आहे अशी गौडपादांची मूर्ति आचार्यांपुढें येऊन उभी राहिली. त्यांस पाहातांच आचार्यांनीं उठून भक्तिपुरस्कर वंदन केलें. तेव्हां गौडपादांनीं आपलें नांव सांगून त्यांस आशीर्वाद दिला आणि खालीं बसले. नंतर सर्व कुशल वृत्त विचारून घेतल्यावर गौडपाद बोलले कीं, गोंविदपादानें तुझी फार कीर्ति वर्णन केली. म्हणून ती प्रत्यक्ष पहावी व ब्रह्मसूत्रावरील तुझें भाष्यही अवलोकन करावें ह्याकरितां मी मुद्दाम येथें आलों आहें. तर तें तुझें भाष्य दाखीव. तेव्हां आचार्यांनीं परम गुरूचा स्तव करून त्यांच्या पुढें सर्व भाष्य वाचून दाखविलें व आपण केलेले सर्व ग्रंथही दाखविले आणि म्हणाले कीं, "ज्यावर आपल्या सारख्याची कृपादृष्टि झाली, त्याला दुर्लभ असें कांहीं नाहींच. आपल्या सारख्यांची कृपा, मुक्याला बोलका, जडाला पंडित व पाप्याला पुण्यवान् करण्याविषयीं समर्थ आहे." असें ह्मणून त्यांनीं मांडूक्य भाष्य, व गौडपादीय कारिका भाष्य इत्यादि भाष्येंही दाखविलीं. तेव्हां गौडपाद बोलले कीं, " हीं तुझीं भाष्यें पाहून फार संतोष झाला. ह्याकरितां तो संतोषच तुला आतां वर मागण्याविषयीं प्रश्न करित आहे. तरी इच्छित वर माग." त्यावर आचार्य बोलले " आपण साक्षात् विष्णुस्वरुपी आहांत. आपलें प्रत्यक्ष दर्शन झाल्यानंतर आणखी इष्ट वर तो कोणता मागावयाचा उरला आहे ? कोणताच नाहीं. तथापि आपली इच्छाच आहे तर मला निरंतर ब्रह्मचिंतन घडावें. हा वर असावा." ह्याप्रमाणें आचार्यांचें भाषण ऐकून "तथास्तु" असा आशीर्वाद देऊन गौडपाद आपल्या स्थानीं निघून गेले.

**९० शारदापीठावर आरोहण**—एकदां आचार्य श्रीक्षेत्र काशी येथें प्रातःकाळीं उठून सर्व शिष्यांसह गंगेवर जाऊन स्नान वगैरे नित्य कर्म उरकून ब्रह्माचें ध्यान करून शिष्यांना पढवित असतां अशी वार्ता ऐकली कीं, काश्मीर देशामध्यें एक शारदेचें स्थान आहे. त्याला '**सर्वज्ञपीठ**' असें ह्मणतात. जो सर्वज्ञ असेल तोच त्यावर चढण्यास योग्य होतो. इतर कोणीही त्यावर

चढण्यास समर्थ नाहीं. त्या देवालयाला मोठा सभामंडप असून त्याला चार दरवाजे आहेत. त्यांत दक्षिण दरवाजा नेहमीं बंद आहे. ह्याचें कारण प्रत्येक दिशेकडून एक एक विद्वान् येऊन त्यानें तेथें परीक्षा देऊन तीन दिशांचे तीन दरवाजे उघडले. आतां फक्त दक्षिण दरवाजा मात्र बंद आहे. तो उघडण्याविषयीं कोणी समर्थ नाहीं.'' हा वृत्तांत ऐकून आचार्यांच्या मनांत कल्पना आली कीं, आपण जाऊन तें द्वार उघडावें, व त्या सर्वज्ञपीठावर आरोहण करावें. इतका दिग्विजय केल्यानंतर आचार्यांच्या मनांत अशी कल्पना येणें अगदीं साहजिकच आहे. ही कल्पना मनांत येतांच ते आपल्या सर्व शिष्यांसह निघाले ते काश्मीरास जाऊन पोहोंचले, व त्या शारदापीठाचे द्वारापाशीं गेले. तेव्हां तेथील रखवालदारानें त्यांस प्रतिबंध करून सांगितलें कीं, येथें सर्व शास्त्रांत परीक्षा देऊन नंतर आंत जाण्याची परवानगी मिळते. ह्याकरितां आपल्यास आंत जाणें असेल तर परीक्षा देऊन नंतर जावें.'' असें ऐकून आचार्यांनीं उत्तर दिलें "ठीक आहे. ज्या कोणास प्रश्न करणें असतील त्यांनीं प्रश्न करावेत. ह्मणजे मी त्यांचीं उत्तरें देण्यास तयार आहें.'' तेव्हां द्वारपालानें ती सर्व व्यवस्था लौकरच करितों, आपण थोडे दिवस मुक्काम करावा ह्मणून सांगितलें. नंतर सर्व नगरांत दौंडी वगैरे पिटून सभेचा दिवस मुक्रर करण्यांत आला, व त्या दिवशीं सर्व शास्त्रांत प्रवीण असलेले विद्वान् लोक सर्व मतांचे अग्रणी, वगैरे अनेक विद्वान् जमा होऊन घनदाट सभा भरली. त्यांतील प्रत्येक शास्त्र्यानें आपआपल्यापरी आचार्यांस प्रश्न केले. त्यांचीं उत्तरें आचार्यांनीं अगदीं योग्य व समाधानकारक अशीं दिलीं. प्रत्येक मतांत त्यांची परीक्षा झाली. पण सर्व मतांचें मर्म त्यांनीं बरोबर सांगितल्यामुळें तेथील नेमलेल्या विद्वद्वृंदास परम आनंद होऊन त्या सर्वांनीं मिळून आचार्यांची पूजा केली आणि राहिलेला चौथा दक्षिण दरवाजा उघडून दिला. तेव्हां आचार्यही कृतकार्य होत्साते पद्मपाद शिष्याचा हात धरून त्या विद्याभद्रासनावर चढूं लागले. इतक्यांत असा चमत्कार झाला कीं, मेघनादासारखा मोठा शब्द होऊन आकाशवाणी झाली. ती अशीः—"तूं सर्वज्ञ आहेस ह्यांत शंका नाहीं. कारण, ती परीक्षा

पूर्वीच झालेली आहे. तुझ्या आंगीं जर सर्वज्ञता नसती, तर ब्रह्मदेवाचा अवतार जो मंडण पंडित त्याला तूं कसें जिंकलें असतेंस ? तेव्हां आतां सर्वज्ञतेसंबंधानें विचार नाहीं. परंतु परिशुद्धता आहे किंवा नाहीं हा मात्र विचार करण्यासारखा प्रश्न आहे. ह्याकरितां थोडा वेळ थांबावें. अशी त्वरा करून साहस करणें उपयोगी नाहीं. तूं यतिधर्मामध्यें असतांना अनेक स्त्रियांचा उपभोग घेतला आहेस; तेव्हां तूं शुद्ध नाहींस आणि ह्या पदावर आरोहण करण्याला जशी सर्वज्ञता लागते, तशीच शुद्धताही लागते.'' हा दोषारोप ऐकून सर्व मंडळी चकित झाली. तेव्हां आचार्यांनीं मोठ्या गंभीर वाणीनें उत्तर दिलें.:—

**" नास्मिञ्छरीरे कृतकिल्बिषोहं जन्मप्रभृत्यंब न संदिहेहम् ॥**
**विधायि देहान्तरसंश्रयाद्य न तेन लिप्येत हि कर्मणान्यः ॥ १ ॥**

"हे माते! जन्मापासून या शरीरानें कोणतेंही पातक केलेलें नाहीं, याबद्दल मला मुळींच संदेह नाहीं. आतां देहांतरानें जें कांहीं केलें असेल, त्या कर्मापासून हा देह लिप्त होत नाहीं. ह्याकरितां ही आपण घेतलेली शंका बरोबर नाहीं. कारण, एका देहानें केलेलें कर्म, दुसऱ्या देहास लागू नाहीं. असें लोकप्रसिद्ध असून शास्त्रसिद्धही आहे. शिवाय, तें सर्व स्मृतींना मान्य असून पंडितांनाही मान्य आहे.'' अशा प्रकारें त्या आकाशवाणींतील सर्व शंकांचें समाधान करून त्या विद्यापीठावर आरोहण केलें! त्या कालीं देवांनीं दुंदुभी वाजविल्या व आचार्यांवर पुष्पवृष्टि केली. आनंदाच्या जयघोषानें सारी सभा दणाणून गेली आणि पूर्वी जसे याज्ञवल्य सर्वज्ञतेनें शोभायमान झाले होते, त्याप्रमाणें आचार्यही त्या सर्वज्ञ पीठावर शोभूं लागले.

**९१ आचार्यांचा कैलासवास**—ह्याप्रमाणें काश्मीरांतील सर्वज्ञपीठावर आरोहण करून कृतकार्य झाल्यानंतर आद्य मठ श्रीशृंगेरी येथें सुरेश्वराचार्यांची स्थापना करून आचार्य कांहीं शिष्यासह निघाले ते बद्रिकाश्रमीं गेले आणि तेथें कांहीं दिवस राहून पातंजल मताच्या लोकांना आपलें भाष्य पढवून त्यांना अद्वैतमार्गी केलें. इतक्यांत आचार्यांची आयुष्यमर्यादा नजिक आली, ह्मणजे

बत्तीस वर्षें पुरीं होण्यास थोडा अवधि राहिला. तेव्हां ते हिमालयांत केदार ह्मणून एक स्थान आहे, त्या स्थानाला गेले. पण तेथे थंडी इतकी कडक होती कीं, त्यांच्या शिष्यांना अतिशयच पीडा होऊं लागली. ह्मणून आचार्यांनीं शंकराची प्रार्थना करून एक उष्णोदकाचा झरा उत्पन्न केला. तो चमत्कार[1] अद्यापही आहे. याप्रमाणें कलिकल्मषनाशक अशीं अनेक अद्भुत चरित्रें करून आपल्या निर्मल यशानें सारें भरतखंड पुनीत करून साक्षात् शंकराचे अवतार जे आद्य जगद्गुरु श्रीमच्छंकराचार्य यांनीं तेथेंच कांहीं दिवस वास केला.

ह्याप्रमाणें देवांच्या पूर्वसंकेताप्रमाणें सर्व कार्य झाल्यानंतर आचार्यांना कैलासास नेण्याकरितां ब्रह्मदेवादि देव, तसेच ऋषी गंधर्व इत्यादि अनेक देव तेथें आले. त्यामुळें तेथील आकाश विमानांनीं अगदीं व्याप्त होऊन गेलें. नंतर सर्वांनीं आचार्यांची पूजा केली आणि साष्टांग नमस्कार करून प्रार्थना केली कीं, "हे शंकर! हे आदिदेव! हे कामदहन! हे त्रिनयन! आपण ज्या कार्याकरितां भूमीवर अवतार धारण केला होता, तें कार्य तर झालें. करितां आतां कैलासीं येऊन आह्मांस सनाथ करावें." अशी देवांची वाणी ऐकून शंकरांनीं ती मान्य करून कैलासीं जावयाचें मनांत आणतांच संपूर्ण शिवगणांनीं युक्त असे नंदिकेश्वर येऊन पुढें उभे राहिले, आणि ब्रह्मदेवांनीं हात देतांच ते हात धरून श्रीशंकर त्या स्वकीय वाहनावर बसून इंद्रादि देवांसहवर्तमान बंदीजनांची आणि संपूर्ण देवांची स्तुति श्रवण करीत आपल्या स्वस्थानीं ह्मणजे कैलासीं गेले. त्या समयीं देवांनीं दुंदुभी वाजविल्या; गंधर्व गायन करूं लागले. ह्याप्रमाणें श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमच्छंकराचार्य संपूर्ण जगामध्यें अद्वैतमार्ग स्थापन करून आपल्या वयाच्या बत्तिसाव्या वर्षीं कैलासास गेले! ही कथा जे कोणी भक्तिभावानें श्रवण करतील, ते भवसंसारापासून मुक्त होऊन अंतीं श्रीशिवपदाला पावतील.

१ हीच गोष्ट श्रीसमर्थ रामदास स्वामींच्या संबंधानेंही लिहिलेली आढळते.

---

# परिशिष्ट.



## आचार्यांचीं चरित्रें.

**आचार्यां**च्या चरित्राबद्दल एकंदर चार ग्रंथ आढळतात; त्यांत पहिला **आनंदगिरींनीं** केलेला **शंकरविजय,** यांत चवऱ्याहत्तर प्रकरणें आहेत. हा कलकत्त्यास शके १७८९ दांत **श्रीनवद्वीपगोस्वामी आणि श्रीजयनारायण तर्कपंचानन** यांनीं शोधून छापला आहे. दुसरा **विद्यारण्यकृत,** ज्यास **माधव** असेंही ह्मणतात; त्यांनीं केलेला **शंकरविजय** आहे, त्यांत सोळा सर्ग आहेत. यांत **आचार्यां**च्या जन्मापासून अवतारसमाप्तीपर्यंत चांगली माहिती दिली आहे. हाच मूळ आधार धरून हें चरित्र लिहिलें आहे. हाही मुंबईंत छापला आहे. तिसरा **चिद्विलासस्वामींनीं** केलेला **शंकरविजयविलास,** ह्मणून आहे; त्यांत बत्तीस प्रकरणें आहेत. चवथा **सदानंदकृत शंकरविजय** आहे. त्यांत सत्रा सर्ग असून सर्व कथाभाग बहुधा माधव (विद्यारण्य) कृत शंकरविजयाप्रमाणें आहे. हे जे एकंदर चार शंकरविजय आहेत, त्यांत विद्यारण्यकृत मूळ धरून बाकी दोन विजयांचें प्रकरणवार तात्पर्य काढून पुढें जोडलें आहे. चवथा जो सदानंदकृत आहे, तो व मूळ ह्मणून घेतलेला शंकरविजय एकच असल्यामुळें त्याचें तात्पर्य देण्याचें प्रयोजन वाटलें नाहीं.

आतां हे चार विजय मिळून तात्पर्य एकच आहे, परंतु कोठें जास्त वर्णन आहे, व कोठें संक्षेप आहे. अर्वाचीन कोशकार हे सर्व **शंकरविजय** मूळ **शंकराचार्यां**वर न लावितां त्यांच्या पुढें जे आणखी त्या स्थानीं **आचार्य** झाले, त्यांचें वर्णन आहे, असें ह्मणतात. त्यांत आनंदगिरींचा जो शंकरविजय आहे, तो मूळ आचार्यांचा व विद्यारण्यकृत शंकरविजय त्यांच्या मागून झालेल्या **आचार्यांचा.** कारण आनंदगिरिकृत शंकरविजयांत **आचार्यां**च्या मातापितरांचीं जीं नांवें आहेत, तीं नांवें विद्यारण्यकृत विजयांत नसून दुसरीं आहेत. बाकी

ब्रह्मसूत्रावर भाष्य केलें, मंडणमिश्राशीं वाद केला, मठस्थापना केल्या, वगैरे सर्व कृत्यें जमतात. तेव्हां एकदेशीय विकृत झालें ह्मणून ती वस्तु नाहीं ह्मणणें हें योग्य नाहीं. त्याविषयीं "**एकदेशविकृतमनन्यवत्**" हा न्याय स्वीकारणें योग्य आहे. किंवा एकाचींच अनेक नांवें असतात. तेव्हां कोणी एक ह्मणतो; दुसरा दुसरें ह्मणतो, व हीं नांवें कृतीनें फिरतात. आनंदगिरिकृत विजयांत **आचार्यां**च्या वडिलांचें नांव **विश्वजित्** असें आहे; व माधवकृत विजयांत **शिवगुरु** आहे; तेव्हां **शिवगुरु** हें नांव ते शिवभक्त होते यावरून पडण्याचाही संभव आहे. हा जो आह्मी तर्क करितों तो बाकीचें चरित्र सर्व एक असल्यामुळें आहे. परंतु आमचे मतें हे सर्व विजय जरी भिन्न कालीं झाले आहेत, तरी ह्यांचा वर्णन करण्याचा सर्व झोंक मूळ जे **शंकराचार्य** झाले त्यांना उद्देशूनच आहे; असें आंतील वर्णनावरून कोणीही कबूल करील.

आतां ज्या **शंकरविजयावरून** हें चरित्र लिहिलें त्याचें थोडें तात्पर्य येथें सांगणें अप्रासंगिक होईल असें वाटत नाहीं. या माधवकृत (विद्यारण्यकृत) शंकरविजयांत एकंदर सोळा सर्ग आहेत. त्यांत प्रथम सर्गांत **आचार्यांचा** अवतार होण्याचें कारण सांगितलें आहे. दुसऱ्यांत **आचार्यांचें** जन्म कर्म झालें तें वर्णन आहे. तिसऱ्यांत **आचार्यां**च्या सहाय्याकरितां ज्या ज्या देवांनीं जन्म घेतले, तें वर्णन दिलें आहे. चवथ्या सर्गांत **आचार्यांच्या** आठ वर्षांच्या वयाच्या आंत त्यांणीं काय काय केलें हें वर्णन आहे. पांचव्यांत **आचार्यांनीं** चतुर्थाश्रम घेतला इत्यादि वर्णन आहे. सहाव्यांत नष्ट झालेली जी आत्मविद्या तिचें स्थापन केल्याचें वर्णन आहे. सातव्यांत **श्रीव्यासाचें** दर्शन झाल्याचें वर्णन आहे. आठव्यांत **मंडणमिश्र** व **आचार्य** यांचा वाद झाला तें वर्णन आहे. नवव्या सर्गांत **सरस्वतीला** मध्यस्थ करून **आचार्यांनीं** आपली सर्वज्ञता दाखवून **मंडणमिश्रास** जिंकिलें; तो भाग वर्णिला आहे. दहाव्यांत **आचार्यांनीं** योगबलानें **अमरकराजा**च्या देहांत प्रवेश केला तो भाग आहे. अकराव्यांत **उग्रभैरव** जो **कापालिक**मताग्रणी त्यास **आचार्यांनीं** जिंकलें तो भाग आहे. बाराव्यांत **हस्तामलक** आणि **त्रोटक** यांस शिष्य केलें

तो भाग आहे. तेराव्यांत **वार्तिकांतील ब्रह्मविद्येला** चालन देऊन त्यावर भाष्य केलें, तो भाग वर्णिला आहे. चवदाव्यांत **पद्मपादाला** तीर्थयात्रा कथन केली आहे. पंधराव्यांत **आचार्यांनीं** दिग्विजय केला, तो भाग आहे. सोळाव्या सर्गांत **शारदापीठावर** आरोहण करून स्वारी **कैलासाला** गेली, तो भाग वर्णिला आहे. याप्रमाणें संक्षेपानें या ग्रंथांत अनुक्रमानें विषय आहेत.

शिवाय **आनंदगिरी**कृत शंकरविजय, व **चिद्विलास**कृत **शंकरविजय**विलास, **सदानंद**कृत **शंकरविजय,** असे तीन ग्रंथ उपलब्ध झाले; त्यांत दोहोंचीं तात्पर्यें काढून अनुक्रमानें पुढें दिलीं आहेत. **सदानंद**कृत **शंकरविजय मूळा**बरोबर आहे, सबब त्याचें तात्पर्य दिलें नाहीं. हीं तात्पर्यें जोडल्यानें त्या ग्रंथांत काय आहे, हें वाचकांस कळण्यास चांगलें साधन होईल, व एकंदरींत ग्रंथतात्पर्य चांगलें समजेल. यांत मूळ ग्रंथाचें अक्षरशः भाषांतर नसून गोष्टीच्या रूपानें लोकांस बोध होईल तितकाच भाग घेतला आहे, व त्यांत अधिक माहितीची भर घातली आहे.

## आनंदगिरिकृत शंकरविजयाचें सार.

आचार्यांचे शिष्य **आनंदगिरी** यांणीं एक **शंकरविजय** ग्रंथ केला आहे. त्याचीं प्रकरणें चवऱ्याहत्तर आहेत. त्यांत माधवकृत शंकरविजयापेक्षां बराच भाग निराळा आहे. तो समजण्याकरितां प्रकरणांतील तात्पर्य काय हें सांगणें अवश्य आहे. करितां तें खालीं देतों.

प्रथम प्रकरणांत आचार्यांनीं केलेल्या ठळक गोष्टींचें थोडक्यांत वर्णन आहे. दुसऱ्यांत नानाप्रकारचे उपासनाभेद होऊन वैदिकमार्ग नष्ट झाला आहे असें नारदवचन ऐकून ब्रह्मदेवानें शंकराकडे जाऊन प्रार्थना केली; तेव्हां शंकरांनीं मी **शंकराचार्य** या नांवानें अवतार घेऊन तुमचें कार्य करितों असें सांगितलें. नंतर शंकर चिदंबरपुरांत **आकाशलिंग** या नामेंकरून प्रगट झाले. तेथें **सर्वज्ञ** या नामेंकरून ब्राह्मण होता. त्याची स्त्री **कामाक्षी,** हिनें चिदंबेश्वराची आराधना केल्यामुळें त्यास एक कन्या झाली. तिचा विवाह आठव्या वर्षीं **वि-**

**श्वजित्** या नामें करून एका ब्राह्मणाबरोबर केला. ती नेहमीं आकाशात्मक जो शिव त्याचें सेवन करित असे. अशी उत्तम शीलादिकांनीं युक्त होती तरी विश्वजित् तिचा त्याग करून निघून गेला आणि अरण्यांत तप करूं लागला. त्या दिवसापासून तर तिनें शंकराचे सेवेवांचून कांहींच न करितां केवळ आपल्या तपोबलानें शंकराला संतुष्ट केलें. नंतर शंकरांनीं तिच्या मुखांतून प्रवेश करून तिच्या उदरामध्यें आपलें तेज प्रगट केलें. तेव्हां इतर लोकांना मोठा विस्मय झाला. नंतर बाप आदिकरून सर्व लोक तिची सेवा करूं लागले आणि तिसऱ्या महिन्यापासून तिचे सर्व संस्कार केले. नंतर दहाव्या महिन्यांत शंकराचार्य या नामेंकरून शंकर प्रगट झाले. त्या कालीं देवांनीं पुष्पवृष्टी केली, दुंदुभी वाजविल्या आणि मोठा आनंद केला.

तिसऱ्या प्रकरणांत शंकराचार्य बाल्यावस्थेंतच मागध भाषा जाणूं लागले; नंतर तिसऱ्या वर्षी त्यांचें चौल झालें. पांचव्या वर्षी ब्राह्मणांनीं मौंजीबंधन केलें; नंतर आचार्य गुरूकडे जाऊन सर्व विद्या शिकले; व अनेक शिष्य करून त्यांस आत्मविद्या सांगितली; आणि आठव्या वर्षी **श्रीमद्गोविंदयतीन्द्रा**पासून उपदेश घेऊन त्यांनीं परमहंस आश्रम स्वीकारिला.

चतुर्थ प्रकरणांत संन्यास घेऊन सर्व प्रपंचाचा त्याग करून व्याससूत्रावर भाष्य केलें आणि **पद्मपाद, हस्तामलक, सत्पाणी, चिद्विलास, ज्ञानकंद विष्णुगुप्त, शुद्धकीर्ति, भानुमरीचि, कृष्णदर्शन, बुद्धिवृद्धि, विरंचिपाद, शुद्धानन्द, आनन्दगिरी** इत्यादि शिष्यांसह दक्षिणमार्गानें **मध्यार्जुनीं** जाऊन मध्यार्जुनाची प्रार्थना केली कीं, अद्वैतमत सत्य आहे किंवा द्वैतमत सत्य आहे, याचा निवाडा करावा. तेव्हां शंकरांनीं त्या लिंगापासून स्वस्वरूपानें प्रगट होऊन दक्षिणहात वर करून सांगितलें कीं अद्वैत सत्य आहे; नंतर अदृश्य झाले. हा चमत्कार सर्वांनीं पाहिला. तेव्हां त्या प्रांतांतील सर्व ब्राह्मणांस अद्वैतमतानुयायी करून सर्व शिष्यांसह रामेश्वरीं गेले. तेथें श्रीरामस्थापित रामेश्वर नामक महादेवाची गंगोदकादि उपचारांनीं पूजा करून त्यांनीं

तेथेंच दोन महिने वास केला. आणि त्रिशूलादि धारण करणारे जे शैव त्यांच्या मताचें खंडण केलें.

पंचम प्रकरणांत **परमतकालानल** नामक आराध्य जातीय शैवास आचार्यांनीं जिंकून आपला शिष्य केलें.

नंतर सहा, सात, व आठ, यांत आचार्य **अनंतशयन**स्थलीं गेले. तेथें देवाचें दर्शन करून एकमासपर्यंत राहिले. आणि **विष्णुशर्मा** आदिकरून वैष्णवमती ह्यांस जिंकून आपल्या मतांत आणिलें.

नवव्या प्रकरणांत वैखानसमती जो **व्यासदास** त्याचें खंडण केलें.

दहाव्या प्रकरणांत मंत्रहीन वैष्णवमताभिमानी जो **विष्णुदासा**ग्रगण्य त्याचें खंडण करून त्यास पांच पूजा व तितक्या उपासना सांगून आपला शिष्य केलें.

अकराव्या प्रकरणांत आचार्य अनंतशयनाहून निघून कार्तिकस्वामिक्षेत्रीं सर्व शिष्यांसह आले; आणि **कुमारधारे**मध्यें स्नान करून कार्तिकस्वामीची पूजा केली आणि तेथें **हैरण्यगर्भ**मताचें खंडण केलें.

बाराव्या प्रकरणांत अग्नित्रयोपासकांचें खण्डन केलें.

तेराव्या प्रकरणांत सौरमतवादी जे दिवाकरप्रभृति त्यांचें खंडण केलें.

चवदाव्या प्रकरणांत **गणवरपुरांत** जाऊन गणपाश्रमीं गेले आणि तेथें कौमुदीनदीमध्यें स्नान करून विघ्नेश गणपतीचें पूजन करून एक मासपर्यंत राहिले. तेथील नित्यक्रम असा होता कीं पद्मपाद आदिकरून शिष्यांनीं भिक्षा आणून गुरूला अर्पण करावी आणि मग सायंकाळीं ब्रह्मविचार करीत सर्वांनीं गुरूचा स्तव करित बसावें.

पंधराव्या प्रकरणापासून अनुक्रमें अठरा प्रकरणांपर्यंत **महागणपतिमत, हरिद्रागणपतिमत, उच्छिष्टगणपतिमत,** व **नवनीतस्वर्णसंतानगणपतिमत,** इतक्यांचें खंडण केलें आहे.

एकुणीस प्रकरणीं आचार्य शिष्यांसह **भवानीनगरांत** जाऊन तेथें एकमासपर्यंत वास करून तत्रस्थ शक्तिमतानुयायी यांचें खंडण करून त्यांस अद्वैतमती केलें.

विसाव्या प्रकरणांत आचार्य भवानीनगरांत असतां आसमंत देशांतून व कु-

वलयपुरापासून कांहीं महालक्ष्मीमताभिमानी आले आणि आपलें मत सत्य आहे असें ह्मणूं लागले. तेव्हां आचार्यांनीं समर्पक उत्तरांनीं त्यांचें खण्डन केलें व शुद्धाद्वैतमार्गी करून आपले शिष्य केले.

एकविसाव्या प्रकरणांत **शारदोपासकांचें** खण्डन केलें.

बेविसाव्यांत **वामाचारमताचें** निरसन केलें.

तेविसाव्यांत तेथून आचार्य उज्जयिनीला आले आणि दोन महिने मुक्काम करून त्यांनीं **कापालिकमताचें** खंडण केलें.

चोविसाव्यांत **कापालिक, चार्वाक, सौगत, क्षपणक, जैन, बौद्ध** इत्यादिकांचीं मतें एकदम खण्डन केलीं.

पंचविसाव्यांत पुनः चार्वाक मत खंडित केलें.

सव्वीस सत्तावीस अठ्ठावीस या प्रकरणीं अनुक्रमें **बौद्ध, सौगत,** आणि **जैन** इत्यादिकांचीं मतें सप्रमाणानें खंडित करून शुद्धाद्वैतमताची स्थापना करून सर्वांना पांच उपासना देऊन आपले शिष्य केले.

## शंकरविजयविलास.

**शंकरविजयविलास** ह्मणून बत्तीस अध्यायांचा असा एक **आचार्य**चरिताबद्दल ग्रंथ आहे. त्यांतील वर्णन व विद्यारण्यकृत शंकरविजयांतील वर्णन हें तात्पर्यानें बहुधा एकच आहे. तथापि क्वचित् ठिकाणीं वर्णन करतांना वर्णनकर्त्याच्या ज्ञानाप्रमाणें फेर येतो तसा स्थलविशेषीं आला आहे तो समजण्याकरितां शंकरविजयविलासामध्यें काय काय वर्णन केलें आहे तें संक्षेपानें त्या ग्रंथांतील प्रथम अध्यायांत **श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य श्रीमच्चिद्विलासयतींद्रस्वामी** व त्यांचे शिष्य **विज्ञानकंदतपोधनेन्द्र** यांच्या संवादरूपानें आहे. तें येथें दिलें असतां या ग्रंथांतील तात्पर्य समजेल.

**शंकराचार्यचरितं भक्तितः पठ्यते त्वया ।**
**पवित्रं तच्चरित्रं तु श्रोतुं मेऽस्ति कुतूहलम् ॥**

अन्तेवासिनि मय्येषा अनुकंपा तवास्ति चेत् ।
कलितापोपशमनं स्मृतिमात्रेण धीमताम् ॥
तत्त्वज्ञानप्रदमिति बहुशः कथितं पुरा ।
आविर्भावं समारभ्य सद्वृत्तान्तमशेषतः ॥
जगतीमवितुं जेतुं दुर्मतान्यखिलान्यपि ।
शंभोः कृतावतारस्य शंकराचार्यसंज्ञया ॥
चिद्विलासयतिश्रेष्ठ शिष्यहृन्मोहभास्कर ।
कथयाद्य कलावासस्तमिंदुरिव भूतले ॥
अन्तेवासी प्रियो यस्माच्छ्रीगुरावतिभक्तिमान् ।

श्रीचिद्विलास उवाच ॥

साधु पृष्टं त्वया प्राज्ञ गुरुभक्तिकृतादर ।
सहस्रास्योऽपि तद्वक्तुं लिखितुं वा दिवाकरः ॥
न शक्नोति किमेकास्यो ब्रूयां विस्तरतः कथाम् ।
प्रश्नेनानेन तुष्टोस्मि यच्छ्रुतं मद्गुरोर्मुखात् ॥
तत्ते प्रियाय शिष्याय वक्ष्यामि शृणु सादरम् ।
भगवत्पूज्यपादानामाविर्भावं सतां हितम् ॥
कृतोपनीते पञ्चाब्दे सर्वविद्यासमागमः ।
मकरग्रहकालीनसंन्यासाश्रमसंभवः ॥
बदर्यागमनं पश्चाद्गोविंदभगवद्गुरोः ।
क्रमसंन्यासलाभश्च व्याससूत्रार्थनिर्णयः ॥
स्वीयं भाष्यं बोधयितुं सच्छिष्याणां परिग्रहः
स्नातुं सुरतटिन्याश्च पापहारिणि वारिणि ॥

शिष्यैः सहैव गमनं स्वीयभाष्यार्थचिंतकैः ।
पुण्यश्रेण्यां त्रिवेण्यां च भूयः स्नात्वा निवेशनम् ॥
पूजयित्वा च विश्वेशं पशुपाशविमोचकम् ।
पाराशर्येण संल्लापः सहैवांभोजजन्मना ॥
प्रचारणाय भाष्यस्य सर्वत्र जगतीतले ।
तदर्थश्रुतितुष्टाभ्यां ताभ्यामायुर्विवर्धनम् ॥
युधांनिधनगर्यां च भट्टाचार्यस्य दर्शनम् ।
काश्मीरदेशे मच्छिष्यो वेदवेदांगपारगः ॥
यद्वीथिका गृहद्वाराकूजत्कीरव्रजैरपि ।
वाङ्मुखं संमुखीनैर्यैः क्रियते शास्त्रसंततेः ॥
यदंगनाभवत्साक्षाद्गिरांदेवी पुरा किल ।
दुर्वासमुनिना शप्ता किंचित्कारणवैभवात् ॥
विवाद्य तेन शास्त्रेषु यदि शक्नोषि तं जय ।
इत्थं निशम्य तद्वाक्यं भट्टाचार्यविपश्चितः ॥
शिष्यैः साकं तत्र गत्वा जित्वा मंडनमिश्रकम् ।
तद्धर्मदारान्निर्जेतुं कायांतरनिवेशनम् ॥
कलाशास्त्रपरिज्ञानं स्वशिष्यपरिबोधनात् ।
कोटरस्थापितं देहं गत्वा दृष्ट्वा स देशिकः ॥
चितावारोपिते देहे प्रविश्य परितापिनि ।
साक्षात्कन्[illegible] स्तोत्रेणानेन तुष्यतः ॥
ततो वाणिं विनिर्जित्य तयासाकं जगद्गुरोः ।
[illegible]ुरभ्यर्णगमनं शिष्यसंयुतम् ॥
विभांडकमनेर्यत्र भासते दिव्यमाश्रमम् ।

तुङ्गभद्रातरङ्गौघवारिताशेषकल्मषम् ॥
मलहानिकरो नाम देवो यत्र विराजिते ।
देव्याः संस्थापनं तत्र निगमोक्तविधानतः ॥
निर्माय श्रीमठं तत्र विशालं सुविनिर्मलम् ।
देशिकेन्द्रः सुरेशाख्यं नानाविद्याविशारदम् ॥
शिष्यं संस्थाप्य तत्रैकं काञ्चीनगरमाविशत् ।
तत्र निर्माय नगरीं श्रीचक्रं स्थाप्य शास्त्रतः ॥
कामाक्षीमपि संस्थाप्य दुर्मतानां निबर्हणम्
सर्वज्ञपीठसंस्थानं विजित्य द्वैतवादिनः ॥
ततश्चिदम्बरक्षेत्रं गमनं देशिकेशितुः ।
तत्राश्रितानां विप्राणां सौराणां मतखण्डनम् ॥
सेतुस्नानं समुद्दिश्य शिष्यैः सह गतिर्गुरोः ।
तत्रैडभैरवीयाणां खंडनं दुर्मतस्य च ॥
ततः क्रमाद्वक्रतुण्डपुरीं प्राप जगद्गुरुः ।
गाणपतं मतं तत्र खण्डयित्वा सभामुखे ।
अनंतशयनं गत्वा खण्डयन्वैष्णवं मतम् ।
अवाप वासुकिक्षेत्रं कुमारो यत्र विद्यते ॥
स्नात्वा कुमारधारायां तरङ्गिण्यां स तापसः ।
सुब्रह्मण्यं समभ्यर्च्य सर्वरोगभयापहम् ॥
ततो मृडपुरीं लब्ध्वा बौद्धान् [illegible]
ततो गोकर्णगमनं द्रष्टुं देवं महाबलम् ॥
स्नात्वा रत्नाकरे भूयः कोटितीर्थनिषेवणम् ।
महाबलेशमभ्यर्च्य लब्ध्वानुज्ञां महेश्वरात् ॥

जगन्नाथस्य गमनं पुण्यक्षेत्रे तु तत्परम् ।
अन्तेवासिनिवासार्थं विनिर्माय मठं पुनः ॥
तत्र छात्रं प्रतिष्ठाप्य परिज्ञाताखिलागमम् ।
ततश्चोज्जयिनीं प्राप्य नगरीं देशिको गुरुः ॥
शाक्तानामतिदृप्तानां तन्मतस्य च खण्डनम् ॥
द्वारकागमनं पश्चात्तत्रैकं मठनिर्मितम् ॥
तत्र शिष्यं प्रतिष्ठाप्य देशिकेन्द्रो मुदान्वितः ।
मायापुरीं समासाद्य षण्मतस्थापनं ततः ॥
बदर्यागमनं पश्चात्तत्रैको मठनिर्मितः ।
तोटकाचार्यनामानं शिष्यं संस्थाप्य यत्नतः ॥
तत्रैव सुचिरं स्थित्वा दत्तात्रेयस्य दर्शनं ।
भाष्यार्थबोधतुष्टस्य विष्णोः साक्षात्कृतिस्ततः ॥
दत्तात्रेयगुहाद्वारात्कैलासगमनं गुरोः ।
एतत्सर्वं समासेन वक्ष्यामि शृणु निश्चल ॥

**अर्थ**—साधूंच्या हिताकरितां आचार्यांचें जन्म झालें; व पुढें पांचवे वर्षी त्यांचें उपनयन झालें; तेव्हां त्यांना सर्वविद्या अवगत झाल्या. नंतर नदीमध्यें स्नानाकरितां गेले असतां मगरानें धरलें त्यामुळें संन्यासग्रहणाला आईची परवानगी मिळाली. नंतर **बदरी** वनांत जाऊन **गोविंदभगवत्पादपूज्य** यांना गुरु करून त्यांच्यापासून संन्यासदीक्षा घेतली; नंतर **व्याससूत्रावर** भाष्य केलें; तें सांगण्याकरितां शिष्यांचा संग्रह केला, नंतर त्या शिष्यांस [illegible] झालें; तेव्हां [illegible] करण्याकरितां **काशीला** गेले. तेथें **श्री**[illegible]चांगला चालण्याकरितां त्या दोघांनीं वास केला; तेथें **व्यास**[illegible] बत्तीस वर्षें केलें. पुढें भट्टपादांचें दर्शन व मंडभाष्याचा [illegible] **आचार्यांचें** सोळा वर्षांचें आयुष्य

णमिश्राशीं वाद झाला; व मंडणमिश्राची स्त्री जी सरस्वती तिच्याशीं वाद झाला; त्यांत तिला जिंकण्याकरितां देहांतर केलें; नंतर शिष्यांनीं सूचना करितांच तो देह टाकून आपल्या देहांत प्रवेश करण्याकरितां आले, तों तो देह चितेवर आहे असें पाहून त्या आपल्या देहांत प्रवेश करून नृसिंहाचा स्तव केला; तेव्हां **नृसिंह प्रकट** होऊन त्या संकटापासून त्यांस मुक्त केलें. नंतर सरस्वतीला जिंकून **श्रृंगपुरा**[1]ला गेले; तेथें **विभांडकमुनीं**चा आश्रम **तुंगभद्रे**च्या कांठीं आहे, व **मलहानिकर** देव ज्या ठिकाणीं आहे; तेथें देवीची स्थापना करून एक मोठा मठ निर्माण केला; आणि त्यांत मुख्यशिष्य जे **सुरेश्वराचार्य**[2] त्यांची स्थापना करून **कांची** नगरीस गेले. तेथें उत्तम मंदिर करून यथाशास्त्र **श्रीचक्रा**ची स्थापना करून **कामाक्षी**चीही स्थापना केली; व तेथील दुर्मत्यांना जिंकून **सर्वज्ञपीठा**वर आरोहण करून द्वैतमत्यांना जिंकलें. पुढें **चिदंबरक्षेत्रीं** जाऊन **सौरमत खण्डन** केलें. तेथून **रामेश्वरीं** शिष्यांसह जाऊन तेथें स्नान करून **श्रीरामेश्वरा**चें पूजन करून **भैरवमता**चें खण्डन केलें. तेथून फिरत फिरत **वक्रतुंडपुरी**ला गेले; तेथें सभेमध्यें **गाणपत्यमताचें** खण्डन केलें. नंतर **अनंतशयनक्षेत्रीं** जाऊन **वैष्णव**मताचें खण्डन केलें. नंतर ज्या ठिकाणीं **कार्तिकस्वामी** वास करितात असें जें **वासुकिक्षेत्र** तेथें जाऊन **कुमारधारा** नदीचें स्नान करून सर्वरोगांचा व भयाचा नाश करणारा जो **सुब्रह्मण्य** त्याची पूजा करून **मृडपुरी**ला गेले. तेथें **बौद्धमता**चें खण्डन करून **श्रीगोकर्णक्षेत्रीं** आले. तेथें समुद्रस्नान करून **श्रीमहाबलेश्वरा**चें पूजन करून शिवाय तेथील **कोटितीर्था**चें स्नान करून **श्रीमहाबलेश्वरा**ची आज्ञा घेऊन **पूर्वसमुद्रीं श्रीजगन्नाथ** क्षेत्राला गेले तेथें एक मठ स्थापन करून त्या ठिकाणीं अखिल वेद जाणता अशा शिष्याची स्थापना करून तेथून **उज्जयिनी**ला आले. तेथें **शाक्तमता**चें खण्डन करून पश्चिम समुद्रीं **द्वारकाक्षेत्रा**ला आले. तेथें एक मठ करून एका शिष्याला तेथें ठेवून नंतर **मायापुरी**ला गेले; तेथें **षट्मतांचें**[3] स्थापन करून तेथून **बदरिकाश्रमीं** जाऊन तेथें **तोटकाचार्य**,

---

१ श्रृंगेरी. २ मंडनमिश्र यांचें संन्यास घेतल्यानंतरचें नांव. ३ शिव, विष्णु, गणपति, सूर्य व देवी, हीं पांच व अद्वैत मिळून सहा.

या नामेंकरून शिष्याची स्थापना केली; आणि तेथेंच बहुत दिवस वास केला, तेथें श्रीदत्तात्रेयाचें व भाष्यार्थबोधानें संतुष्ट झालेल्या विष्णूचें दर्शन होऊन **दत्तात्रेय गुहेंतून श्रीदत्तात्रेयाचें** दर्शन घेऊन **आचार्य** पुढें कैलासास गेले.

याप्रमाणें ग्रंथांतील सारांश आहे. आता हें पुस्तक एकच मिळाल्यामुळें जसा ग्रंथ आहे तसाच लिहिला आहे. हा ग्रंथ फार अशुद्ध आहे, शिवाय याचा कर्ता कोण हें समजत नाहीं. एकंदरींत ह्या ग्रंथांत **आचार्यांचे** लीलेपैकीं ठोकळ गोष्टी आहेत. ह्यांत बत्तीस अध्याय आहेत. श्लोक बहुधा अनुष्टुप् असून प्रत्येक अध्यायाचे शेवटीं दोन अगर तीन असे मोठ्या वृत्ताचे श्लोक आहेत. हा ग्रंथ कैलासवासी **रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक** ह्यांच्या पुस्तकसंग्रहांत सांपडला. दुसऱ्या प्रतीबद्दल शोध केला, परंतु कोठें आढळत नाहीं.

---

# आचार्यांचा काल.

आतां **आचार्यांच्या** कालाबद्दल विचार करूं. **आचार्यांच्या** कालाबद्दल अनेक मतें आहेत; कोणी ह्मणतात **आचार्यांना** होऊन सातशें किंवा आठशें वर्षें झालीं; कोणी ह्मणतात कीं सहाव्या शतकाच्या शेवटीं व सातव्याच्या आरंभीं

१ कांही वर्षांपूर्वी नामदार तेलंगसाहेब यांणीं मुद्राराक्षस नाटक शुद्ध करून छापलें आहे; व त्याला एक इंग्रजी निबंध जोडून त्यांत **आचार्यांच्या** उत्पत्तीचा काल ठरविण्याविषयीं बराच यत्न केला आहे. परंतु त्यांनीं जे हेतु धरून अनुमान काढलें आहे, तसेंच प्रोफेसर मॅक्स मुल्लर, डाक्तर भांडरकर, यांनींही निरनिराळे हेतु धरून आचार्यांच्या कालाविषयीं अनुमानें केलीं आहेत. परंतु ह्या अनुमानांचा हेतु सदोष असल्यामुळें त्यांचीं तीं अनुमानें एकमेकांना मोडून टाकतात; ह्यामुळें त्यांवरून कांहींच निर्णय होत नाहीं. शिवाय ग्रंथकारानें कंठरवानें काढलेल्या शंकांपेक्षां तीं अनुमानें जरी कदाचित् सद्धेतुक असलीं, तरी विशेष कारणावांचून तीं खरीं आहेत, असें ह्मणतां येत नाहीं; व ग्रंथकाराचा लेख खोटा मानण्यास कारण नाहीं. यास्तव शंकरविजय व जैनविजय ह्यांवरून जो काल येतो तोच खरा आहे; व तोच विश्वसनीय होय असें आह्मांला वाटतें.

**आचार्य** असावेत, परंतु हीं सर्व अनुमानें असून केवळ बुद्धितरंग आहेत; ह्मणून त्याला जुळेल असें कांहींतरी प्रमाण देतात. परंतु **अर्वाचीन कोशकारांनीं आचार्यां**च्या कालाबद्दल बराच विचार करून सप्रमाण असा काल ठरविला आहे. ते असें ह्मणतात कीं, आनंदगिरि आदिकरून ग्रंथकारांनीं जी उणीव केली ती जैन लोकांनीं पूर्ण केली. तेव्हां तीं **जिनविजयां**तील प्रमाणें लिहून त्यांनीं बराच विचार केला आहे. ह्मणून त्यांतील उतारा येथें देतों.

" ऋषिर्बाणस्तथाभूमिर्मर्त्याक्षौ वाममेलनात् ॥
एकत्वे न लभेदंकस्ताम्राक्षस्तद्धि वत्सरः ॥
विश्वजिच्च पिता यस्य विख्यातश्च चिदंबरे ॥
तस्य भार्यांबिकादेवी शंकरं लोकशंकरं ॥
प्रसूता सर्वलोकस्य तारणाय जगद्गुरुम् ॥
शंकरेण निशीथे हि स्वकीयेन च तेजसा ॥
ब्रह्मवत्काशितं सर्वं सूत्यागारं स्वलीलया ॥
वामाशाय न वह्नस्य माघे कृष्णे शुभे दिने ॥
चतुर्दश्यां निशीथे तु पुष्पवंतौ तदाघटे ॥
ग्लौर्वासरे प्रादुरासीद्वादकृच्छंकरो महान् ॥
पश्चात्पंचदशे वर्षे शंकरस्य गते सति ॥
भट्टाचार्यकुमारस्य दर्शनं कृतवान् शिवः ॥
द्वाविंशद्वर्षविज्ञेया स्थितिरासीद्धिमालये ॥
शंकरस्य शरीरस्यावसानमभवत्तदा ॥
नंदो वसुर्भूमिनेत्रे मेलने शक उत्तमः ॥
ज्ञातव्यः पंडुपुत्रस्य जातो वामे न वै तदा ॥
दुर्मुखे मार्गशीर्षे च शुक्लपक्षे त्रयोदशी ॥
सोमप्रदोषे सायाह्ने कैलासे शंकरो गतः ॥

**अर्थ**–( अंकानां वामतो गतिः ) इकडे लक्ष देऊन सांगितलेले अंक, एकं झाल्यावर दहंस्थानींचा, त्यापुढें शतंस्थानींचा, असा क्रम समजावा. ऋषि ह्मणजे ७ बाण ५ भूमि १ आणि मर्त्याक्ष २ असें डावे डावेकडे मांडल्यानें २१५७

**होतात.** यावरून असें समजावें कीं **युधिष्ठिरशकाचीं** वर लिहिलेलीं वर्षें गत झाल्यावर २१५८ व्या वर्षीं **रक्ताक्षी संवत्सरीं श्रीमच्छंकराचार्यांचें** जन्म झालें. त्यांच्या वडिलांचें नांव **विश्वजित्** होतें; व तो **चिदंबर** येथील रहाणारा होता. त्याची स्त्री **अंबिका देवी** ( विशिष्टा ) ती सर्व लोकांचें कल्याण करणाऱ्या व त्यांस गुरुरूपानें तारणाऱ्या अशा शंकराला ( **शंकराचार्यांस** ) प्रसवली. **शंकराचार्य** जन्मले तेव्हां **उत्तरायण** होतें. **माघ वद्य १४** असून **सोमवार** होता. सूर्य व चंद्र कुंभ राशींत होते. **आचार्यांचें** जन्म **मध्यरात्रीस** झालें असतां त्यांच्या तेजानें प्रसूतिगृह सूर्याप्रमाणें प्रकाशित झालें. याप्रमाणें हा पुरुष मोठा तेजस्वी व पाखंड्यांस वादांत जिंकणारा असा वादी उत्पन्न झाला. हा आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षीं **कुमारिलभट्टास** त्याच्या अंतकाळीं भेटला. हा बत्तीस वर्षांचें वय होई तोंपर्यंत पृथ्वीवर होता. पुढें हिमालयावर याचें देहावसान झालें. त्या वेळेस युधिष्ठिर शक २१८९ जाऊन २१९० होता, व **मार्गशीर्ष शुक्लपक्षींचा सोमप्रदोष** असून संवत्सर **दुर्मुख** होता. ( जिनविजय ).

वर जो शक दाखविला त्यास प्रत्यंतर **कुमारिलभट्ट** शब्दावर पूर्वीं लिहिलेंच आहे तें असें कीं:—

**अष्टचत्वारि वर्षाणि जन्मकालाद्गतानि वै ॥**
**प्रादुर्भावः शंकरस्य ततो जातोऽतिवादिनः ॥**

ह्मणजे **कुमारिलभट्टाच्या** वयास ४८ वर्षें झालीं असतां **शंकराचार्यांचें** जन्म झालें; तथापि हें वाक्य परस्परांचें परस्परांस सापेक्ष्य आहे, असें जर कोणास वाटेल तर **आचार्यांच्या** जन्मशकाविषयीं जैनग्रंथांत दुसरें एक प्रमाण आढळतें तें याप्रमाणें आहे.

**ऋषिर्वसुर्वसुर्ज्ञेयः पांडवानां महात्मनाम् ॥**
**गणना शेषकालस्य शकस्य शिवजन्मनि ॥**

**अर्थ–आचार्यांचें** जन्म झालें त्या वेळेस युधिष्ठिरशक ३०४४ वर्षांपैकीं आठशें सत्यायशीं वर्षें भोगून जाण्याचा शेष राहिला होता. अर्थात् वरील

शकाशीं येणेंकरून मेळ बसतो. याप्रमाणें **आनंदगिरि** इत्यादिक वैदिकपंडितांनीं **आचार्यांचा** काळ दर्शिविण्यांत केलेली जी उपेक्षा व तिच्या योगानें ते कधीं झाले, त्याविषयीं आजपर्यंत सर्वत्र झालेली अनिश्चय बुद्धि तिची जैनपंडितांनीं तोच काळ दोन तीन प्रकारानें दाखवून निश्चयात्मकता केली, हें काम त्यांनीं खचितच अतिशय मोठें केलें, यांत संशय नाहीं. ह्मणून हा एक त्यांचा अमूल्य उपकार व गुणच समजणें अवश्य असून आह्मी वाचकांस कळवितों कीं **भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्यांस,** होऊन गेल्यास आज युधिष्ठिर शकाच्या ४९८१ व्या वर्षीं २८२४ वर्षें झालीं आहेत. ”

याप्रमाणें अर्वाचीन कोशकारांनीं ठरविलें आहे, व ज्योतिषावरूनहि पहातां तोच अजमास येतो. हा अर्वाचीन कोश सन १८८१ शींत छापला आहे. तेव्हां **श्रीमच्छंकराचार्य** यांचा अवतार होऊन आज संवत् १९४५ ह्मणजे शके १८११ मध्यें अठ्ठाविसशें तेहतीस ( २८३३ ) वर्षें झालीं.

**सदानंदस्वामींनीं** जो शंकरविजय ग्रंथ केला आहे, त्यावरून **आचार्यांचा** काल स्पष्ट होतो. त्यांत **आचार्य** केव्हां झाले याविषयीं प्रमाण आहे. तें असें—

**धर्मे द्वाविंशतिशके सप्तशद्विसहस्रके ॥**
**अब्देसर्वजिते जातः सहेवैपञ्चमीदिने ॥**
**सुमुहूर्तेशुभेलग्ने ह्युच्चस्थग्रहपंचके ॥**
**सा सती सुषुवे बालं शंकराख्यं जगद्गुरुम् ॥**

**अर्थ**—युधिष्ठिर शकाच्या दोन हजार सातशें बेविसाव्या वर्षीं सर्वजित् संवत्सरांत पौषमासीं पंचमीच्या दिवशीं सुमुहूर्तावर शुभलग्नीं व पांच ग्रह उच्च असतां ती सती जगद्गुरु जे **श्रीमच्छंकराचार्य** त्यांना प्रसवली. यावरून कलियुगाचे आरंभीं युधिष्ठिर शक ३०४४ वर्षें नंतर विक्रम शक १३५ वर्षें नंतर शालिवाहन शक १८११ वर्षें मिळून युधिष्ठिर शकाला आज ४९९० वर्षें झालीं. त्यांत युधिष्ठिर शकाचीं २७७२ वर्षें वजा घातलीं असतां २२६८ वर्षें **आचार्यांना** झालीं; असें सिद्ध होतें.

यावरून **अर्वाचीन कोशकारांनीं** जो आमच्या ग्रंथकारांस **आचार्यांचा** शक वगैरे न दिल्याचा दोष दिला आहे तो निरर्थक आहे, असें सिद्ध होतें.

श्रीमत्परमहंस विद्वन्मुकुट श्रीकृष्णानंदस्वामी वास्तव्य काशी यांणीं **आचार्यांच्या** कालाबद्दल प्रमाण सांगितलें तें असें—

भास्कररायकृत **दीक्षामीमांसा** ह्मणून एक ग्रंथ काशींत एका गृहस्थाच्या घरीं आहे. त्यांत **आचार्य** केव्हां झाले त्याबद्दल श्लोक आहे, व त्या ग्रंथास बृहच्छक्तिसंगमतंत्र प्रमाण आहे.

**वर्षेष्वतीतेषु शतेषु षट्सु तिष्येऽवतीर्णो मुनिशंकरार्यः**
**शिष्यैश्चतुर्भिः सहितं शिवादि पारंपरीकावधिमानमामः**

यांत कलीचीं सहाशें वर्षे गेल्यानंतर आचार्य अवतीर्ण झाले, असें लिहिलें आहे. व आज गत कलि ४९९० वर्षे आहे. करितां त्यांतून सहाशें वर्षे वजा केलीं असतां ४३९० वर्षे आचार्यांना झालीं असें सिद्ध होतें.

याप्रमाणें ग्रंथकारही निरनिराळीं प्रमाणें देतात; परंतु एकंदरींत सरासरीनें विचार केला असतां आचार्यांना होऊन २००० वर्षे झालीं असावीं असें वाटतें. परंतु जीं ग्रंथाचीं प्रमाणें आढळलीं तीं सुज्ञांपुढें ठेविलीं आहेत; त्यांचा विचार ते करितीलच."

पूर्वीं रा. आठल्ये ह्यांनीं केलेल्या चरित्रांतील हा उतारा लोकांस पहावयास मिळावा ह्मणून आह्मीं मुद्दाम दिला आहे. पण ह्या सर्व दिलेल्या प्रमाणांत किती घरसोड आहे ही गोष्ट सहज लक्ष्यांत येईल. शिवाय, अर्वाचीन कोशकारांचा ह्मणून जो शोध दिला आहे, त्यावर जर भरंवसा ठेवावा, तर ते मुळीं दोन दोन व तीन तीन शंकराचार्य ठरवितात! ही गोष्ट तो कोश पाहिला ह्मणजे समजून येईल. त्यापेक्षां आह्मांस उपलब्ध झालेली आचार्यांची जन्मपत्रिका ज्योतिषशास्त्राप्रमाणें खरी असून तिच्याशी श्रीशृंगेरी मठांतील काल अगदीं तंतोतंत जुळतो, व आह्मीं लिहिलेलीं १९५१ वर्षे ह्या सर्व कालाशीं बहुतेक मिळतातच. तेव्हां आह्मीं दिलेली आचार्यांचीच पत्रिका खरी होय असें आह्मांस निश्चित वाटतें.

**—एडिटर 'केरळकोकिळ'—**

## आचार्यांचा सिद्धान्त.

आतां **श्रीमत्परमेश्वर**कृत महाभूमीचे ठिकाणीं जें हें प्रसिद्ध भरतखण्ड आहे, त्यांतील कित्येक देशांत स्वस्व प्राकृत भाषांतून सगुण निर्गुण भगवत्स्वरूपविषयक अद्वैतशान्तिरसाचें कवितारूपानें व्याख्यान करणारे जे अलीकडे महान् महान् साधु होऊन गेले आहेत त्यांच्या कविताशक्तीला आधार ह्मटला असतां जे प्राचीन **व्यास, वाल्मिकी**प्रभृति संस्कृतकविश्रेष्ठ त्यांचींच काव्यें होत. तथापि सूक्ष्मदृष्टीनें विचार करून पहातां असें दिसून येईल कीं, वरील कवींचीं काव्यें कलियुग लागल्यावर थोड्या कालानें बौद्धादिक अनेक बाह्यमतांनीं उच्छेदित करून नष्टच केलीं होतीं; तीं **श्रीमच्छंकराचार्य** जगद्गुरु **आचार्यांनीं** उपनिषत्सिद्धांत जो अद्वैत तो या ग्रंथांत वेळोवेळीं मतखण्डनाचे वेळीं स्पष्ट केलाच आहे, तथापि थोडक्यांत कळण्याकरितां श्रुतिवाक्यानें सांगतों.

"योऽन्यां देवतां उपास्ते स पशुः" "सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म।" "सदेव सौम्येदमग्र आसीत्। आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्। एकमेवाद्वितीयं ब्रह्म" "सर्वं खल्विदं ब्रह्म" "नेह नानास्ति किञ्चन" "ज्ञानादेव तु कैवल्यं" "ब्रह्मविदाप्नोति परम्" "यदाह्येवैष एतस्मिन्नुदरमंतरं कुरुते अथ तस्य भयं भवति" "असन्नेव स भवति असद्ब्रह्मेति वेद चेत्" "अस्तिब्रह्मेतिचेद्वेदसंतमेनं ततो विदुः" "यो वेद निहितं गुहायां परमेव्योमन् सोऽश्नुते सर्वान्कामान् सह" "तत्त्वमसि" "अहं ब्रह्मास्मि" "प्रज्ञानं ब्रह्म" "अयमात्मा ब्रह्म" इत्यादि श्रुतिवाक्यानि.

**अर्थ**—ब्रह्माशिवाय अन्य देवतांची उपासना करतो तो पशु होय. तिहीं कालीं अबाधित असणारें त्यास सत्य असें ह्मणावें. तेंच ज्ञान अनंतशब्देंकरून देश, काल, वस्तु, यांणीं जो परिच्छेद तद्रहित आहे. तेंच सत् अशा उपलक्षणानें सृष्टीच्या पूर्वीं असतें झालें. अथवा आत्माच सृष्टीपूर्वीं असता झाला. सदादिलक्षणांनीं युक्त ब्रह्म आणि आत्मा हीं दोन भिन्न नाहींत; कारण ब्रह्म सजातीय, विजातीय आणि स्वगतभेद, यांनीं रहित आहे; व एकच अद्वितीय

असें आहे. तेथं नाना ह्मणजे अनेक कांहीं नाहीं, असें असून नसतांना जें जें दिसतें तें तें भ्रमानें ह्मणजे अज्ञानानें आहे. यास्तव ज्ञानानेंच मोक्ष आहे. ब्रह्मवेत्ताच परब्रह्मास पावतो, ह्मणजे ब्रह्मस्वरूप होतो. जो कोणी ब्रह्म आणि आत्मा या दोहोंमध्यें भेद मानतो तो भय पावतो आणि जो ब्रह्माला असत् ह्मणतो तो स्वतःच असत् होतो, ह्म० नाहींसाच होतो. ब्रह्म आहे तसेंच आहे. ह्मणून जो ब्रह्म आहे असें ह्मणतो तोच तद्रूप जाणावा. गुहेंत ह्मणजे पंचकोशांत निहित जें ब्रह्म तें जो जाणतो त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. ह्मणून तेंच तूं आहेस असें, शरण येऊन पुसणाऱ्या शिष्यास गुरूनें सांगावें; व त्यानेंहि मी ब्रह्म आहें; असें त्रिपुटीवांचून अनुभवावें. याप्रमाणें आचार्यांचा सिद्धांत आहे, व तो पूर्वींच्या वसिष्ठ, व्यासादिकांच्या सिद्धांतांशीं जुळतो. याविषयीं योगवासिष्ठ, भगवद्गीता, रामगीता वगैरे ग्रंथ पाहिले असतां सहज लक्ष्यांत येईल.

## आचार्यांचें कवित्व.

प्रस्थानत्रयीसारख्या ग्रंथांतून आचार्यांच्या ज्या कोट्या, युक्ति व सिद्धांत आहेत, त्यांवरून तर आचार्यांची अलोट बुद्धिमत्ता व अचाट सामर्थ्य दिसून येतें. पण ते ग्रंथ अवलोकन करून त्यांतील स्वारस्य ग्रहण करण्याइतका वाचकही अधिकारी पाहिजे. तितके अधिकारी ह्या चरित्राच्या अवलोकनाकडे वळणार नाहींत, व त्यांतील अल्पांशही घेण्याइतका येथें अवकाश नाहीं. ह्याकरितां त्यांची प्रसादवाणी, कोमल व मधुर शब्दरचना, अंतःकरणांतून निघालेला वैराग्याचा उमाळा कळावा ह्मणून नमुन्याकरितां आचार्यांचीं दोनतीन लहानशीं स्तोत्रेंच दाखल करतों.

## भगवन्मानसपूजा ।

**श्रीगणेशाय नमः ॥ हृदंभोजे कृष्णः सजलजलदश्यामलतनुः सरोजाक्षः स्रग्वी मुकुटकटकाद्याभरणवान् । शरद्राकानाथप्रतिमवदनः श्रीमुरलिकां वहन्ध्येयो गोपीगणपरिवृतः कुंकुमचितः ॥ १ ॥ पयोंभोधेर्द्वीपान्ममहृदयमायाहि भगवन्मणिव्रातभ्राजत्कनकवरपीठं भज हरे । सुचिह्नौ ते पादौ यदुकुलज नेनेज्मि सुजलैर्गृ-**

ह्याणेदं दूर्वाफलजलवदर्घ्यं मुररिपो ॥ २ ॥ त्वमाचामोपेंद्र त्रिदशसरिदंभोऽतिशिशिरं भजस्वेमं पंचामृतरचितमाप्लावमघहन् । द्युनद्याः कालिंद्या अपि कनककुंभस्थितमिदं जलं तेन स्नानं कुरु कुरु कुरुष्वाचमनकम् ॥ ३ ॥ तडिद्वर्णे वस्त्रे भयविजयकांताधिहरणं प्रलंबारिभ्रातर्मृदुलमुपवीतं कुरु गले । ललाटे पाटीरं मृगमदयुतं धारय हरे गृहाणेदं माल्यं शतदलतुलस्यादिरचितम् ॥ ४ ॥ दशांगं धूपं सद्वरदचरणाग्रेऽर्पितमये मुखं दीपेनेंदुप्रभवरजसा देव कलये । इमौ पाणी वाणीपतिनुत सकर्पूररजसा विशोध्याग्रे दत्तं सलिलमिदमाचाम नृहरे ॥ ५ ॥ सदा तृप्तान्नं षड्रसवदखिलव्यंजनयुतं सुवर्णामत्रे गोघृतचषकयुक्ते स्थितमिदम् । यशोदासूनो तत्परमदयया‍ऽशान सखिभिः प्रसादं वांछद्भिः सह तदनु नीरं पिब विभो ॥ ६ ॥ सचंद्रं तांबूलं मुखरुचिकरं भक्षय हरे फलं स्वादु प्रीत्या परिमलवदास्वादय चिरम् । सपर्यापर्याप्त्यै कनकमणिजातं स्थितमिदं प्रदीपैरारार्तिं जलधितनयाश्लिष्ट रचये ॥ ७ ॥ विजातीयैः पुष्पैरभिसुरभिभिर्बिल्वतुलसीयुतैश्चेमं पुष्पांजलिमजित ते मूर्ध्नि निदधे । तव प्रादक्षिण्यक्रमणमघविध्वंसि रचितं चतुर्वारं विष्णो जनिपथगतिश्रांतविदुषा ॥ ८ ॥ नमस्कारोऽष्टांगः सकलदुरितध्वंसनपटुः कृतं नृत्यं गीतं स्तुतिरपि रमाकांत त इमम् । तव प्रीत्यै भूयादहमपि च दासस्तव विभो कृतं छिद्रं पूर्णं कुरु कुरु नमस्तेऽस्तु भगवन् ॥ ९ ॥ सदा सेव्यः कृष्णः सजलघननीलः करतले दधानो दध्यन्नं तदनु नवनीतं मुरलिकाम् । कदाचित्कांतानां कुचकलशपत्रालिरचनासमासक्तं स्निग्धैः सह शिशुविहारं विरचयन् ॥ १० ॥ मणिकर्णीच्छया जातमिदं मानसपूजनम् । यः कुर्वीतोषसि प्राज्ञस्तस्य कृष्णः प्रसीदति ॥ ११ ॥ इति श्रीशंकराचार्यविरचितं भगवन्मानसपूजनम् ।

## द्वादशपंजरिकास्तोत्रम् ।

श्रीगणेशाय नमः ॥ मूढ जहीहि धनागमतृष्णां कुरु सद्बुद्धिं मनसि वितृष्णाम् । यल्लभसे निजकर्मोपात्तं वित्तं तेन विनोदय चित्तम् ॥१॥ अर्थमनर्थं भावय नित्यं नास्ति ततः सुखलेशः सत्यम् । पुत्रादपि धनभाजांभीतिः सर्वत्रैषा विहिता नीतिः ॥२॥ का ते कांता कस्ते पुत्रः संसारोऽयमतीव विचित्रः।कस्य त्वं वा कुत आयातस्तत्त्वं चिंतय नदिदं भ्रातः॥३॥मा कुरु जनधनयौवनगर्वं हरति निमेषात्कालः सर्वम् । मायामयमिदमखिलं हित्वा ब्रह्मपदं त्वं प्रविश विदित्वा ॥ ४ ॥ कामं क्रोधं मोहं लोभं

त्यक्त्वात्मानं भावय कोऽहम् । आत्मज्ञानविहीना मूढास्ते पच्यंते नरकनिगूढाः॥५॥ सुरमंदिरतरुमूलनिवासः शय्या भूतलमजिनं वासः । सर्वपरिग्रहभोगत्यागः कस्य सुखं न करोति विरागः ॥ ६ ॥ शत्रौ मित्रे पुत्रे बंधौ मा कुरु यत्नं विग्रहसंधौ । भव समचित्तः सर्वत्र त्वं वांछस्यचिराद्यदि विष्णुत्वम् ॥ ७ ॥ त्वयि मयि चान्यत्रैको विष्णुर्व्यर्थं कुप्यसि सर्वसहिष्णुः । सर्वस्मिन्नपि पश्यात्मानं सर्वत्रोत्सृज भेदाज्ञानम् ॥ ८ ॥ प्राणायामं प्रत्याहारं नित्यानित्यविवेकविचारम् । जाप्यसमेतसमाधिविधानं कुर्ववधानं महदवधानम् ॥ ९ ॥ नलिनीदलगतजलवत्तरलं तद्वज्जीवितमतिशयचपलम् । विद्धि व्याध्यभिमानग्रस्तं लोकं शोकहतं च समस्तम् ॥ १० ॥ का तेऽष्टादशदेशे चिंता वातुल तव किं नास्ति नियंता । यस्त्वां हस्ते सुदृढनिबद्धं बोधयति प्रभवादिविरुद्धम् ॥ ११ ॥ गुरुचरणांबुजनिर्भरभक्तः संसारादचिराद्भवमुक्तः । सेंद्रियमानसनियमादेवं द्रक्ष्यसि निजहृदयस्थं देवम् ॥ १२ ॥ द्वादशपंजरिकामय एष शिष्याणां कथितो ह्युपदेशः । येषां चित्ते नैव विवेकस्ते पच्यंते नरकमनेकम् ॥ १३ ॥ इति श्रीमच्छंकराचार्यविरचितं द्वादशपंजरिकास्तोत्रं संपूर्णम्॥

## चर्पटपंजरिकास्तोत्रम् ।

श्रीगणेशाय नमः ॥ दिनमपि रजनी सायं प्रातः शिशिरवसंतौ पुनरायातः । कालः क्रीडति गच्छत्यायुस्तदपि न मुंचत्याशावायुः ॥ १ ॥ भज गोविंदं भज गोविंदं भज गोविंदं मूढमते । प्राप्ते सन्निहिते मरणे नहि नहि रक्षति डुकृञ्करणे । (ध्रुवपदम्)। अग्रे वह्निः पृष्ठे भानू रात्रौ चुबुकसमर्पितजानुः । करतलभिक्षा तरुतलवासस्तदपि न मुंचत्याशापाशः । भज गो० ॥ २ ॥ यावद्वित्तोपार्जनसक्तस्तावन्निजपरिवारो रक्तः । पश्चाद्धावति जर्जरदेहे वार्तां पृच्छति कोपि न गेहे । भज गोविंदं भज० ॥ ३ ॥ जटिलो मुंडी लुंचितकेशः काषायांबरबहुकृतवेषः । पश्यन्नपि च न पश्यति मूढ उदरनिमित्तं बहुकृतवेषः । भज गोविं० ॥ ४ ॥ भगवद्गीता किंचिदधीता गंगाजललवकणिका पीता । सकृदपि यस्य मुरारिसमर्चा तस्य यमः किं कुरुते चर्चां । भज गोविंदं भज० ॥ ५ ॥ अंगं गलितं पलितं मुंडं दशनविहीनं जातं तुंडम् । वृद्धो याति गृहीत्वा दंडं तदपि न मुंचत्याशा पिंडम् । भज गोविंदं भ० ॥ ६ ॥ बालस्तावत्क्रीडासक्तस्तरुणस्तावत्तरुणीरक्तः । वृद्धस्तावच्चिंतामग्नः परे ब्रह्मणि कोपि न लग्नः । भज गोविंदं भज० ॥ ७ ॥ पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरे शयनम् । इह संसारे भवदुस्तारे कृपयाऽपारे पाहि मुरारे। भज गोविंदं भज०

॥८॥ पुनरपि रजनी पुनरपि दिवसः पुनरपि पक्षः पुनरपि मासः। पुनरप्ययनं पुनरपि वर्षं तदपि न मुंचत्याशामर्षम्। भज गोविंदं भज०॥९॥वयसि गते कः कामविकारः शुष्के नीरे कः कासारः। नष्टे द्रव्ये कः परिवारो ज्ञाते तत्त्वे कः संसारः। भज गोविंदं भज० ॥१०॥ नारीस्तनभरनाभिनिवेशं मिथ्यामायामोहावेशम्। एतन्मांसवसादिविकारं मनसि विचारय वारंवारम्। भज गोविंदं भज गो० ॥ ११ ॥ कस्त्वं कोऽहं कुत आयातः का मे जननी को मे तातः। इति परिभावय सर्वमसारं विश्वं त्यक्त्वा स्वप्नविचारम्। भज गोविंदं भज० ॥ १२ ॥ गेयं गीतानामसहस्रं ध्येयं श्रीपतिरूपमजस्रम्। नेयं सज्जनसंगे चित्तं देयं दीनजनाय च वित्तम्। भज गोविंदं०॥ १३ ॥ यावज्जीवो निवसति देहे कुशलं तावत्पृच्छति गेहे। गतवति वार्त्ता देहापाये भार्या बिभ्यति तस्मिन्काये। भज गोविंदं भज० ॥ १४ ॥ सुखतः क्रियते रामाभोगः पश्चाद्धंत शरीरे रोगः। यद्यपि लोके मरणं शरणं तदपि न मुंचति पापाचरणम्। भज गोविंदं भज० ॥ १५॥ रथ्याचर्पटविरचितकंथः पुण्यापुण्यविवर्जितपंथः। नाहं न त्वं नायं लोकस्तदपि किमर्थं क्रियते शोकः। भज गोविंदं भज० ॥ १६ ॥ कुरुते गंगा सागरगमनं व्रतपरिपालनमथवा दानम्। ज्ञानविहीने सर्वमनेन मुक्तिर्न भवति जन्मशतेन। भज गोविंदं भज० ॥ १७ ॥ इति श्रीमच्छंकराचार्यविरचितं चर्पटपंजरिकास्तोत्रं संपूर्णम् ॥

## हस्तामलकस्तोत्रम्।

श्रीगणेशाय नमः ॥ कस्त्वं शिशो कस्य कुतोऽसि गंता किं नाम ते त्वं कुत आगतोऽसि। एतन्मयोक्तं वद चार्भक त्वं मत्प्रीतये प्रीतिविवर्धनोऽसि ॥ १ ॥ हस्तामलक उवाच। नाहं मनुष्यो न च देवयक्षौ न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राः। न ब्रह्मचारी न गृही वनस्थो भिक्षुर्न चाहं निजबोधरूपः ॥ २ ॥ निमित्तं मनश्चक्षुरादिप्रवृत्तौ निरस्ताखिलोपाधिराकाशकल्पः। रविर्लोकचेष्टानिमित्तं यथा यः स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ ३ ॥ यमग्न्युष्णवन्नित्यबोधस्वरूपं मनश्चक्षुरादीन्यबोधात्मकानि। प्रवर्तंत आश्रित्य निष्कंपमेकं स नित्योपलब्धिस्वरूपोऽह० ॥४॥ मुखाभासको दर्पणे दृश्यमानो मुखत्वात्पृथक्त्वेन नैवास्ति वस्तु। चिदाभासको धीषु जीवोऽपि तद्वत्स नित्योपलब्धिस्वरूपोऽह० ॥ ५ ॥ यथा दर्पणाभाव आभासहानौ मुखं विद्यते कल्पनाहीनमेकम्। तथा धीवियोगे निराभासको यः स नित्योप० ॥ ६ ॥ मनश्चक्षुरादेर्वियुक्तः स्वयं यो मनश्चक्षुरादेर्मनश्चक्षुरादिः। मनश्चक्षुरादेरगम्यस्वरूपः स नित्योपल० ॥ ७ ॥ य एको विभाति स्वतः शुद्धचेताः

प्रकाशस्वरूपोऽपि नानेव धीषु । शरावोदकस्थो यथा भानुरेकः स नित्योपल०॥८॥ यथाऽनेकचक्षुःप्रकाशो रविर्न क्रमेण प्रकाशीकरोति प्रकाश्यम् । अनेका धियो यस्तथैकः प्रबोधः स नित्योपल० ॥ ९ ॥ विवस्वत्प्रभातं यथारूपमक्षं प्रगृह्णाति नाभातमेवं विवस्वान् । यदाभात आभासयत्यक्षमेकः स नित्योपल० ॥ १० ॥ यथा सूर्य एकोऽप्स्वनेकश्चलासु स्थिरास्वप्यनन्यद्विभाव्यस्वरूपः । चलासु प्रभिन्नाः सुधीष्वेक एव स नित्योपल० ॥ ११ ॥ घनच्छन्नदृष्टिर्घनच्छन्नमर्कं यथा निष्प्रभं मन्यते चातिमूढः । तथा बद्धवद्भाति यो मूढदृष्टे स नित्योपल० ॥ १२ ॥ समस्तेषु वस्तुष्वनुस्यूतमेकं समस्तानि वस्तूनि यन्न स्पृशंति । वियद्वत्सदा शुद्धमच्छस्वरूपं स नित्योपल० ॥ १३ ॥ उपाधौ यथा भेदता सन्मणीनां तथा भेदता बुद्धिभेदेषु तेऽपि । यथा चंद्रिकाणां जले चंचलत्वं तथा चंचलत्वं तवापीह विष्णो ॥ १४ ॥ इति श्रीमच्छंकराचार्यकृतहस्तामलसंवादस्तोत्रं संपूर्णम् ॥

आचार्यांच्या कवितेची अशी कांहीं शैली आहे कीं जसा अधिकारी असेल त्याप्रमाणें त्यानें अर्थ करावा. शिवाय पदलालित्य, व साहजिक उपदेश असून त्यांत रसाळ व प्रासादिक अशी वाणी आहे. त्यांतील कोणताही श्लोक ह्मटला तर हा **आचार्यांचा** आहे, असें बहुधा कोणीहि अनुमान करील.

## आचार्यांचे ग्रंथ.

**आचार्यांनीं** अनेक ग्रंथ केले. त्यांत मुख्य **प्रस्थानत्रयीवर भाष्य** केलें; प्रस्थानत्रयी ह्मणजे **ब्रह्मसूत्रें, श्रीभगवद्गीता, दशोपनिषदें**, हीं तीन मिळून आहे. शिवाय **उपदेशसाहस्री** आदिकरून अनेक वेदांतपर ग्रंथ केले आहेत. त्यांत जे प्रसिद्ध असून ज्यांची माहिती मिळाली, त्यांची यादी पुढें दिली आहे. बाकी एकंदरींत पहातां ते कर्तुं अकर्तुं, अन्यथा कर्तुं समर्थ असल्यामुळें थोड्या कालांतही अनेक ग्रंथ करण्याची शक्ति त्यांस होती; परंतु कांहीं ग्रंथ केवळ **आचार्यांच्या** नांवावर विकतात. ही गोष्ट **आचार्यांनीं** जी प्रस्थानत्रयी केली त्याची भाषा, त्याचें अर्थगांभीर्य, हीं मनांत आणिलीं असतां सहज ध्यानांत येईल. तथापि मंदबुद्धिजनाला सहज समजावें, अशा हेतूनें चर्पटपंजरिका आदिकरून लहान ग्रंथही अनेक व निदान हजारपांचशें तरी स्तोत्रें केलीं असतील. सातारा येथें एका गृहस्थाकडे तीनशेंपर्यंत स्तोत्रें आहेत असें समजतें.

## श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्यश्रीमच्छंकराचार्यकृत प्रसिद्ध ग्रंथांची यादी माहितीवरून व ग्रंथाधारें मिळाली ती–



* १ ब्रह्मसूत्रावर भाष्य ( अथातोब्रह्म जिज्ञासा इत्यादि व्याससूत्रांवर )
* १ दशोपनिषदांवर भाष्य (ईश, केन, कठ, प्रश्न, मुंडक, मांडूक्य, तैत्तिरेय, ऐतरेय, छान्दोग्य, बृहदारण्यक,) हीं दहा उपनिषदें.
* १ श्रीमद्भगवद्गीताभाष्य.

१ केनोपनिषदावर दोन भाष्यें आहेत. एक पदभाष्य व एक वाक्यभाष्य.

१ श्वेताश्वतर उपनिषदावर भाष्य.

१ भारतांतील सनत्सुजातीयावर भाष्य.

१ नृसिंहतापनीयावर भाष्य.

१ गायत्रीभाष्य.

२ उपदेशसाहस्री पद्यरूपा व गद्यरूपा. ( सटीक )

१ शतश्लोकी सटीक ( वेदान्तकेसरी किंवा अध्यात्मप्रकाशिका ).

१ विष्णुसहस्रनामावर भाष्य.

१ अपरोक्षानुभूति.

१ स्वात्मनिरूपण यांत वर्णानुक्रमानें आर्या आहेत.

१ विवेकचूडामणी.

१ दक्षिणामूर्तिस्तव.

१ आत्मषट्क ( श्लोक ६ )

१ गोविंदाष्टक.

१ विज्ञाननौका. ( श्लोक ९ )

१ मनीषापञ्चक.

१ साधनपंचक.

१ तत्वानुसंधान.

१ प्रबोधसुधाकर ( यांत १५ प्रकरणें असून आर्याबद्ध आहे ).

१ अद्वैतकौस्तुभ ( यांत परिच्छेद ३४ आहेत. ही तत्त्वानुसंधानाची टीका आहे.

१ वेदान्तमुक्तावलि.

१ वेदान्तसार ( पद्यात्मक ).

१ हरिमीडे हरिस्तुति ( यांत ४४ श्लोक आहेत; व यावर आनंदगिरीची टीका आहे. )

१ आत्मबोध ( ६७ अनुष्टुप् श्लोक आहेत; व सटीक आहे ).

१ तत्वबोध ( सटीक )

* हे तीन ग्रंथ मिळून प्रस्तानत्रयी असें नांव आहे.

१ महावाक्यविवरण.
१ महावाक्यविवेक.
१ वाक्यवृत्तिदर्पण ( श्लोक ५२ )
१ वाक्यवृत्तिमध्यम.
१ लघुवाक्यवृत्ति ( श्लोक १८ )
१ आत्मचिन्तन ( श्लोक २७ )
१ रत्नपञ्चक.
१ विवेकादर्श.
१ पञ्चीकरण.
१ सिद्धान्तबिंदु ( श्लोक १० असून त्यावर टीका आहे. )
१ षट्पदी (आर्या असून टीका आहे).
१ एकश्लोकी ( श्लोकवृत्ताचा आहे ).
१ एकश्लोक ( अनुष्टुप आहे ).
१ त्रिश्लोकी.
१ चतुःश्लोकी.
१ आत्मपंचक.
१ मनीषापञ्चक. ( श्लोक ९ आहेत ).
१ साधनपञ्चक.
१ कौपीनपञ्चक.
१ काशिपञ्चक.
१ वैराग्यपञ्चक.
१ शिवमानसपूजा.(वृत्तश्लोक ४ आहेत).
१ ,, (अनुष्टुप् श्लोक २० आहेत).
१ विष्णुमानसपूजा (श्लोक ९ आहेत).
१ चतुःषष्ट्युपचार भवानीमानसपूजा. ( श्लोक ७२ आहेत. )
१ भगवन्मानसपूजा.
१ निर्वाणषट्क ( श्लोक ९ आहेत ).
१ सप्तश्लोकी गीता ( श्लोक ७ )
१ निर्वाणदशक ( श्लोक १० )
१ सदाचार ( यावर प्राकृत ओवीबद्ध टीका आहे व ओव्या २११८ आहेत ).
१ चर्पटपञ्जरी.
१ द्वादशपञ्जरिका.
१ आत्मानात्मविवेक.
१ अद्वैतानुभूतिः.
१ बालबोधिनी.
१ हरिनाममाला ( श्लोक १९ )
१ ब्रह्मनामावलीस्तोत्र.
१ प्रश्नोत्तरनामावली. ( आर्या )
१ नक्षत्रमाला. ( श्लोक २७ यांत चंद्रमौलेश्वर व व्यंकटेश्वर यांची स्तुति आहे. )
१ निगमचूडामणी.
१ मोहमुद्गर.
१ यतिपञ्चक.
१ काशिकास्तोत्र.
१ विष्णुनामाष्टक.
१ शिवभुजंगप्रयातस्तोत्र.
१ शिवपञ्चाक्षरस्तोत्र.
१ शिवापराधक्षमापनस्तोत्र.

१ लक्ष्मीनृसिंहस्तोत्र.
१ नारायणस्तोत्र.
१ त्रिपुरसुंदरीस्तोत्र.
१ देव्यपराधक्षमापनस्तोत्र.
१ अन्नपूर्णास्तोत्र.
१ सौंदर्यलहरी (यांत पार्वतीचें पादादि केशांत वर्णन १०० श्लोकांनीं केलें आहे. यावर विद्वन्मनोरमा व कैवल्याश्रमरचित सौभाग्यवर्द्धनी टीका व आणखी टीका आहेत.)
१ आनंदलहरी ( दोन ग्रंथ आहेत ).
१ विष्णुपादादिकेशांतवर्णनस्तोत्र ( सटीक ).
१ शिवस्तोत्र.
१ शिवसर्वोत्तम.
१ ललितास्तवराज.
१ दत्तात्रेयसहस्रनामस्तोत्र (श्लोक १८२)
१ महालक्ष्मी शक्तियोगमाया भवानीस्तोत्र ( श्लोक १० )
१ अंबाष्टक ( मत्तमयूरीवृत्त असून सटीक आहे. श्लोक ८ )
१ पांडुरंगाष्टक.
१ शिवनामावल्यष्टक.
१ कालभैरवाष्टक.
१ अच्युताष्टक.
१ कृष्णाष्टक.
१ जगन्नाथाष्टक.
१ यमुनाष्टक.
१ अच्युताष्टक. ( दुसरें )
१ धन्याष्टक.
१ शिवरामाष्टक
१ गंगाष्टक.
१ त्रिवेणीस्तव.
१ नर्मदाष्टक.
१ यमुनाष्टक. ( दुसरें )
१ मणिकर्णिकाष्टक.
१ गोविंदाष्टक ( सटीक )
१ भैरवाष्टक.
१ शारदास्तुति.
१ शिवस्तोत्र.
१ चंद्रशेखरस्तोत्र.
१ विठ्ठलस्तोत्र.
१ रामलक्ष्मणस्तोत्र.
१ नीलकंठशैवसंवाद.
१ वेदान्तसारशिवस्तव.
१ अपराधभञ्जनस्तोत्र.
१ कृष्णतांडव.
१ कामाक्ष्यष्टक.

१ राजयोग.

याप्रमाणें हे सर्व ग्रंथ वेदान्तप्रतिपादक आहेत, शिवाय–

१ योगतारावली. ( योगावर )

१ अमरुशतक (कामशास्त्रावर. यावर दिवभूपाल यांणीं शृंगाररसदीप नांवाची टीका केली आहे, व एक दुसरीही आहे. हा ग्रंथ मंडणमिश्राबरोबर वाद झाला तेव्हां सरस्वतीचे वादाचे वेळीं केला. )

याप्रमाणें ही आचार्यांचे ग्रंथांची दिशा आहे. त्यांचे सर्व ग्रंथ समजणें ह्मणजे अशक्य आहे; तथापि आह्मीं जी वर माहिती दिली आहे हे, बहुतेक ग्रंथ उपलब्ध असून कांहीं छापलेही आहेत. शिवाय जो कोणी ज्यास्त माहिती देईल त्याचे आह्मी आभारी होऊं.



## लहान मुलांचें चिमुकलें पुस्तकालय.

| | |
|---|---|
| १ नीतिधर्मपाठ पुस्तक पहिलें | किं. ८८ |
| २ आपणांवरील जबाबदारी. | किं. ८८॥ |
| ३ स्वभाव. किं. ८८॥     ४ अभ्यास. | किं. ८॥ |
| ५ आजोबानें नातवास सांगितलेल्या गोष्टी. | किं. ८८॥ |
| ६ धर्माची आवश्यकता आणि व्याख्या. ... ... ... | किं. ८॥ |

## संगीत सावित्री नाटक.

**सत्यवान् सावित्रीचें,** सौभाग्य आणि संतति देणारें पौराणिक कथानक, आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस माहीत आहे. व चारही वर्णांच्या स्त्रियांचें हें व्रत आहे. हें, नाटकरूपानें, विद्वान् व संगीताचे मार्मिक रा. रा. सोकर बापूजी त्रिलोकेकर ह्यांनीं केलें आहे. हें प्रत्येक देशभगिनीनें आणि मुलीनें अवश्य वाचण्यासारखें आहे. ह्याची भाषा प्रौढ; ह्यांतील पद्यें मनाला आनंद देणारीं व म्हणण्यास सोपीं आहेत.

स्त्रियांचा मुख्य **पातिव्रत्य धर्म** तो हें पुस्तक वाचून शिकण्यासारखा आहे. सौभाग्य आणि पुत्र हीं स्त्रियांना प्राणाहूनही प्रिय आहेत, तीं, सती सावित्रीनें कशीं साधलीं आहेत तीं हें पुस्तक वाचून ध्यानांत ठेवण्यासारखीं आहेत.

ह्याचे, बरींच वर्षे रंगभूमीवर प्रयोग झाले व होत आहेत. ते प्रेक्षकांस फारच आवडले आहेत, ते इतके कीं, या त्रिलोकेकरकृत नाटकाचा प्रयोग असला कीं थिएटरांत गर्दीच गर्दी. ह्यावरून लोकांना हें नाटक किती प्रिय झालें आहे तें सहज कळतें.

ग्रंथकर्त्यांनीं ही आवृत्ति ठिकठिकाणीं सुधारली आहे, व ह्या आवृत्तींत आर्टिस्ट रा. रा. म्हात्रे ह्यांचे हातचीं नवीन तऱ्हेचीं फोटोझिंको केलेलीं मनोरम सुंदर चित्रें घातलीं आहेत.

ह्या पुस्तकांतील चित्रें मनोरम; टाईप चांगला; छपाई सुंदर; कागद उत्तम; गांचा खिशांत राहणारा. किं. ३ आणे. ट. व्ही. पी. २ आणे.

## विवाहविधिचंद्रिका.

ऋग्वेद–आश्वलायन–विवाह–प्रयोग, वेदमंत्र, सायनमंत्रभाष्य व मंत्राचा अर्थ व भाष्याचा अर्थ अशा मराठी अर्थासह, किं ·॥· ट. ८८

## संस्कृत कविपंचक.

म्हणजे कालिदास, भवभूति, बाण, सुबंधु व दंडी. प्रत्येक कवीचे ग्रंथ, त्यांतील वेंचक उतारे अलंकारादिक व सर्वतऱ्हेनें मराठींत माहिती लिहिली आहे. हें काम **कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर** ह्यांनीं केलें. किं. रु. १· ट ख. ८=

## मुंबईचा वृत्तांत.

**( मुंबई शहराची हवी ती माहिती घरबसल्या पुस्तक वाचून मिळते. )**

व्यापारांचें मूळपीठ, सुंदर देखावा. सर्वप्रकारच्या राजकीय खात्यांचीं ठाणीं, पूर्वापर इतिहासप्रसिद्ध, असें जें **मुंबईशहर** त्याचा इत्थंभूत वृत्तांत. सन १००० पासून आजपर्यंत व्यापाराच्या घडामोडी, रस्त्यांची माहिती, दर्शनीय स्थळें, इत्यादिसह, पृष्ठें ४३५. किंमत रु. २ ट. ।· आणे.

## मनुस्मृति मराठी भाषान्तरसहित.

आवृत्ति २ री. सोनेरी बांधणी, किं. रु. ५ ट. ·।।· मूलश्लोक व त्यापुढें मेधातिथि कुल्लूक भट्टादि आधारानें मराठी भाषान्तर. विषयानुक्रमणिका, शेवटीं वर्णानुक्रमानें श्लोकांची सूची आहे. कागद उत्तम जाड, छापणी सुंदर, बांधणी मजबूत सोनेरी.

## वैद्यक शार्ङ्गधरसंहिता—

### मराठी भाषांतरासहित.

सुधारलेली आवृत्ति.

मूळग्रंथ शुद्ध करून, मराठी भाषांतर सुधारलें आहे. बाजूस विषयानुक्रमांक. विषयवार अनुक्रमणिका व रोगवार अनुक्रमणिका इत्यादि. कागद जाड. किं. रु. २॥· ट. ·।~ जाड पुठ्याची किं. रु. ३. ट. ·।=

## वैद्यविनोद.

मराठी भाषांतरसहित

प्रत्येक रोगाचें थोडक्यांत निदान सांगून त्यावर अनुभविक, प्रसिद्ध, सुलभ अशीं औषधें सांगितलीं आहेत. तीं बहुतेक वनस्पतींचीं, कषाय, चूर्णें, गुटिका, अवलेह, तेलें इत्यादि. पुढें **पुरवणी** जोडून धातूचें शोधनमारण, रसायनें, मात्रा, गुटिका, पाक, पदार्थगुणदोष. उपयुक्त पुस्तक आहे. किं. रु. ३ ट. ख. ·।=

नवीन सुधारून तयार केलेली आवृत्ति २ री.

## ऋग्वेदसंहिता—मूळपोथी.

आठ अष्टक समग्र, परिशिष्टें व संहिताशेष ह्यांसहित-पूर्वी लेखी पोथ्यांचीं जशीं शुद्ध अक्षरें असत, तशा वळणाचे, वेदाकरतांच मुद्दाम कोरलेले टाईप आहेत. त्या टाइपांनीं छापलेली पोथी. कागद गुळगुळीत, जाड, सफाईदार असून-पूर्वीच्या आवृत्तीपेक्षां किंमत कमी केली आहे.

**पोथी वजन तोळे १२४ आहे. किं० रु० ३॥ ट. ·॥·**

**,, रंगीत फळ्या, वेष्टनसह. किं० रु० ४ ट. ·॥·**

